

# THE RÂMÂYANS

OF

# MOROPANT,

(THE GREAT MARÂTHÎ POET OF THE MAHÂRÂSHTRA.)

## PART I.

Containing 5 Râmâyans.

*EDITED WITH*

CRITICAL AND EXPLANATORY NOTES

BY

THE EDITORS OF THE 'KÂVYASANGRAHA.'

PRINTED AND PUBLISHED

BY

THE PROPRIETOR

OF

THE "NIRNAYA-SÂGAR" PRESS.

BOMBAY.

1891.

*Price One Rupee.*

# विक्रीस तयार.

## संस्कृत पुस्तकें.

अष्टाध्यायीसूत्रपाठ. ... ... ... किंमत ५ आणे, ट. ॥ आणा.

अनर्घराघव नाटक. ... ... ... किंमत २ रुपये, ट. ३ आणे.

अन्नंभट्टकृत तर्कसंग्रह व दीपिका. ... किंमत ६ आणे, ट. १ आणा.

अवधूतगीता. (साधी.) ... ... किंमत २॥ आणे.

अवधूतगीता. (रेशमी पुठ्याची.) किंमत ५ आणे, ट. ॥

आर्यासप्तशती. ... ... ... किंमत १॥ रुपया, ट. २ आणे.

इसाबनीतिकथा. (दोन भाग) प्रत्येकीं. किंमत ६ आणे, ट. ॥ आणा.

उदासीनसाधुस्तोत्र. ... ... ... किंमत ५ आणे, ट. १ आणा.

कर्णसुन्दरी. ... ... ... ... किंमत ८ आणे, ट. १ आणा.

कथासरित्सागर. ... ... ... किंमत ६ रुपये, ट. ८ आणे.

कर्पूरमञ्जरी आणि बालभारत नाटक. किंमत १ रुपया, ट. १॥ आणा.

कादम्बरीकथासार. ... ... ... किंमत ८ आणे, ट. १ आणा.

कालिदासकृत रघुवंश काव्य... ... किंमत २ रुपये, ट. ३॥ आणे.

कालिदासकृत रघुवंश काव्य. बारीक टैपा. किंमत १ रुपया, ट. २ आणे.

कालिदासकृत कुमारसंभव काव्य. मल्लिनाथकृत टीका (सर्ग १–८) व सीतारामकृत टीका (सर्ग ८–१७) व पाठान्तरें यांसहित. किंमत २ रुपये, ट. ३॥ आणे.

कालिदासकृत मेघदूत काव्य. मल्लिनाथकृ. किंमत ८ आणे, ट. १ आणा.

कालिदासकृत मेघदूत काव्य. मल्लिनाथकृत टीका, पाठान्तरें व अर्थप्रदर्शक इंग्रजी टिप्पणी यांसहित किंमत १२ आणे, ट. २ आणे.

कालिदासकृत ऋतुसंहार काव्य. मणिरामकृत टीका, पाठान्तरें व अर्थप्रदर्शक इंग्रजी टिप्पणी यांसहित; व शृङ्गारतिलक काव्य. किंमत ६ आणे, ट. १ आणा.

केवळ टीकेसहित. ... ... ... किंमत ४ आणे, ट. १ आणा.

कालिदासकृत अभिज्ञानशाकुन्तल नाटक. इंग्रजी टिपा यांसहित. किंमत २ रुपये, ट. २॥ आणे.

कालिदासकृत अभिज्ञानशाकुन्तल नाटक. राघवभट्ट टीका, व अर्थप्रदर्शक बारीक टैपाचा. किंमत १। रुपया, ट. १॥ आणा.

काव्यालंकार. रुद्रटकृत नमिसाधुकृत टीकेसहित.

किंमत १॥ रुपया, ट. २ आणे.

कंसवध नाटक. शेषकृष्णकृत. किंमत ८ आणे, ट. १ आणा.

कृष्णसहस्रनाम. ... ... ... किंमत २ आणे, ट. ॥ आणा.

गणपतिस्तोत्र. ... ... ... किंमत । आणा, ट. ॥ आणा.

गणेशसहस्रनामावळी. ... ... किंमत । आणा, ट. ॥ आणा.

गणेशगीता. ( सार्थ ). ... ... किंमत २। आणे, ट. १ आणा.

गणेशगीता. ( रेशमी पुठ्याची. ) ... किंमत ४। आणे, ट. १ आणा.

गीता. मोठ्या टैपांनीं छापलेली. ... किंमत १२ आणे, ट. १ आणा.

गोपालसहस्रनाम. ( रेशमी पुठ्याचें. ) किंमत ४॥ आणे, ट. ॥ आणा.

गोपालसहस्रनाम. ( सार्थ. ) .. किंमत २। आणे, ट. ॥ आणा.

चतुःश्लोकी भागवत. ... .. किंमत । आणा, ट. ॥ आणा.

तुळसीमहात्म्य. ... ... ... किंमत ॥ आणा, ट. ॥ आणा.

दंडीकृत दशकुमारचरित्र. ... किंमत १॥ रुपया, ट. [illegible] आणे.

दत्तात्रयनामावळी. ... .. ... किंमत २ आणे, ट. ॥ आणा.

दुर्गास्तोत्र. ... ... ... ... किंमत १ आणा, ट. ॥ आणा.

देवीसहस्रनामावळी. ... किंमत १॥ आणा, ट. ॥ आणा.

द्वादश ज्योतिर्लिंग स्तोत्र. ... किंमत ॥ आणा, ट. ॥ आणा.

द्वादश [illegible]त्र. .. ... . किंमत १ आणा, ट. ॥ आणा.

धर्मशर्माभ्युदयम. ... ... ... किंमत [illegible] रुपया, ट. [illegible]

धुंडिराजकृत अभिनव [illegible]. ... किंमत ३ आणे, ट. ॥ आणा.

नर्मदाष्टक. .. ... किंमत । आणा, ट. ॥ आणा.

नलचंपू. ... ... ... ... किंमत २ रुपये, ट. ४ आणे.

नारायणपंडितकृत हितोपदेश. अर्थप्रदर्श. किंमत ८ आणे, [illegible] आणा.

व [illegible] सहित. ... किंमत १ रुपया, ट. २॥ आणा

नीतिशतक.. . ... ... ... किंमत ४ आणे, ट. ॥ आणा.

पांडवगीता.... .. ... ... किंमत १ आणा, ट. ॥ आणा.

पंचरत्नगीता. ... ... ... किंमत १ रुपया, ट. २॥ आणे.

पंचरत्नगीता. ( कारत्न [illegible]. ) किंमत ७ आणे, ट. १ आणा.

पंचरत्नगीता मध्यम टैपांनीं छापलेली सार्थ. किंमत ६ आणे, ट. १ आणा.

[illegible]मी. ... ... किंमत ८ आणे, ट. १ आणा.

प्रश्नोत्तर[illegible]लिपि. ... ... ... किंमत ४ आणे, ट. १ आणा.
प्रातःस्मरण.... ... ... ... किंमत १ आणा, ट. ॥ आणा.
भजनावळी. मोठे टैपानीं छापलेली. किंमत १ आणा, ट. ॥ आणा.
भगवद्गीता मध्यम टाईप.... ... किंमत ३ आणे, ट. ॥ आणा.
भगवद्गीता रेशमी. ... ... ... किंमत ६ आणे ट. ॥ आणा.
[illegible] .. ... ... ... किंमत ३ रुपये, ट. ३॥ आणे.
[illegible]. ... ... ... .. किंमत १२ आणे, ट. १ आणा.
[illegible]. ... . किंमत २ रुपये, ट. ४ आणे.
मनु[illegible]. ... ... ... ... किंमत २॥ रुपये, ट. ४॥ आणे.
मा[illegible]. ... ... . . किंमत । आणा, ट. ॥ आणा.
यमुना[illegible] ... ... ... किंमत । आणा, ट. ॥ आणा.
रत्नसमुच्चय ... ... ... ... किंमत [illegible] आणे, ट. ॥ आणा.
रसगङ्गाधर.... ... ... ... किंमत ३[illegible] रुपये, ट. ३ आणे.
रसिकाष्टक. ... ... ... ... किंमत ॥ आणा, ट. ॥ आणा.
रामगीता मूळ. ... ... .. किंमत ।॥ आणा, ट. ॥ आणा.
रामचंद्र का नांवाची संस्कृत शब्दरूपावलि. किंमत [illegible] आणे, [illegible] ॥ आणा.
रामरक्षा. . ... ... ... किंमत ॥ आणा, ट. ॥ आणा.
रामस्तवराज... ... ... ... किंमत १ आणा, ट. ॥ आणा.
लघुयोगवासिष्ठ ... ... ... किंमत ५ रुपये, [illegible] आणे.
लघुकौमुदी.... ... . . ... किंमत ६ आणे, ट. १ आणा.
लक्ष्मीस्तोत्र ... ... ... किंमत ॥ आणा, ट. ॥ आणा.
लौगाक्षिभास्करविरचित तर्ककौमुदी. किंमत २ आणे, ट. ॥ [illegible].
वाल्मीकिरामायण सटीक. ... ... किंमत ८ रुपये, ट. १४ आणे.
विक्रमोर्वशी नाटक. ... ... किंमत १२ आणे, ट. १ आणा.
विदुरनीति.... ... ... ... किंमत ६ आणे, ट. ॥ आणा.
विद्यारण्य स्वामीकृत अनुभूतिप्रकाश. किंमत २। रुपये, ट. [illegible] आणे.
विष्णुसहस्रनाम. ( साधे. ) ... ... किंमत १ आणा, ट. ॥ [illegible].
विष्णुसहस्रनाम. ( रेशमी. ) ... ... किंमत २॥ आणे, ट. ॥ आणा.
विष्णुसहस्रनामावळी. ( साधी. ) ... किंमत १। आणा, ट. ॥ आणा.
विष्णुसहस्रनामावळी. ( रेशमी. ) ... किंमत २॥ आणे, ट. ॥ आणा.
वैदिककोश.... ... ... ... किंमत ८ आणे, ट. १ आणा.

पवनसुताचा[1] आर्वीं, मग पुरवी भानुसूनुचा[2] काम[3]. ॥ १६
घनदुरभिमान[4] जो, त्या शक्रसुता वाळिला वधी; राज्य ।
सुग्रीवास कपींचें[5] देउनि, जगदीश दे सुख प्राज्य[6]. ॥ १७
चर[7] सर्वत्र प्रेषी[8] श्री[9] शोधाया सुकंठ[10], परि शोध ।
अग्रज[11] जटायुचा कथि; लंघी जलधीस पोतसुत[12] योधं[13]. ॥ १८
छळुनि सुरसेसि[14], मारी छायाग्रह[15] सिंहिका[16], पुरी[17] पाहे. ।
त्या श्रीस अशोकवनीं देखूनि, उगाचि पादपीं[18] राहे. ॥ १९
जड दशमुख ये रात्रीं, 'मन्महिषी[19] हो,' म्हणे गतव्रीड[20]. ।
धिक्कारी प्रभुभार्या त्यासि; तयाची न ती धरी भीड. ॥ २०
झडपी मारुति न तया, आज्ञा प्रभुची नसे म्हणोनीच. ।
स्वमनांत म्हणे, 'म्हणतो हें आयुःशेष तो, म्हणो नीच.' ॥ २१
टपकरि[21] मागें वेउनि गेली स्त्री त्या दशानना क्षुद्रा[22]. ।
मग एकांतीं प्रभुची स्तुति करुनि, श्रीस नमुनि, दे मुद्रा[23]. ॥ २२
ठकवी, सबळा[24] अक्षा[25] वधुनि, रणीं घननरवा[26] महामाया. ।
ब्रह्मास्त्रा सांपडला; काळमुखींही न योग्य हा मा या[27]. ॥ २३
डसुनि भुजंग कधीं तरि गरुडाला ह्मणवितील 'हां[28] !' काय ? ।
पेटवितां पुच्छ, उडे, जाळी लंकापुरी, महाकाय. ॥ २४
ढळवुनि परधृतिनग[29] ये; प्रभुला वंदुनि, 'विलोकिली देवी,' ।
ऐसें सांगुनि, चूडामणिसह[30], मस्तक पदीं पुन्हा ठेवी. ॥ २५
ण पुढें मागें रा ज्या, तो राय[31] कपीस भेटला, वानी; ।
मानी बहु सिंधुतटा गेला, घेऊनि कीश[32] सेनानी[33]. ॥ २६
तत बिभीषण झाला स्वाग्रजदोषाग्निनें[34], शरण आला; ।

---

१. मारुतीचा. २. सुग्रीवाचा. ३. इच्छा. ४. दृढ असा दुष्ट अभिमान आहे ज्याला. ५. वा-रांचें. ६. पुष्कळ. ७. दूत. ८. धाडी. ९. सीता. १०. सुग्रीव. ११. ज्येष्ठबंधु. (संपाती.) १२. [मा]रुति. १३. योद्धा. १४. राक्षसीविशेष. (ही नागमाता देवांनीं मारुतीची परीक्षा पहाण्याकरितां ठ[ेव]ली होती.) १५. आकाशमार्गानें जाणाऱ्यांची छाया ग्रहण करणारी. (सिंहिकेचें विशेषण.) १६. [राक्ष]सीविशेष. (राहूची माता.) १७. लंका. १८. वृक्षीं. १९. माझी पट्टराणी. २०. गेली आहे लज्जा [ज्या]ची, निर्लज्ज. २१. त्वरित. २२. नीचा. २३. आंगठी. २४. सैन्यसहिता. २५. राक्षसवि[शे]ष. (रावणपुत्र.) २६. इंद्रजितास. २७. सामावयास. २८. खेदार्थी. २९. शत्रूचा धैर्यरूप पर्वत. [३]०. शिरोरत्नासह. ३१. रावण. ३२. वानर. ३३. सेनापति. ३४. रावणाच्या दोषरूप अग्नीनें.

त्याला लंका प्रभु दे; कोण कवि न सद्यशोमृतें[1] धाला[2] ? ॥ २७

थर थर सागर कांपे; सांगे, 'पारासि[3] जावया सेतु ।

नळ कपि करू; धरिन मी; होइल अघमग्नमुक्तिला[4] हेतु.[5]' ॥ २८

दनुजारि[6] सेतु करवी; श्रीला दावी दशास्य चापशिरें; ।

सरमा[7] कथी, 'कपट हें; मोहांत न तूं, धरूनि ताप, शिरें.[8]'॥ २९

धनदानुजासि[9] सुगल[10] प्रथमचि, भुजगासि गरुडसा, झडपी. ।

अंगद 'साम कर' म्हणे; परि हितबोधामृता न तो जड[11] पी. ॥ ३०

'नर वानर तुच्छ' म्हणे; दारुण रण करुनि, भंग तो पावे. ।

देवांश कपि प्रभुच्या तेजें कां काळसे न कोपावे ? ॥ ३१

पवनाशनपाशांनीं[12] घनरव[13] करि बद्ध सानुजा देवां[14]. ।

दे वायुजादिकां[15] भय; ये खगपति[16], सोडवी, करी सेवा. ॥ ३२

फळ पावे पापाचें पर, कीं घटकर्ण[17] काळसाहि मरे; ।

कोण म्हणेल अशांता विग्रह[18] दावाग्नि[19] साम बा हिमें[20] रे ? ॥ ३३

बहु विकळ करी घनरव सबळा सुगळा[21], सलक्ष्मणा रामा; ।

आणी औषधिशिखरेंचि[22] उठवि सकळ, वातपुत्र ये कामा. ॥ ३४

भय दे मायासीता वधुनि, बिभीषण तया भ्रमा वारी. ।

मग लक्ष्मण घननादा[23] मायाविवरा[24] महाबळा मारी. ॥ ३५

मरतां सर्व, दशानन, सीता मारावया, धरि असीतें[25]. ।

त्यां[26] सचिव सुपार्श्व म्हणे, 'जरि हातीं मारिसी, तरि असीतें[27]!'॥ ३६

यत्न करी परनाशा बहु, बळ[28] खपतां, स्वयें अतिक्रुद्ध, ।

सौमित्रिस शक्तीनें भूतळिं पाडी; करी असें युद्ध. ॥ ३७

रक्षी प्रभु अनुजातें, उठवी मारुति पुन्हां तया शिखरें. ।

अमृतस्रावि च्छत्रचि तो, निववि, हरुनि उन्हा, तयासि खरें. ॥ ३८

लक्ष्मीपति, शक्ररथीं बसुनि, अहोरात्र सम करी युद्ध, ।

---

१. उत्तमयशरूप अमृतानें. २. तृप्त झाला. ३. परतीराम. ४. पानकांत बुडालेल्यांच्या मुक्तीला. ५. कारण. ६. राम. ७. बिभीषणस्त्रीचें नांव. ८. प्रवेश करीं. ९. रावणास. १०. सुग्रीव. ११. मूर्ख. १२. नागपाशांनीं. १३. इंद्रजित. १४. रामास. १५. हनुमंतादिकांस. १६. गरुड. १७. कुंभकर्ण. १८. वैर. १९. वणवा. २०. थंडी. २१. सुग्रीवास. २२. द्रोणगिरी. २३. इंद्रजिताला. २४. मायावी जे त्यांमध्यें श्रेष्ठ अशा. (इंद्रजिताचें विशेषण.) २५. खड्गानें. २६. रावणाला. २७. असलीला. २८ सैन्य.

शतमस्तक[1] खंडुनि वधि सूर्यवरें, होय यश जगीं शुद्ध. ॥ ३९
वर्षुनि पुष्पें, प्रभुतें वर्णिति, जय नारदप्रमुख गाती. ।
अतिधवला कीर्ति शिवा लोपवि, कवळून, हंसें[2]सुखगा, ती. ॥ ४०
शतमख[3] उठवी वानर, दिव्य करी श्री[4], पिताहि[5] दे भेट. ।
प्रभुयश भवार्णवीं हें सेतु, न नौका, तसें नव्हे बेट. ॥ ४१
षण्मुखज[6][illegible]कसखाचें पुष्पकनामक विमान या वाहे. ।
प्रभु,[illegible]यातें बैसोनि, श्रीसेत्वाद्यखिल[7] कौतुकें पाहे. ॥ ४२
ससुगल[illegible]भीषण प्रभु निजजय, मारुतिमुखें, प्रथम कळवी. ।
मग सानुज भरतातें भेटुनि, तत्ताप सकळही पळवी. ॥ ४३
हर्षवि, राजा होउनि, भरता, सुगला, बिभीषणा, राम. ।
मारुतिस भव्य वर दे, पूर्ण करी सर्वभक्तजनकाम. ॥ ४४
क्षयकर विप्रांचा जो, त्या लवणातें[8] अरिघ्नही[9] मारी. ।
भरत वधी कोटित्रय गंधर्व, प्रभु असा जगा तारी. ॥ ४५
ज्ञंहि[10] अज्ञहि[11] जन तारी नामें, कामादिशत्रुही मारी. ।
स्वयशें भवभय वारी, करि भक्तमयूरघन[12] दया भारी. ॥ ४६

---

## २. नामांकरामायण.[13]

(गीतिवृत्त.)

राजीवोद्भव[14] विनवी विश्वाहितदशमुखासि माराया; ।
मधुकैटभारि दशरथसुत होय, त्रिभुवनासि ताराया. ॥ १
राम प्रभु कौसल्यासुत, कैकेयीकुमार तो भरत, ।
महितगुण[15] सुमित्रात्मज लक्ष्मणशत्रुघ्न कीर्तिलोभरत. ॥ २
राजासि राम लक्ष्मण गाधिज[16] मागे, स्वयाग रक्षाया. ।

---

१. हृदयांत अमृतकुपी असल्यामुळें पुन: पुन: उत्पन्न झालेले असे अनेक मस्तक. २. हंस या उत्तम पक्ष्याला. ३. इंद्र. ४. सीता. ५. दशरथही. ६. कार्तिकस्वामीचा जो बाप महादेव त्या[illegible] मित्राचें म्ह० कुबेराचें. ७. शोभायमान सेतु आदिक सर्व. ८. राक्षसविशेष. ९. शत्रुघ्न. १[illegible]. ज्ञानीही. ११. अज्ञानीही. १२. भक्तरूप मोरांस मेघासारखा. 'मयूर'शब्दांत कवीनें आपलें [illegible]ही सूचित केलें आहे. १३. यांत पूर्वार्धाच्या आरंभीं **रा** आणि उत्तरार्धाच्या **म** याप्रमाणें प्रत्येक आर्येंत **राम**नाम आहे, म्हणून यास '**नामांकरामायण**' म्ह० नामानें चिह्नित रामायण हें नांव दिलें आहे. १४. कमलापासून उत्पन्न झालेला (ब्रह्मदेव.) १५. स्तुत्यगुण. १६. विश्वामित्र.

मनुजेंद्र[1], गुरुनिदेशें[2], दे प्रियही प्रणतभद्रदक्षा[3] या. ॥ ३
राहुनि आज्ञेंत सदा सादर, मारूनियां वैर[4], महर्षी, ।
मख संरक्षुनि, केला श्रीरामें, सानुजें, परम हर्षी. ॥ ४
रामा[5] गौतममुनिची हर्षविली, पदरजें हरुनि शापा; ।
मग जनकपुरीं सीता, लीलेनें राघवें चुरुनि चापा. ॥ ५
'राकेशमुखी[6] सीता रामाला, तदनुजा तिघी कन्या ।
महितगुणा दे' ऐसें सांगुनि, मुनि जाय, मैथिला[7] धन्या. ॥ ६
राजा जनक दशरथा आणुनि, सानुज तदीयतनयातें, ।
मणिकनकभूषिता दे कन्या; बहु धन्य म्हणति जन यांतें. ॥ ७
रागें जो हरकार्मुकभंगें भार्गव[8], तया करी शांत. ।
मन्यु[9] त्यजुनि, म्हणे 'बा ! तूं तो, जो चुकविता करीशांत[10] !' ॥ ८
राहुविमुक्त[11] शशीसा, दशरथराजा विशंक[12] धरि तेजा. ।
मन कश्मलांत[13] बुडतां क्षण, म्हणवी व्यसुचि[14] बोध करवी ज्या. ॥ ९
रव[15] गमे इतराची, रामाची, पुरजनास, कीर्ति सुधा[16]; ।
मधुरत्वादि यश परा न भजे, जें काय कामधेनुदुधा. ॥ १०
राजासि पुसोनि, युधाजिन्मातुळ ने सहानुजा भरता; ।
मतिमाजि विचार असा होय नृपाच्या जगद्धिता[17] भरता[18]. ॥ ११
राज्यभरोद्वहनोचित[19], सद्गुणसंपन्न, राम, लोकांस ।
मत, युवराज[20] करावा; करिल महें[21] पूर्ण हा सदोकांस[22]. ॥ १२
राजप्रियेसि[23] सांगे सुरदूषितबुद्धि[24] मंथरा दासी, ।
'मन हृष्ट[25] कां? सपत्नीसुतराज्यें दीनतेसि कीं जासी. ॥ १३
राबीव सपत्नीतें, स्वसुता मागोनि राज्य घेच बरें; ।
मन्वब्द[26] राम वरु वन, उडवुत भरतीं सपत्न[27] हे चवरें.' ॥ १४

---

१. मनुष्यांचा राजा दशरथ. २. वसिष्ठाज्ञेनें. ३. नम्रजनांच्या कल्याणाविषयीं दक्ष अशा. ४. शत्रु. ५. स्त्री. ६. पौर्णिमेचा पति जो चंद्र त्यासारिखें आहे मुख जीचें. ७. जनकातें. ८. परशुराम. ९. क्रोध. १०. गजेंद्रनाश. ११. राहूपासून मुक्त झालेला. १२. शंकारहित. १३. मूर्छांत. १४. प्राणरहित. १५. काकवी. १६. अमृत. १७. जगाच्या कल्याणार्थ. १८. शिरता. १९. राज्यभार वाहण्याविषयीं योग्य. २० राजाच्या हाताखालीं काम करणारा. २१. आनंदानें. २२. उत्तमस्थानीं राहणाऱ्यांस म्ह० देव पितर यांस. २३. कैकेयीस. २४. देवांनीं बिघडविली बुद्धि जीची अशी. २५. हर्षयुक्त. २६. मनु म्ह० चवदा वर्षें. २७ सावत्र भाऊ.

[1]**रा**ज्ञी तसेंचि करि ती; मागे वर; सत्यसादरा अडवी. ।
[2]**म**धुरतमाहि तिची मति, ती झाली, लोभदूषिता, कडवी. ॥ १५
**रा**हे यत्न नृपाचा; **सी**तालक्ष्मणसमेत **रा**म निघे. ।
**म**तिमान्, [3]गुरुवचनावन सर्वसुखाधिक, असें बरा मनिं घे. ॥ १६
**रा**हवि अभिषेका ती, घे वस्त्रें, **प्र**भुसि [4]वल्कलें ओपी. ।
**म**ग, 'सेवा **भ**रताहुनि मातें' **प्र**भुवर म्हणे, 'दिली सोपी.' ॥ १७
**रा**जासि **रा**म वंदुनि, सर्वगुरुजनांसि, जाय उत्साहें ।
[5]**म**हिषीगृहासि; राजा धरि भय, करितील लोक [6]कुत्सा, हें. ॥ १८
**रा**जा [7]सुमंत्र धाडी; तो स्वामिरथीं तिघांजणां वाहे; ।
**म**रता सर्वहि शोकें, **प्र**भु [8]करुण म्हणोनि, [9]सासु जन राहे. ॥ १९
**रा**नट [10]निषाद **गु**ह, परि परम प्रेमळ सखा तया भेटे. ।
[11]**म**रुदागमें दहनसा, वनवासें शोक तन्मनीं पेटे. ॥ २०
**रा**जीवनयन सानुज, मागुनि वटवृक्षपय, जटा बांधी. ।
**म**स्तक [12]सकपर्द तसें तें न विमोहील साधुची कां धी? ॥ २१
**रा**जभजन सचिवा हित न गमे, **प्र**भु उचित जाणवी, तरि तें. ।
**म**न करि विकल **गु**हाचें, जेव्हां **ज**गदीश आणवी [13]तरितें. ॥ २२
**रा**शि [14]जगद्भव्याची जी **गं**गा, **प्र**भु तितें उतरला, हो! ।
**म**ग त्या म्हणे **गु**हातें, 'येतों बा! न तव धी [15]सुतरला [16]हो.' ॥ २३
**रा**जसख**भ**रद्वाजा सानुज, सस्त्रीक, **रा**म, येऊन, ।
**म**त्स्यवर जसा डोहा, भेटे; सानंद होय सेवून. ॥ २४
[17]**रा**कानाथ चकोरा, **रा**म तसा **चि**त्रकूटवासिजना, ।
**म**धु जेविं मक्षिकांच्या, [18]मुनिराजीच्या तसाचि होय, मना. ॥ २५
**रा**हे **सु**मंत्र; भेटे तो महिषीच्या भजोनि गेहातें; ।
[19]**म**हिला वियोग नृप दे, त्यजुनि, म्हणत '**राम राम**' देहातें. ॥ २६
[20]**रा**खा [21]यांचा जातां, झालें गोकुळ जसें, तसें पुर तें. ।
**म**रुशोक, [22]श्रीगुरुनयघन; जीवन अन्यथा कसें उरतें? ॥ २७

---

१. कैकेयी. २. अत्यंत मधुर. ३. गुरुवचनाचें पालन. ४. वृक्षाच्या साली. ५. राणी कौसल्येच्या गृहास. ६. निंदा. ७. या नांवाचा प्रधान. ८. दयाळु. ९. सप्राण. १०. कोळी. ११. वायूच्या येण्यानें. १२. जटाजूटयुक्त. १३. नौकेतें. १४. जगाच्या कल्याणाची. १५. अत्यंत चंचला. १६. होवो. १७. चंद्र. १८. ऋषिपंक्तीच्या. १९. पृथ्वीला. २०. रक्षणकर्ता. २१. पुराचा. २२. श्रीगुरु जो तोच नीतिरूप मेघ.

रा[1]घव मातुल गुरुवें दूत प्रेषूनि शीघ्र आणविला; ।
म[2]न्युद अनर्थहि ति[3]णें, हर्षद मानुनि, सुतासि आणविला. ॥ २८
राग करी मातेवरि, करुनि पित्याची क्रिया, निघे तूं[4]र्ण; ।
म[5]घव्या भय दे, प्रभुला भेटे, व्हाया स्वकाम तो पूर्ण. ॥ २९
राजासि तोय देउनि, समजावी राम आ[6]शु भरतातें, ।
मधुर वदे, सच्चित्तां जें पूर्ण करी, न बा! शुभरता तें. ॥ ३०
'राहोंदे मज चवदा वर्षे, पितृसत्यरक्षणा, रानीं. ।
महिमा तुझाहि गावा ताताचें वचन रक्षणारांनीं.' ॥ ३१
रा[7]ष्ट्रावनासि मागुनि घे प्रभुच्या पादुका, शिरीं वाहे. ।
मरणद समयादर्शन कथुनि, स[8]मावृत्त, पुरनिकट राहे. ॥ ३२
रा[9]क्षसकदनार्थ निघे श्रीरामहि, चित्रकूट सोडून ।
मं[10]ह बहु देता झाला अत्र्यनुसूयांसि, हस्त जोडून. ॥ ३३
रानीं विराधराक्षस सीतेसि धरी, हरी, द[11]रीवदन; ।
मत्ता तया मथुनि, दे पदा नमितयाहि सुमतिचें सदन. ॥ ३४
रा[12]त्रिंचरभीतिरहित दंडकवन करुनि, हरुनि ताप, सजे, ।
मदनांतकसा, द्याया गति त्यांस, सुपथ धरूनि तापस जे. ॥ ३५
राजा गृध्रांचा जो, तातप्रियसख; जटायु, तो तात ।
मग्नचि सुखांत केला; हें यश गाते तसेच होतात. ॥ ३६
राहे गोदातीरीं प्रभु, पंचवटींत, रचुनि द[13]लशाला; ।
मत्ता खें[14]चरी लोभे त्यासि, शु[15]नी जेवि अमृतकलशाला. ॥ ३७
रागें कर्ण घ्राण छेदी लक्ष्मण कृती, तिला दंडी. ।
मं[16]दिरासप खर बंधु प्रेरी प्रभुच्या वधास ती [17]चंडी. ॥ ३८
राक्षस शूर्पणखेचे कैवारी मारितां रणीं, दुष्टा ।
मं[18]हदप्रिय दशवदना कळवी ती, परम दारुणा, रु[19]ष्टा. ॥ ३९
राख स्वकुळ कराया, कपटकनकमृग निशाचर प्रेषी. ।

---

१. भरत. २. दुःखदायक. ३. कैकेयीनें. ४. शीघ्र. ५. इंद्राला. (भरताचें मोठे सैन्य [illegible] हा आपले राज्य घ्यावयास येतो काय असें त्यास भय पडलें असा भावार्थ.) ६. लवकर. ७. राज्य[illegible]क्षणार्थ. ८. माघारा फिरलेला. ९. राक्षसनाशार्थ. १०. आनंद. ११. गुहेसारिखे मुख ज्याचें अ[illegible] १२. राक्षस. १३. पर्णशाला. १४. राक्षसी. (शूर्पणखा.) १५. कुत्री. १६. मद्य व रक्त पिणारा. १७. कोपिष्ट स्त्री. १८. अतिशय वाईट वर्तमान. १९. क्रोधयुक्ता.

मर्त्याशन[1], वैरमत्त[2], क्षणदाचरराज[3], दशमुख, द्वेषी. ॥ ४०
रावण संहाराया, श्रीहि कपटकनकहरिणलोभ धरी; ।
मनुकुलतिलका[4] प्रार्थी; त्यामागें प्रभुहि जाय, जेविं हरी[5]. ॥ ४१
रानांत दूर पळतां प्रभु कपटमृगासि खरशरें[6] हाणी. ।
मर्महतहि 'हा सीते! हा सौमित्रे!' अशी वदे वाणी. ॥ ४२
राणी, प्रभुची वाणी मानुनि, भी[7], लक्ष्मणा म्हणे, 'स्वामी! ।
मरणव्यसनीं रक्षीं; तुज पत्यसुदान[8] मागतें बा! मी.' ॥ ४३
राघव[9] म्हणे, 'सखि! रहा स्वस्था; भी न रघुसत्तमा यावी. ।
मथिला वहुधा प्रभुनें तो कनककुरंग मत्त मायावी.' ॥ ४४
राग करी, कटु बोले, उटजांतुनि[10] घालवी तया आर्या ।
मधुभित्प्रभुची[11] भार्या; सिद्ध कराया सुरांचिया कार्या. ॥ ४५
रावण तोंचि, मदुटजीं[12] शिरुनि, हरी श्रीस; जड म्हणे, 'आजी ।
मत्सम मीच; जयश्री मळविली सहज न करितां आजी[13].' ॥ ४६
राहु सुरयशोविधुचा[14] तो खळ केला जटायुनें भग्न. ।
मग तेणंही, अनयें पक्ष च्छेदूनि, कश्मलीं[15] मग्न. ॥ ४७
राजसुता, गगनपथें नेतां, लंघूनि ऋष्यमूकनग, ।
मर्कटपंचक पाहे; सोडी ती त्यांत सोत्तरीय[16] नग[17]. ॥ ४८
राक्षस लंकेमध्यें रोधी सीता सती अशोकवनीं. ।
मणिकीं[18] रसें[19] गंगेचा, तेविं कथेचाचि या असो कवनीं. ॥ ४९
राम मनुष्यतनु प्रभु परते, मृग वधुनि, तों, अनुज कथि, तें ।
महिजोक्त[20] श्रवण करुनि, धांवत उटजासि ये, मनें व्यथितें. ॥ ५०
रामा[21] उटजीं न दिसे, 'हाय!' म्हणे, स्त्रैणसा[22] विलाप करी. ।
'मदिराक्षि! हाय! कोठें आहेसि?' म्हणे; वरीच शोक धरी. ॥ ५१
रानीं हुडकी स्त्रीतें प्राकृतसा, तों जटायुला पाहे. ।
मरणोन्मुखाहि वदवी, न दशाननपापकृत्य तें साहे. ॥ ५२

---

१. मनुष्यांस खाणारा. २. वरप्राप्तीनें माजलेला. ३. राक्षसराज. ४. रामाला. ५. सिंह. ६. तीक्ष्ण शरानें. ७. भय पावे. ८. पतीचें प्राणदान. ९. लक्ष्मण. १०. पर्णशालेंतून. ११. मधुदैत्य मारणाऱ्याची म्ह० रामाची. १२. उत्तम पर्णशालेंत. १३. युद्ध. १४. देवांच्या यशोरूप चंद्राचा. १५. मूर्छेंत. १६. उत्तरीयवस्त्रासह. १७. दागिने. १८. मडक्यांत. १९. (गंगापक्षीं) उदक; (कथापक्षीं) गोडी. २०, सीतेचें भाषण. २२. स्त्री. (सीता.) २२. स्त्रीलंपटसा.

राजसखाचें उत्तरकार्य करुनि, पुनरपि प्रिया शोधी. ।
मन वरिचेवरि शोकीं बुडतां, लक्ष्मण परोपरी बोधी. ॥ ५३
राक्षस कबंध खाया धरि, त्या प्रभु दे विमान बैसाया. ।
महिमा श्रीरामाचा अत्यद्भुत, विश्वगीत, ऐसा, या. ॥ ५४
राजीवनयन बसवी प्रेमें शबरीस भावुक विमानीं. ।
मकरालय करुणेचा हा प्रभु, या सत्य भावु कवि मानी. ॥ ५५
राबवितो प्रणतगृहीं जो सकळा सिद्धि, तो सहाय करी ।
मर्कटभल्लूकांतें, चरितें तारावया जगासि, हरी. ॥ ५६
राजस कपिपति वाळी, स्त्री हरुनि, जपे वधावया भ्रात्या. ।
मत्ता प्रभुवात उडवि मित्रीकृतसुगळकपि भयाभ्रा त्या ॥ ५७
राड तशी सुगळाची कुदशा, गांगप्रवाहसा राम. ।
मरुदात्मज 'रविकांत, प्रभुरविसंनिधिच यासि दे धाम. ॥ ५८
राज्य कपींचें देउनि, सुगळा अग्रजवधू दिली तारा.' ।
मरुदधिप म्हणे, 'प्रभुजी ! तुमच्याचि करीं असे किली, तारा. ॥ ५९
राजी सुगळ कपींच्या धाडी, त्यांला न लागला शोध. ।
मरुदात्मजचि यशस्वी होय, न दुसरा जगीं तसा योध. ॥ ६०
राय कवींचा सुरसा छायाग्रह ठकवि, न धरि शंकेला. ।
मकरालय शतयोजन उडुनि, गरुडसाचि, जाय लंकेला. ॥ ६१
रामप्रियेसि मुद्रा दे, वन चुरि, अहितकटक ये जंथुनी, ।
मथुनि तया, पुर जाळी, खळदशवदनासि भावि तें कथुनी. ॥ ६२
रासभसे पर केले, होउनि उच्चैःश्रवा तसा, आला. ।
मणि देवीचा देउनि, बहु मान्य प्रभुसि वातसुत झाला. ॥ ६३
राळासा प्रभुपाशीं अरिपाशीं पवननंदन सुमेरू. ।
मदनारि विभु वदे, 'या वत्सा दहनापुढें पर उमे ! रूं.' ॥ ६४
रावणवधार्थ राम प्रभु, अमितसुरांशकपिबळेंद्रयुत, ।

---

१. दशरथाच्या मित्राचें म्ह० जटायूचें. २. या श्रीरामाचा. ३. भाविक. ४. सागर. ५. आ-स्खलांतें. ६. प्रभुरूप वारा. ७. मित्र केला आहे सुग्रीव वानर ज्यानें असा. ८. भयरूपी अभ्रांला. ८. चिखल. ९. वायुपुत्र. (मारुती.) १०. सूर्यकांत. ११. या सूर्यकांताला. ११. तेज. १२. देवांचा स्वामी. (इंद्र.) १३. रक्षण करा. १४. पंक्ति. १५. जमाव करून. १६. भविष्य. १७. गर्दभसे. १८. सूर्याचा अश्व. (चतुर्दश रत्नांपैकीं एक.) १९. कणधान्यविशेष. (हें धान्य बारीक असतें.) २०. कापूस. २१. असंख्य देवांश जे वानर त्यांचा नायक जो सुग्रीव तेणेंकरून युक्त.

मकरालयासि पावे शिवविधिशतमखमहर्षिकोटिनुत. ॥ ६५
रा[1]क्षसराजानुजनि, प्रणत, बिभीषण, [2]पलाशकुलराज्य, ।
म[3]धुप [4]मधु जसें कमळीं, रामपदीं पावला, यश प्राज्य. ॥ ६६
रा[5]शि जळाचा प्रभुच्या तेजा [6]भी; विनवि, 'बा! यश तगावें; ।
मज [7]दाम [8]अयुतयोजनही सेतु गमेल; काय शत [9]गावें?' ॥ ६७
राक्षसराज, धराया सत्वर कुळसहित मृत्युची पदवी, ।
मस्तक [10]मनुष्यपतिचें दावुनि सीतेसि 'हीं[11]!' असें वदवी. ॥ ६८
रा[12]मा बिभीषणाची [13]सरमा, [14]माया असें तिला कळवी; ।
मळवी अश्रुभरें जी मुख देवी, तें[15]मनोव्यथा पळवी. ॥ ६९
राहुनि अष्ट दिन तटीं, नळकपिला कथुनि, सेतुतें करवी. ।
मग, सबळ प्रभु उतरे, प्राज्य [16]यशोमृत जगत्रया भरवी. ॥ ७०
राजा कपिकटकांचा, प्रभुतें घेउनि, चढे [17]सुवेळनगीं. ।
मत्तीं त्यां दुर्गस्थीं उडुनि पडे, श्येन जेविं तुच्छखगीं. ॥ ७१
रागें ताडुनि, पाडुनि शत्रुमुकुट, ये करूनि भुजयुद्ध; ।
[18]महिजाकांत म्हणे, 'बा! साहस हें; या न म्हणति बुध शुद्ध.' ॥ ७२
राक्षसपुर विभु रोधी; अंगदवदनें दशानना बोधी; ।
[19]मत्सरिवर अरि, परि, हरि करि साम, न आवरीच जड तो धी. ॥ ७३
[20]रात्रिचरचार धरिती, भुज झाडुनि, वालिसुत करी चूर. ।
मथुनि [21]प्रासादातें, [22]सूरकुळवरासि तो कथीं शूर. ॥ ७४
रागिट वानर ऋक्ष, प्रभुची होतां रणार्थ आज्ञा, ते ।
मलिन निशाचर मथितां, प्रेक्षुनि म्हणती, 'न मात आ' ज्ञाते. ॥ ७५
राहे महामुनींचा नित्यविधि, समाधि; समरयज्ञांत ।
मन लुब्ध; जय पराजय दिसती, घटिकेंत, सम [23]रयज्ञांत. ॥ ७६
राड रुधिरमांसांची झाली समरांगणीं; मग, नदी न ।
[24]मत्तेभांहि तरोंदे; पळति [25]खेचर; काढिती [26]तग न दीन. ॥ ७७

---

१. रावणानुज. २. राक्षसांच्या कुलाचें राज्य. ३. भ्रमर. ४. मध. ५. जलाचा समूह. (समुद्र.) ६. भय पावे. ७. माळा. ८. दहा हजार. ९. योजनें. १०. राजा रामाचें. ११. हाय. १२. स्त्री. १३. बिभीषणस्त्रीचें नांव. १४. कपट. १५ तिची (सीतेची) अंतःकरणसंबंधी व्यथा. १६. कीर्तिरूप अमृत. १७. सुवेळनामकपर्वतीं. १८. सीतापति. (राम.) १९. मत्सर करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ. २०. रावणाचे दूत. २१. राजवाड्यातें. २२. रामचंद्राम. २३. वेगवानांत. २४. गजांही. २५. पक्षी. २६. टिकाव.

**रा**[1]जी सलक्ष्मण **प्र**भुवर विशिखांच्या कबंधलक्षांचें ।
**म**न मोहाया दाविति नृत्य **श**तमखादियुद्धदक्षांचें. ॥ ७८
**रा**वणभंगें, पावे जो सेनेश **प्र**हस्त, तो मेला. ।
**म**रतां राक्षसकटकें, मायावी **मे**[2]घरव न कोमेला. ॥ ७९
**रा**[2]वणि अहिपाशांहीं **सौ**मित्रिस **र**घुवरासही बांधी. ।
**म**र्कटकटकें भंगी. **श्री**ची होईल न विकळा कां धी? ॥ ८०
**रा**जा सर्वखगांचा धांवुनि ये, सख्य संकटीं कळवी; ।
**म**[3]रुदशनांतें **प्र**भुच्या, गुरु दोषांतें जसा, तसा पळवी. ॥ ८१
**रा**वण **घ**[4]टकर्णातें, कष्टें उठवुनि, रिपुक्षया धाडी. ।
**म**दिरामदांध तो, बहु कपिवीरांतें, रणांगणीं, पाडी. ॥ ८२
**रा**[5]त्रिंचरेश्वरानुज **सु**ग्रीवातें रणीं धरी, परते; ।
**म**र्कटकटकें भ्यालीं; विजयें घनसेचि गर्जले प[6]र ते. ॥ ८३
**रा**[7]जा मग, सुटुनि, हरी **घ**टकर्णघ्राणकर्ण वेगानें. ।
**म**[8]हती ख्याति करी, सुरगंधर्वांसहि न वर्णवे गानें. ॥ ८४
**रा**गें भरे, फिरे, तो काळ गमे, कपि वधी, गिळी सगळे. ।
**म**र्कट भयें गळाले; पर्वतशतवृष्टिनेंहि तो न गळे. ॥ ८५
**रा**म प्रभु भुज चरण च्छेदी, तरि तो न आवरे अ[6]हित. ।
**म**स्तक खंडुनि पाडी; त्यातें करि वीरमंडळीं म[9]हित. ॥ ८६
**रा**[10]क्षसराजाचे जे बंधु, सुत, सचिव, सहाय, ते सर्व, ।
**म**[11]ठ कपटाचे, खचले, दाखविते **व**[12]ज्रपाणिला गर्व. ॥ ८७
**रा**वण, त्यांच्या शोकीं, जें जें श्रुत स[13]दनुजोक्त, आठवि तें. ।
**म**सणाप्रति स[14]ल्लंघन स्वकुळाहि, महाबळाहि, पाठवितें. ॥ ८८
**रा**वणि धैर्य तया दे, गगनांत शिरोनि, शस्त्रवृष्टि करी. ।
**म**ति मोहीं सर्वांची बुडवी, **प्र**भुही दशा तशीच वरी. ॥ ८९
**रा**[15]जीवभवसुताची हृदयांत धरुनि यशःप्रदा वाणी, ।

---

१. शतमखादि म्ह० इंद्रादियुद्धदक्षांचें मन मोहाया, सलक्ष्मण प्रभुवर विशिखांच्या म्ह० बाणांच्या राजी म्ह० पंक्ति [आणि] कबंध म्ह० शिररहित जीं धडें त्यांच्या लक्षांचें नृत्य दाविती, असा अन्वय. २. इंद्रजित्. ३. सर्पांतें. ४. कुंभकर्णातें. ५. राक्षसराजाचा अनुज. (कुंभकर्ण.) ६. शत्रु. ७. सुग्रीव. ८. मोठी. ९. पूज्य. १०. रावणाचे. ११. गृहें. १२. इंद्राला. १३. साधु बिभीषणाचें भाषण. १४. साधूंचा अपमान. १५. ब्रह्मदेवाचा पुत्र (नारद) याची.

मे[1]रुदात्मज औ[2]षधिनगशृंग, पु[3]रहराद्रिनिकटगत, आणी. ॥ ९०
राहे न शल्यमोह क्षत तद्गंधानिळें कपिबळांत. ।
मनुजतनु सानुज प्रभुसह उठले सर्वही भट पळांत. ॥ ९१
रावणसुत मायावी सीता मायामयी रची, मारी; ।
मग्न करि महाशोकीं; साधु बिभीषण तया भ्रमा वारी. ॥ ९२
रावणि बिभीषणानें, युक्ति कथुनि लक्ष्मणासि, मारविला. ।
मे[4]घव्याला थोडा दे, दे विजय सुरांत फार हा रविला. ॥ ९३
रावण शोकें खवळे; धें[5]वळेतरभा धरूनि क[6]रवाळा, ।
मे[7]हिजामथना धांवे; वारी त्या बुध सुपार्श्व अ[8]रवाळा. ॥ ९४
राक्षस बळ चतुरंग प्रभुवरि, मथनार्थ, पाठवी, रागें. ।
म[9]धुभित्पवना त्यांतुनि एकेंहि दिली न पाठ वीरा[10]गें. ॥ ९५
राख प्रभुशरदहनें केलें बळतृण, असेंहि परिसून, ।
मदिरांध, दुरभिमानी, सोडी अ[11]जसूनुची न परि सून. ॥ ९६
रा[12]ट क्रोध धरि, निघे, न गणुनि उत्पात, अपशकुन, भारी. ।
म[13]रुसख व्हाया, घाली गांठि प्रभुशीं, सुकंठबळ मारी. ॥ ९७
रा[14]ळ करी सर्वांची; सौमित्रिस शक्तिनें विकळ पाडी; ।
मर्मी खरविशिखांहीं त्यातें, प्रभु तो भ्रमे असें, ताडी. ॥ ९८
रा[15]ग अनुपूर्व भगवद्दास्यीं बहु ज्यासि, तो, महासुकृती, ।
मरुदात्मज उठवि पुन्हा, त्याचि उपायें, तया, म[16]हासु, कृती. ॥ ९९
रा[17]ईचा गिरि, गिरिची राई करि, त्या दशास्य तो काय ? ।
महिमा अरिसहि देतो ज्याच्या हृदयांत आपले पाय. ॥ १००
रा[18]जा [19]गीर्वाणांचा रथ दे, त्यावरि बसे, करी समर; ।
म[20]कर निवटि[21]ला [22]जेणें, [23]जो कांसा[24]रीं म्हणे करीस 'मर.' ॥ १०१
रात्रिदिवससप्तक रण अत्यद्भुत, ज्यांत शत शिरें तुटलीं. ।
मरण तरि न अरि पावे; पहिलीं जैशीं तशीं नवीं फुटलीं. ॥ १०२

---

१. मारुती. २. द्रोणाचलाचें शिखर. ३. कैलासपर्वताजवळचें. ४. इंद्राला. ५. कृष्णवर्ण. ६. तरवारीला. ७. सीतेला मारण्यास. ८. उच्छृंखळास. ९. रामरूप वायूस. १०. वीररूप पर्वतानें. ११. अजपुत्र दशरथ याची. १२. राजा. १३. निर्जीवन. १४. फजीती. १५. अनुराग. (प्रीति.) १६. महाबळ. १७. मोहरीचा. १८. इंद्र. १९. देवांचा. २०. सुसर. २१. मारिला. २२. ज्या रामानें. २३. जो राम. २४. सरोवरांत.

**रा**[1]द्धांत **द**शमुखाच्या अंताचा तैं न होय कोणाही. ।
**म**रणभयप्रद झाला; जेविं दुखविला [2]स्वगेहकोणाही. ॥ १०३
**रा**हे [3]साधि **प्र**भु, तों, [4]रविहृदय **अग**स्त्य दे [5]जपायास. ।
'**म**थिशिल अरिसि' रवि असें वदला 'बहु न करितां जपायास.' ॥ १०४
**रा**क्षसवरा वधी तो [6]वरविध्यस्त्राभिमंत्रितें बाणें; ।
**म**[7]हिला लोकेशांच्या वांटिति तेव्हां महोत्सवें वाणें. ॥ १०५
**रा**शि [8]स्वःपुष्पांचे प्रभुवर सुर वर्षले, सरी घनसे. ।
**म**[9]हभर तो सुघन [10]विपुळ, त्यांत पररसासि लेश रीघ नसे. ॥ १०६
**रा**क्षसवधविजयातें गाती गंधर्व, नाचती देवी. ।
**म**ध्य **ब्र**ह्मांडाचा [11]वाद्यस्तवरव न रिक्त तिंळ ठेवी. ॥ १०७
**रा**वणदाहादि सविधि करवूनि, पदीं **बि**भीषण स्थापी; ।
**म**ग [12]**दे**वी [13]दिव्यें करी; सद्यश सत्यादिलोक हें व्यापी. ॥ १०८
**रा**जा **द**शरथ भेटे; उठवी मृतऋक्षकपिबलें **श**क्र; ।
**म**न सुकवींचें मानी हें सद्यश अमृत, अमृत तें तक्र. ॥ १०९
**रा**क्षसराजाकरवीं सबळ **सु**गळ पूजवून, तत्सहित ।
**म**हित विमान वरि, निघे **रा**म, करायासि **भ**रतवत्सहित. ॥ ११०
**रा**[14]जसुतेसि रणकथा कथुनि, **प्र**भु सेतु दाखवी; रमवी; ।
**म**धुरवचनें **बि**भीषण**सु**गळसमागम मना सुधा गमवी. ॥ १११
**रा**हु जसा चंद्रातें, मोह तसा ज्या क्षताकुळा कवळी, ।
**म**[15]त्तातमित्र, येथें सुगति वरुनि, सद्यशें कुळा [16]धवळी. ॥ ११२
**रा**[17]जितकुसुमविमानीं विरहींचें वृत्त सर्व आयकवी. ।
'**म**[18]धुपिककूजित तैसें **प्र**भुभाषण' हें म्हणेल काय कवी ? ॥ ११३
**रा** मग, **ता** आधीं, हें [19]नाम जिचें, तीस घे, जग नयानें ।
**म**ग्न सुखीं करिता प्रभु **गो**देतें पावला [20]गगनयानें. ॥ ११४
**रा**जीवाक्ष **वि**भु म्हणे, 'सादर **गो**दावरीतटीं वसलों ।

---

१. सिद्धांत. २. आपल्या घराच्या कोपऱ्यांत राहणारा सर्प. ३. दुःखी. ४. आदित्यहृदय मंत्र. ५. जपाचे श्रम. ६. श्रेष्ठ ब्रह्मास्त्रानें अभिमंत्रित. ७. स्त्रिया. ८. स्वर्गपुष्पांचे. ९. उत्सवभर. १०. अगण्य. ११. वाद्यें आणि स्तुति यांचा शब्द. १२. सीता. १३. शपथ. १४. सीतेस. १५. माझ्या ताताचा मित्र. (जटायु.) १६. शुभ्र करी. १७. शोभायमान पुष्पकविमानीं. १८. वसंतऋतूंत कोकिलांचें भाषण जसें. १९. तारा. २०. विमानानें.

मदिराक्षि! तरिच सप्रियजन सुविमानीं कुबेरसा बसलों. ॥ ११५
राज्ञि ! अगस्त्याश्रम हा, अत्र्याश्रम, चित्रकूट नैव[1] लोकीं; ।
महद[2] सदा या गंगायमुना, हा श्रीप्रयाग अवलोकीं.' ॥ ११६
राहे प्रभु प्रयागीं नमुनि भरद्वाजमुनिस; तूर्ण[3] पण ।
मग झाला सिद्ध; म्हणे, 'आशीर्वादें तुझ्याचि पूर्ण पण[4].' ॥ ११७
'रात्रि क्रमूनि येथें येइन, तूं कुशळ वद गुहा, भरता,' ।
मरुदात्मजा असें प्रभु सांगे, परम स्वदास्यलाभरता. ॥ ११८
राधींचा[5] पिकपक्षिस्वन[6] रसिकजनासि बहु, तयापरिस ।
मधुर मरुज्जरव[7] गुहा; मानी जीवातु[8] मूर्त या हरिस[9]. ॥ ११९
रानट कपि, परि गुरुहुनि, चंद्राहुनि, अधिक वाटला भरता, ।
मलयानिलाहुनि, श्रमहर, रघुपतिभजन[10]वींटलाभरता. ॥ १२०
राका[11]रमण चकोरा, तैसा प्रभुवर तया गुहा होय. ।
मग दर्शन दे भरता, देतो घन चातका जसें तोय. ॥ १२१
राजित[12] होय न केवळ साकेत[13]चि, बहु निवोनि, विश्वहि तें. ।
मघमघित धवळ सुयशें केलें ब्रह्मांडभांड[14] विश्वहितें. ॥ १२२
राज्याभिषेकविधि तो केला वरुनि प्रभूत्तमें धन्य. ।
मणगट धरुनि दवडिलें भवभय, राहेल कोणतें अन्य ? ॥ १२३
राजे सुगळ बिभीषण जनकादिक सर्व पूजिले सबळ[15]. ।
मरुदात्मजा निजयशःश्रवणवर दिला, जसा सुधाकवळ[16]. ॥ १२४
राउत उच्चैःश्रुति[17]चा जो, त्याच्या सुगतितें जसा, अन्य ।
मनुजेंद्र[18] श्रीराम प्रभुच्या पावे तसा न राजन्य[19]. ॥ १२५
रास्नादिकषाय[20] शमवि वातादिस, अमृतरस नुरवि शेष, ।
मनुजप[21] तसा प्रजाधि[22]स राम असा स्तविति महिसुर[23] विशेष. ॥ १२६
राज्य प्रभुचें, प्रभुच्या राज्यापरि मत्त लवण गंधर्व; ।
मथनीं त्याच्या गमला शत्रुघ्न, तसाचि भरतही, शर्व[24]. ॥ १२७

१. नूतन. २. तेजोदायक; उत्साहदायक. ३. त्वरित. ४. प्रतिज्ञा. ५. वैशाखींचा. ६. कोकिल. ७. वायुपुत्राचा शब्द. ८. जीवनौषध. ९. वानरास. (भारुतील.) १०. यज्ञ. ११. चंद्र. १२. अलंकृत. (शोभायुक्त). १३. अयोध्याच. १४. ब्रह्मांडरूप भांडें. १५. सेनायुक्त. १६. अमृताचा ग्रास. १७. उच्चैःश्रव्याचा. १८. मनुष्यांमध्यें श्रेष्ठ. १९. राजा. २०. औषधिविशेष. २१. राजा. २२. प्रजेच्या दुःखाला. २३. ब्राह्मण. २४. महादेव.

राष्ट्रचि न, राम निववी, देउनि धर्मार्थकाममोक्ष, मही. ।
मत अनुसरे प्रजांचें अ[1]क्षमसा, रामराज तो क्षमही. ॥ १२८
राजा राम दयाघन, भक्त मयूरासि, हा, अमृतवर्षे ।
मन निववुनि, नाचवि जो, भ[2]वभान उरों न दे किमपि हर्षे. ॥ १२९

---

# ३. मं[3]त्रमयरामायण.

(गीतिवृत्त.)

श्रीमान् राजशिरोमणि दशरथ, जो निजयशें बरा म[4]हित, ।
द्विजसेवक, य[5]ज्ञनिरत, जनभयहर्ता, ध[6]रानिकामहित. ॥ १
श्री[7]शहरा बहुमत तों[8], त्याच्या प्रां[9]जलयशस्करा मं[10]हिला ।
जं[11]ननी, यज्ञजपायसपानें, करि; दे सुखा बरा महिला. ॥ २
श्रीराम ज्येष्ठ तनुज, भरत यशोनिधि खरा, कुं[12]मारमणी ।
लक्ष्मण, शत्रुघ्न जया नयजयरुचि, जशि हरा उमा रमणी. ॥ ३
श्रीराम प्रभु, गां[13]धिजयज्ञावन, राक्षसांसि मथुनि, करी. ।
मुनि जय जय म्हणती, जैं गौत[14]मदारामहाघराशि हरी. ॥ ४
[15]श्रीगलशरासन मथुनि, जय करुनि, धरामनोव्यथा हरिली. ।
ज[16]नकयजनायतनजा, राजसभामद हरूनियां वरिली. ॥ ५
श्रीकंठशिष्य रां[17]म, द्विजसत्तम, अतियशा, खें[18]ळविराम; ।
त्याच्या जं[19]गतीपाळक्षत्रियजनलयमदा पळवि राम. ॥ ६
[20]श्री रामा मग देतां अ[21]जतनय नराधिनाथ; वा[22]मगती, ।
घे निजवरद्वय बळें, कैकेयी, स्व[23]जननयपरार्तमती. ॥ ७

---

१. असमर्थासारखा. २. संसारस्मृति. ३. यांत प्रत्येक गीतींत '**श्रीराम जयराम जयजयराम**' हा त्रयोदशाक्षरी मंत्र साधिला आहे म्हणून यास '**मंत्रमयरामायण**' असें नांव दिलें आहे. ४. पूज्य. ५. यज्ञाविषयीं तत्पर. ६. पृथ्वीला अत्यंत कल्याणरूप असा. ७. विष्णु-शिवांला. ८. दशरथ. ९. शुद्धयशाकारक. १०. स्त्रिया. ११. पुत्रप्रसवल्या. १२. कुमारांमध्यें श्रेष्ठ. १३. विश्वामित्राच्या यज्ञाचें रक्षण. १४. गौतमऋषीची स्त्री जी अहल्या तिच्या महत्पापाचा राशि. १५. शिवधनुष्य. १६. जनकाच्या यज्ञस्थानापासून झालेली. (सीता.) १७. भार्गवराम. १८. दुष्टांचा नाशकर्ता. १९. पृथ्वीपालक जे क्षत्रिय त्यांचा नाश करण्याबद्दल झालेल्या गर्वाला. २०. राज्यश्री. २१. दशरथ. २२. कुटिलबुद्धि. २३. स्वजनाच्या (दशरथाच्या) नीतीनें परमदुःखित मती जीची.

श्रीराघवा वन, मही निजकाय[1]भवासि, दे; दरा न मनीं ।
धरिं; जनहृदयजलरुहप्रिय! धी, राज्य त्यजूनियां, गमनीं. ॥ ८
श्रीराज्य त्यजुनि मही, सानुज[2]भूतनय राघव, मनांत ।
सुजनांच्या भय तुरवी, स्वभुजद्वयकृतपराक्रम वनांत. ॥ ९
श्री[3]शवियोग [4]रामय [5]अजतनयप्राण हरि; [6]नरामर तो ।
द्वि[7]जशापात्तलय, जसा पिउनि बिलेशय[8]भवा [9]गरा मरतो. ॥ १०
श्री त्यजि, [10]रांग धरि मनीं जननीचा, यत्न करि पुरा गमना; ।
परि जनकयशस्कर, जनहित, नयरत, न मनि सानुराग मना. ११
[11]श्रीसुदिराभ, मनोहर, [12]जटिल, सुभगकाय, रात्रिचरममें ।
भेदी; जय पावे; द्विज यति निवति, प[13]रामया हरुनि, [14]शर्में. ॥ १२
श्रीगोदातीराश्रम विभु, जप तप यज्ञ करि, परा मथिता; ।
शूर्पनखातेजःक्षय, जयशाली, राक्षसां मरण कथिता. ॥ १३
[15]श्रीस हरि रावण मर्दे, जपुनि यतिमिषें, वरावया मरण; ।
जरि अनय कळे, करि जन, धरि नच भय, वधि खरा, मदचि न रण.
श्रीवर, राक्षस मथितां, जटायुला तोय दे, खरा [16]महित ।
जनकप्रियसख गृध्रहि; जग गाय, तरीच, सदभिराम हित. ॥ १५
श्रीश सुरात्युत्तम, जरि यज्ञभुगीश्वरहरादिमत, न बरी. ।
तरि भजनप्रिय जन, हा स्वाशय कथि राम, उद्धरुनि शबरी. ॥ १६
[17]श्रीदाराहर मर्दुनि, सुगळ जगीं करि [18]यशोवरामत्र. ।
[19]जनिलयजभयमहोष्णीं होय [20]धराजासुरमण सुच्छत्र. ॥ १७
श्री खचराधिप [21]मरुदात्मज शोधुनि होय [22]मावरा [23]मत हा; ।
जपुनि यथाबळ भजतां, यश येचि; म्हणे न राजमणि नत हा. १८
[24]श्रीदसख पुरार्ति मना, तेविं करी जय करावया स्वमन; ।
जनितरय, जलधिकृतभय, सेतु रची [25]दुस्तराघसंशमन. ॥ १९

---

१. आपल्या पुत्रास. (भरतास.) २. लक्ष्मणसीतेसह. ३. सीतेचा पति जो राम त्याचा वियोग. ४. दारुणरोग. ५. दशरथाचे प्राण. ६. नरदेव.(राजा.) ७. द्विजशापानें प्राप्त मरण ज्याला. ८. सर्पापासून झालेल्या. ९. विषास. १०. क्रोध. ११. शोभायमान जो मेघ त्यासारखा. १२. जटाधारी. १३. महारोगाला. १४. सुखें. १५. जानकीस. १६. पूज्य. १७. लक्ष्मीरूपिणी जी स्त्री (सीता) तीतें हरण करणारा. (रावण.) १८. यश व वर यांचें पात्र म्ह० स्थान. १९. जन्ममरणभयरूप महा उष्णांत. २०. सीताप्राणवल्लभ. (राम.) २१. वायुपुत्र. (मारुति.) २२. लक्ष्मीपतीला. २३. मान्य. २४. कुबेराचा मित्र. (शिव.) २५ तरण्यास कठीण जें पाप त्यातें शमविणारा.

श्री राज्य नमनमात्रें अनुजसम यथार्थ मानराशि महा ।
[1]रजनिचरनायकानुज [2]अव्यय पावे बरा वरासि [3]महा. ॥ २०
[4]श्रीदाचा [5]खेचराधम अनुज तनयसोदरादिसहित मरे. ।
नैकेचि, जरि नयज्ञ स्वजनप्रिय म्हणति, 'नृपवरा ! शम रे !' ॥ २१
श्रीस्वीकारा मग करि, [6]जवन [7]वियद्यान वरुनि नभिं, राम ।
[8]अनुजसमय न विलंघी, जगदाश्रय, सगुणसंपदभिराम. ॥ २२
श्री ये पुरा, [9]महाजगदुदयचि [10]राज्याभिषेकमहकाळीं; ।
स्वजनीं प्रभुनयन, जसें सरतां वय सानुराग मन बाळीं. ॥ २३
श्रीदचि पुरामधिल जन, सुज्ञान, सदय, खरा पर महर्षी; ।
जलदोदय [11]वनजनयन, सर्व मयूरापरी परम हर्षी. ॥ २४
चोविस आर्यांचें हें रामायण, नाम यासि मंत्रमय. ।
अंतर्गतारिमारक, सार, कवि रचिल असें न यंत्र मय. ॥

## ४. [12]बालमंत्ररामायण.

(गीतिवृत्त.)

### बालकांड.

श्रीमान् दशरथ राजा, [13]शतमखसख, पुण्यकर्मपथसक्त, ।
ख्यात रविकुळीं झाला, हरिहरगुरुगोद्विजातिजनभक्त. ॥ १
[14]रामा बहु होत्या, परि पुत्र नसे, होय वृद्ध तो [15]साधी; ।
विधि[16]सुतकथितसुमंत्रप्रोक्तोपायें महामखा साधी. ॥ २
मखमुख्यवाजिमेधीं भागग्रहणार्थ देव जे आले, ।
ते म्हणति, 'विधे ! दशमुख आम्हांवरि नित्य घालितो घाले. ॥ ३

१. राक्षसांचा धनी जो रावण त्याचा कनिष्ठबंधु. (बिभीषण.) २. नाशरहित अशा. ३. मोठ्या. ४. कुबेराचा. ५. राक्षसांमध्यें अधम. (रावण.) ६. वेगवान्. ७. पुष्पकविमान. ८. चवदा वर्षें संपतांच घरीं येईन अशी जी भरताशीं प्रतिज्ञा केली होती ती. ९. मोठ्या जगताचा उदय. १०. राज्याभिषेकरूप उत्साहकाळीं. ११. कमलाक्ष. (राम.) १२. या रामायणांत **'श्रीराम जयराम जयजयराम'** हा त्रयोदशाक्षरी मंत्र साधिला आहे. तो बालकांडांत प्रत्येक गीतीच्या पहिल्या चरणाच्या पहिल्या अक्षरांत, अयोध्याकांडांत दुसऱ्या अक्षरांत, याप्रमाणें क्रमानें शेवटच्या उत्तरकांडांत सातव्या अक्षरांत आहे. अशीच रचना पंतांनीं 'मंत्ररामायणां'तही केली आहे. तें मंत्ररामायण यापेक्षां मोठें असल्यामुळें यास **'बालमंत्ररामायण'** असें नांव दिलें आहे. प्रत्येक कांडांत तीन मंत्र, असे एकंदर यांत २१ मंत्र आहेत. १३. इंद्रमित्र. १४. स्त्रिया. १५. दुःखी. १६. नारद.

जन्या[1] अक्षम[2] आम्हीं, त्याच्या नाशा उपाय योजावा; ।
अनपत्य दशरथ हि कीं याचा जो काय आधि[3] तो जावा.' ॥ ४
यज्ञेशातें ब्रह्मा प्रार्थी, सुयशें जगासि ताराया; ।
'देवा! दशरथसुत हो, दुष्टा दशकंधरासि माराया. ॥ ५
रावण, नरकपि न गणुनि, इतरांपासूनि अभयवर यांची[4].' ।
करिशील हानि युद्धीं होउनि तूं श्रीनिवास नर याची.' ॥ ६
मधुमथन 'अवश्य' म्हणे. त्यावरि पुत्रेष्टि ऋष्यशृंग करी. ।
तत्तेजें, मंत्रबळें, नृपभाग्यें, होय कर्मसिद्धि बरी. ॥ ७
जलजाचा बंधु तसा शिखि[5]कुंडांतुनि निघे पुरुष भव्य. ।
तो हेमपात्र राया दे, पायस ज्यांत अमृतसें नव्य. ॥ ८
यज्वा म्हणे तिघींतें, 'करुनि उचित भाग तें सुपायस खा.' ।
सदनुग्रह जेंवि तसा कोण करिल इष्ट करसुपाय सखा? ॥ ९
जगतीपतिच्या भार्या त्या प्राशुनि दिव्य पायसा धाल्या. ।
कौसल्या कैकेयी ससुमित्रा गर्भिणी तिघी झाल्या. ॥ १०
यम यक्षप[6] शक्र वरुण पवन दहन रवि असे अमर जे, ते ।
विधिवचनें जनु[7] अंशें वानरयोनींत जाहले घेते. ॥ ११
राक्षसराजवधार्थी प्रभुला झाले सुखें सुर सहाय. ।
कीं नादृत तो सेवारूप म्हणविल चि मुखें सुरस 'हाय!' ॥ १२
महिषी[8] कौसल्या ज्या शुभ समयीं प्रसवली, तया राम ।
ऐसें दशरथ ठेवी नाम सविधि, जें सुसिद्धिचें धाम. ॥ १३
श्रीसंपन्ना प्रसवे कैकेयी ज्या सुता, तया नाम ।
भरत असें ठेवी, सुरतरुपुष्पांचें उणें करी दाम. ॥ १४
राकेश[9]मुखी प्रसवे ज्यांसि सुमित्रा, तयां सुतां नामें ।
लक्ष्मण शत्रुघ्न अशीं ठेवी नृप, पूर्ण होय तो कामें. ॥ १५
मह्यमरांतें[10] अर्पी रत्नालंकार, हेम, गज, वाजी. ।
भूप म्हणे, 'बळ दास्या द्या, करतिल पुत्र हे मग जवा जी!' ॥ १६
जन्मापासुनि देती निजमूर्तिसमृद्धि साधुरीतीस. ।
पितरांच्या इतरांच्या प्रीतिस जी कीर्ति माधुरी तीस. ॥ १७

---

१. युद्धास. २. असमर्थ. ३. मनोव्यथा. ४. मागे. ५. अग्नि. ६. कुबेर. ७. जन्म. ८. राणी. ९. पूर्णिमापति. (चंद्र.) १०. भूदेव. (ब्राह्मण.)

[1]यक्षपसखप्रभावें आचार्यें साधु पढविले चवघे. ।
अवघे [2]सुरगुरु गमती; अमृतरसाची च भूप तो चव घे. ॥ १८
राशि तपाचा [3]गाधिज भेटे राजा, [4]धनाधिपा शिवसा. ।
ज्या मुनिपुढें रवि तसा होय, जसा पूर्णचंद्रमा दिवसा. ॥ १९
'मन्मख रक्षाया दे राम सलक्ष्मण' म्हणे असें ऋषि, तें ।
दुष्कर गणिलें भूपें; द्यावें जल आकुलें कसें तृषितें? ॥ २०
जगतीश्वरासि न रुचे, रुचलें सुतदान तत्प्रभावज्ञा ।
रघुकुलहिता वसिष्ठा, कीं न हिता होय [5]सत्प्रभावज्ञा. ॥ २१
यजमाना बोधुनि तो विप्रांच्या तनय देववी राजा. ।
कीं त्या अयश नसावें, म्हणती उचितज्ञ देव वीरा ज्या. ॥ २२
जय दे, अस्त्रें शत दे मुनि, मग मारूनि ताटिका चंडी, ।
सिद्धाश्रमांत राघव मारीचसुबाहुगर्वशिर खंडी. ॥ २३
यजन समाप्त करुनि, गुरुसह जाय प्रभु पुरासि जनकाच्या. ।
[6]मुनिदारोद्धृति रुचवी मतिस, [7]उपनिषत् जशीच जन काचा. ॥ २४
राहु [8]परार्कांचा तो शिवचाप सलील खंडिला रामें. ।
अनुरूपा श्रीसीता वरिली, जैशी रति प्रिया [9]कामें. ॥ २५
[10]महितगुण लक्ष्मण वरी जनकाची उर्मिळाभिधा कन्या. ।
भरतासि मांडवी, श्रुतकीर्ति रिपुघ्नासि पाणि दे धन्या. ॥ २६
श्रीदसमानसभाग्य क्षितिपति दशरथ मयूरसा हर्षे. ।
जनकमहाराजमणी स्वर्णप्रेमाश्रु मेघसा वर्षे. ॥ २७
राहुनि, विवाह करवुनि, सर्वांस पुसूनि, गाधिसुत गेला. ।
त्यावरि महा अनुग्रह, आग्रह करुनी, स्वयें असा केला. ॥ २८
मनुजेश्वर दशरथ मग, जनकास पुसोनि, दारसुतसहित ।
मिथिलापुरीहुनि निघे, जो या विश्वांत शक्रसा महित. ॥ २९
जगदीश्वरपितृत्वें बहु मानी सुरसभा जनकराजा. ।
पात्र दशरथा करि त्या स्तुतिस, सुधासुरसभाजन करा ज्या. ॥ ३०
यतिमति, विरक्त, परि तो जनक प्राकृत तसा बराचि रडे. ।
श्वशुरा सुता निरवितां, बहु वाहुनि दुःखगिरिभरा, चिरडे. ॥ ३१

१. कुबेराचा मित्र शिव याच्या सारखा बुद्धिप्रभाव ज्याचा. २. बृहस्पति. ३. विश्वामित्र. ४. कुबेराला. ५. सज्जनांचे प्रभेचा अपमान. ६. अहल्योद्धार. ७. 'उपनिषत्' शब्द संस्कृतांत स्त्रीलिंगी आहे. ८. शत्रुरूपी सूर्यांचा. ९. मदनानें. १०. पूज्य.

**रा**हे पहात, पावुनि दूर पथीं, निजपुरासि मग परते ।
तो वेदांती, मानसर्कासारीं जेंवि हंसखग परते. ॥ ३२
**भं**दनारिधनुर्भंगें कोपे **भृ**गुराम, काळसा वाटे. ।
फाटे **द**शरथहृदय त्रासें, जें जळ मुखस्थ तें आटे. ॥ ३३
**जं**मदग्निसुत, धरुनि पथ, उँग्राचा शिष्य, उग्रमति, राहे. ।
पूजायी **द**शरथ कुळगुरुसह ये जवळ जरि, परि न पाहे. ॥ ३४
**थं**वस क्षत्रियकुळशत यत्परशुदत्तानळा, तया **रा**मा ।
नमुनि श्रीराम पुढें ठाके, सांगूनि आपुल्या नामा. ॥ ३५
**ज**रि मृदुलप्रकृति प्रभु, तरि दावी **रा**म उद्धतत्वातें. ।
त्या विभु कळवी, चढवुनि **ना**रायणचाप, शुद्ध तत्वातें. ॥ ३६
**यं**तकोप **प्र**भु, जोडुनि शर, तदनुमतें तदीय धर्मातें ।
खंडी, तया अमोघें त्यास हि देता प्रताप शर्मातें. ॥ ३७
**रा**ग न धरुनि, वरुनि शम, **भृ**गुराम **म**हेंद्रपर्वता गेला. ।
स्वपुरप्रवेश निर्गतमोहें, मुदितें, नृपोत्तमें केला. ॥ ३८
**म**ग आजा भेटाया, **श**त्रुघ्नयुता प्रिया सुता **भ**रता ।
मातुलसह नृप धाडी, ज्याची स्तुत्या सुरोत्तमा नरता. ॥ ३९

---

## अयोध्याकांड.

तो **श्री** मच्चूडामणि **द**शरथ नृप यौवराज्य **रा**मातें ।
द्याया उद्यत झाला, रुचलें **र**घुकुळविभूतिधामा तें. ॥ १
दा **रा** दयिता **प्र**भुची, तीतें दुर्बुद्धि **मं**थरा शिकवी; ।
विघ्न करी अभिषेका; झाला असमर्थ सत्यराशि कवी. ॥ २
स **म** यज्ञा **कै**केयी हित समजुनि **मं**थरामतिस लागे. ।
वन **रा**मा, राज्य सुता, दोन असे पूर्वदत्त वर मागे. ॥ ३
नि **ज** सत्यरक्षणपरें भूपें बहु विनविली, परि खवळली ।
स्ववशा हि न ती पतिला **कै**केयी द्यावया हेरिख वळली. ॥ ४
सु **य** शोरत **रा**म शिरीं घेता झाला तशी तदाज्ञा ते; ।
धन गुरुसुतादिविप्रांप्रति वांटी; म्हणति 'हा!' तदा ज्ञाते. ॥ ५

---

१. सरोवरांत. २. शिव. ३. भयानें. ४. परशुराम. ५. शिवाचा. ६. गवत. ७. दमन केलें आहे रागाचें ज्यानें. ८. सुवाला. ९. हर्ष.

वा **रा** या न शके, मग बंधुस **सी**तेस, उचित मानुनि, घे. ।
स्वगुरुजनासि पुसाया, हर्षें **र**विवंशपद्मभानु निघे. ॥ ६

स **म** जावुनि मातेसह सुमति **सु**मित्रेस, अनघ रागेला ।
नमना **कै**केयीच्या, तो भक्तमयूरघन, घरा गेला. ॥ ७

नि **ज** जनका **रा**म म्हणे, 'दे आज्ञा, पाय वंदितों बा! हे. ।
राहे लक्ष्मण न, पुरी सिद्धा **सी**ता हि जाहली आहे.' ॥

भ **य** सोडुनि, **कै**केयी निर्दयहृदया करी महा जाच. ।
ती श्री**रा**मासि म्हणे, 'चवदा वर्षें वनीं रहा, जा च. ॥ ९

द्वि **ज** वन्यवृत्ति जैसा, चवदा वर्षें तसाचि हो, राजा ।
सत्यव्रत, तूं जाशिल, मग जेविल; आजि भव्य होरा[1], जा.' ॥ १०

प **य** देणारी विष दे, नेसाया वल्कलें पुढें ठेवी. ।
लोभें भ्रमली बहुतचि, अतिकठिणा राक्षसी च ती देवी. ॥ ११

ये **रा** ग, गुरु म्हणे, 'तें टाक चि वल्कल, न तूं मुली! नेस. ।
मत्सुवचन ईस नसो मान्य, असावें चि तुज कुलीनेस.' ॥ १२

न **म** नीं तात रडविला, **कै**केयीहून अन्य ज्या माता. ।
क्षिप्र निघे **ज**नकाचा, स्वकुळ करायासि धन्य, जामाता. ॥ १३

ने **श्री** **रा**मासि रथीं राजाज्ञेनें **सु**मंत्र वाहून. ।
आबाळ पौर रडले वल्कलधरसानुजासि पाहून. ॥ १४

पौ **रा** नुराग भारी, निजल्या ठायीं तयांसि सोडून, ।
त्यांतुनि हळुच निघे **प्र**भु, वंचित[3]भक्तांसि हात जोडून. ॥ १५

अ **म** रनदीच्या तीरीं **प्र**भुसि सखा **गु**ह निषादवर विनवी. ।
**रा**म म्हणे, 'तातप्रिय तर्पी, फलतृप्ति यांत बरवि नवी.' ॥ १६

'भ **ज** जा **प्र**भुसि च,' ऐसें म्हणुनि, **सु**मंत्रासि पाठवी मागें. ।
उतरी **गु**ह **गं**गेतें, **प्र**भु त्यासि म्हणे, 'रहा पथीं जागे.' ॥ १७

जा **य**, **भ**रद्वाजातें वंदुनि, तत्कथितवनपथें तरुनी ।
**य**मुनेसि, **चि**त्रकूटा, मुनिसह **वा**ल्मीकितें नमन करुनी. ॥ १८

आ **रा** मीं तेंवि वसे **ल**क्ष्मणरचितोट[5]जीं सदार सदा. ।
होय मुनिसभा **रा**मा, जैशी ते कीर्ति कवि सदा, रसदा. ॥ १९

---

१. मुहूर्त. २. सत्वर. ३. फसविलेल्या. ४. बागेंत. ५. पर्णशालेंत.

स **म** जुनि **गु**हपौरुषोक्त **प्र**भुवृत्त, **सु**मंत्र फिरुनि ये, **न**गरीं ।
पिहितमुख शिरे; दुःसह ताप जसा नृपगृहीं तसा **न** गैरीं. ॥ २०
ॐ **ज** सुत, **कौ**सल्येतें शाप कथुनि, रात्रिमाजि तो साव्या ।
व्यसु होय पुत्रशोकें; त्या गतिला शत विपत्ति सोसाव्या. ॥ २१
ल **य** होतां **प्र**भुचा, ज्या आप्तदशा त्या कदापि **न** वदाव्या. ।
आला **भ**रत स्मरत **प्र**भुतें दिवशीं पुरासि चवदाव्या. ॥ २२
तो **ज** ननीतें निंदी, **कौ**सल्येतें स्तवी, पदें नमुनी. ।
पितृहित करी, न महि घे, 'घे' हें न पुन्हा म्हणे, वदे न मुनी. ॥ २३
न **य** धर्मज्ञ **भ**रत तो गुरुजननीसचिवपौरजनयुक्त ।
जाय **वि**भुकडे, त्या अतिपापापासूनि व्हावया मुक्त. ॥ २४
मा **रा** या जातो हें मानुनि, धरि **गु**ह निषाद वाटेतें. ।
काय वदावें ? **भ**रता त्या स्वापयशें विषाद वाटे तें. ॥ २५
सा **म** **गु**हाशीं करि, मग सेना ने तो कवि **प्र**यागा ती. ।
समजे मुनि हि **भ**रत अतिशुचि; सोडुनि शोक, विप्र या गाती.॥२६
स्व **श्री** स **भ**रद्वाज प्रगटी; **रा**मानुजा सपरिवारा ।
पूजी; न अहंकृतिचा लागों दे मानसास परि वारा. ॥ २७
सा **रा** जो विश्वाचा थारा, नेता भवाब्धिच्या पारा, ।
त्या **भ**रत **चि**त्रकूटीं भेटे **रा**मा क्षमादयागारा. ॥ २८
तो **म** रण **द**शरथाचें ऐकुनि, सानुज सदार 'हा तात !' ।
ऐसें म्हणे; दयाश्रित सानंद भवीं सदा रहातात. ॥ २९
नि **ज** शोकें व्यसु झाला जनक म्हणुनि फार पावला शोक. ।
तो करि पिंडजलांजलिदानादिक, करिति जें सदा लोक. ॥ ३०
द **य** मानमानसा त्या **प्र**भुसि म्हणे, पाय धरुनि, तो **भ**रत ।
'परत, स्वपुरा ये बा ! या च पदीं मी, पदीं दुजा, न रत.' ॥ ३१
त्या **रा** जीवाक्ष म्हणे, 'हा धर्म नव्हे लहान, चवदावें ।
सरतांचि वर्ष, येइन वत्सा ! त्वां म्यां हि हा न च वदावें. ॥ ३२
श्र **म** राज्यभरोद्वहनें, श्रीगुरु ससचिव असे परि सहाय; ।
बा ! लाविशिल म्हणाया **का**मप्रमुखां हि तूं अरिंस हाय.' ॥ ३३

---

१. कठिण. २. आच्छादित. ३. विर्षात. ४. दशरथ. ५. मृत.

द्वि **ज** **रा**वणनिधनार्थी ज्ञाते तेथील ते हि **भर**तातें ।
म्हणति, 'वहावा चि दिला दुर्वह हि चतुर्दशाब्द भर तातें.'॥ ३४
प्र **य** तमति म्हणे, 'टळतां अवधी, ज्वलनांत काय होमीन. ।
**गं**गाऱ्हदविरहातें साहुनि, वांचेल काय हो मीन ? ॥ ३५
म **ज** ला श्रीचरणाब्जस्पृष्टा दे पादुका तरायास. ।
योगक्षेमसमर्था या करितिल विरहकातरा यास.' ॥ ३६
श्रे **य** प्रियभक्ताचें करि, देउनि पादुका, दयाजलधी. ।
**कै**केयीतें हि नमुनी **राम** म्हणे, 'न च धरू तुझी मल धी.'॥ ३७
वा **रा** सार करुनि, तो **भर**त परतवूनि, **ऐं**द्रिकाकातें[२] ।
शिक्षुनि, तेथूनि निघे **राम** कराया प्रहृष्ट नाकातें[३]. ॥ ३८
श **म** धन अत्रि **प्र**भुतें पूजी, त्याची महासती भार्या ।
**सी**तेसि अलंकारी, सत्कीर्ति जशी तशी च ती आर्या. ॥ ३९

---

## अरण्यकांड.

भव्य **श्री** **राम** प्रभु, ज्याच्या हृदयीं उदंड कारुण्य, ।
प्रमुदित करी प्रवेशें तापससंकीर्ण **दं**डकारण्य. ॥ १
न **वि** **रा** धराक्षसास चि, हित इतरां सर्व तापसां गमला. ।
जो **प्र**भु दीनासि म्हणे, 'हरितों निःशेष ताप, सांग मला.'॥ २
पर **म** भयंकर राक्षस **सी**तेसि धरी, हरी; तया बाण ।
**प्र**भु हाणुनि सोडवि, ते क्षिप्र करिति **जा**नकीपरित्राण. ॥ ३
तो त्या **ज** नकसुतेतें सोडी, श्री**राम**लक्ष्मणांसि धरी; ।
स्कंधीं शिशुसे वाहे, जाय वनीं, ती सती विलाप करी. ॥ ४
सप्रि **य** ते **दा**शरथी चंद्रार्क, स्पष्ट तो गमे **रा**हू. ।
खड्गवरांहीं त्यांहीं त्याचे तत्काळ खंडिले बाहू. ॥ ५
**प्र**भु **रा** जराजशापापासुनि त्या **तुं**बरासि[४] करि मुक्त. ।
**श**रभंग मुनिस भेटे, तो पूजी, स्तवुनियां कथी युक्त. ॥ ६
निर्धू **म** ज्वलनीं तनु होमुनि, मुनि दिव्यरूप तो होय. ।
त्या दहन तसा, **च्य**वना[५] **द**स्रौषधिसिद्धितें[६] जसें तोय. ॥ ७

---

१. भितरा. २. काकरूपी इंद्रपुत्रातें. ३. स्वर्गातें. ४. कुबेर. ५. ऋषिविशेष. ६. अश्विनीकुमार.

कंज[1] **ज** **शक्र** विमानीं बसवुनि, त्या **ब्रह्मपूर्व** लोकातें ।
घेउनि गेले, **श्रीमत्प्रभु**दर्शनहर्षवीतशोकातें[2]. ॥ ८
अभ **य** ऋषींतें **प्रभु** दे, राक्षसहत विप्र बहुत पाहून. ।
**जनकसुतेतें** सांगे 'भूताहितहनन[3] बहु तपाहून.' ॥ ९
अव्या[4] **ज** दय **प्रभु** मग, जेंवि चकोरासि चंद्रमा निववी, ।
तेंवि सुतीक्ष्णमुनीतें[5]; दर्शन याचें चि नित्य संस्तववी. ॥ १०
त्रिस्म **य** पावे **प्रभु**वर, ऐकुनियां वाद्यगीतनाद सरीं; ।
स्वर्गणिकांहीं[6] दिधला उग्रतपा **मां**डकर्णि[7] मोहकरीं. ॥ ११
प्रख **रा** सिचापशरधर **राम** प्रभु **दं**डकाननीं हर्षें ।
क्रमिता झाला, तापसजनसत्कृति करुनियां, दहा वर्षें. ॥ १२
प्रथ **म** भ्रात्यातें, मग घटजातें[8] **राम** भेटला, भावें. ।
त्या मुनि म्हणे, 'तसें हें, जेंवि समुद्रांत बेट लाभावें.' ॥ १३
देत्या **श्री** **रा**मातें हरिदत्तें सर्व **वै**ष्णवें शस्त्रें; ।
जैशीं दिधलीं पूर्वीं राक्षसविजयार्थ **गा**धिजें अस्त्रें. ॥ १४
मुनि **रा** जानुमतें तो **प्रभु** **पं**चवटीस जाय, तों वाटे ।
पितृसख[9] **ज**टायु भेटे, प्रिय साक्षाज्जनकसा चि तो वाटे. ॥ १५
सप्रे **म** म्हणे त्यातें **प्रभु**, 'हें स्वकुटुंब, या जपा, सून ।
तुमची **सी**ता, ईतें पाळा गहनांत आजपासून.' ॥ १६
अंड[10] **ज** पतिस पुसोनि, **प्रभु** **पं**चवटींत राहिला उटजीं. ।
जैसा संतानींचा[11] दिव्य मधुपराज पुष्पितीं कुटजीं[12]. ॥ १७
दुर्न **य** **द**शमुखभगिनी जी **शू**र्पणखा, दुराशया, रंडा, ।
झाली भाजन नासाकर्णयुगच्छेद या महा दंडा. ॥ १८
अम[13] **रा** रि **खर**, **त्रिशिरा**, **दू**षण, इत्यादि राक्षस क्रूर ।
चवदा सहस्र वधिले **रा**में, दुःसह हरीस[14] जे शूर. ॥ १९
हेम **म** य मृगामागें **प्रभु** दयिताप्रिय करावया लागे. ।
'हा **सी**ते! हा **लक्ष्मण**!' ऐसें तो असुहरेषुहत[15] गांगे[16]. ॥ २०

---

१. ब्रह्मा. २. श्रीरामाच्या दर्शनाच्या आनंदानें गेला आहे शोक ज्याचा. ३. सर्व भूतमात्राच्या शत्रूचें हनन. ४. निष्कपट आहे दया ज्याची. ५. मुनिविशेष. ६. अप्सरा. ७. ऋषिविशेष. ८. अगस्त्यऋषीला. ९. बापाचा मित्र. १०. जटायु. ११. कल्पवृक्षावरचा. १२. कुड्याचे झाडावर. १३. राक्षस. १४. इंद्राला. १५. प्राणहारक बाणानें विद्ध. १६. ओरडे.

सीता ज वळुनि दवडी सौमित्रिस, तों चि दशमुखें हरिली. ।
ती क्षण सोडवुनि, रणीं सत्कीर्ति सुगति जटायुनें वरिली. ॥ २१
निर्द य, निस्त्रप[1], रावण नेउनि ठेवी तिला अशोकवनीं. ।
ती त्यासि म्हणे, 'यावें सुकवीच्या सुयश रे! पशो! कवनीं.' ॥ २२
स्वोट ज शून्य विलोकुनि, हाय म्हणे प्रभु, फिरे सशोक वनीं. ।
जो दुःखभर, सविस्तर आला वाल्मीकिच्याच तो कवनीं. ॥ २३
'अन य ज्ञें दशवदनें सीता,' इतकें वदोनि जो मेला, ।
प्रभु त्या तातसख्या[2] जल देउनि, हुडकित पुन्हा वनीं गेला. ॥ २४
प्रभु रा नांत भ्रमतां, धरि योजनभुज निशाचर कबंध. ।
त्याचे बाहु छेदुनि, करुणार्णव चुकविती नरकबंध. ॥ २५
तो सु म ति होय राक्षस, 'कोण तुम्ही? काय या वनीं कार्य?' ।
ऐसें पुसे तयांतें; सांगे सौमित्रि ऋजुमना[3] आर्य. ॥ २६
सांगे श्री मंतांतें पुशिलें निजवृत्त तो हि, शापाच्या ।
अंतातें जाणुनि, दनुदानव[4] नाशार्थ शेषपापाच्या. ॥ २७
'रुचि रा कृति मी होतों, उग्राकारें मुनीस भय भारी ।
देता झालों; शापी स्थूळशिरा मुनि; न रूप मज तारी. ॥ २८
हें म म वृत्त; असा मी झालों शक्राशनिप्रहारानें[5]; ।
दाहोत्तरकार्य करिन; शोधाल म्हणत पुन्हा न हा रानें.' ॥ २९
त्याचा ज गदीश करिति दाह वनीं, तों चि दिव्य रूप धरी. ।
बसुनि विमानीं, प्रभुला सांगे इष्टाप्तिहेतु युक्ति बरी. ॥ ३०
'रामा! य मनियमवती, सुमति, मतंगाश्रमीं असे शबरी; ।
दे दर्शन तीस, जिला भेटि तुझी, गति तशी गमे न बरी. ॥ ३१
प्रव रा सरसी पंपा, संपाया ताप, मग पहा धीरा! ।
नग[6] ऋष्यमूकनामा, जवळ चि आहे रघूत्तमा! वीरा! ॥ ३२
तेथें म नुजश्रेष्ठा! वानर आहेत पांच, रवितनय ।
सुग्रीव तयांत वसे, तो रामा! योग्य तुज सखा सनय.' ॥ ३३
ऐसें ज लदश्यामें रामें ऐकोनि, तो दनु स्वर्गा ।
पाठविला; हें प्रभुचें निरुपम कारुण्य आवडे भर्गा[7]. ॥ ३४

---

१. निर्लज्ज. २. जटायूस. ३. ऋजु, सरळ. ४. दनुनांवाचा राक्षस. ५. वज्र. ६. पर्वत. ७. शिवाला.

हृद **य** द्रवेल, गाइल साधुसभा आत्मपद यश बरी, तें ।
चरित कराया भेटे, होउनि अत्यंत सदय, शबरीतें. ॥ ३५

ती पू **ज** न करुनि म्हणे, 'रामा! मद्गुरु मतंग मुनि गेला ।
सत्यपदाप्रति जेव्हां, धन्य तुवां चित्रकूट नग केला. ॥ ३६

सुश्रे **य** मला गुरुनें कथिलें, तें सिद्ध जाहलें आजी. ।
तृप्ता केली, होती करुनि, जशी चातकी तशी, आ जी.' ॥ ३७

सद **रा** तिन्ना प्रभुला पंपापथ कथुनि, गुरुकडे जाया, ।
राया नमुनि रघूंच्या, होमी ज्वलदग्निमाजी ती काया. ॥ ३८

होय **म** हित रूप तिला प्राप्त वर विमान, सत्यलोक मग; ।
सानुज पंपा पावे तो श्रीराम स्वभक्तकल्पनग[1]. ॥ ३९

---

## किष्किंधाकांड.

सुखदा **श्री** पंपेची, परि झाली प्रभुमनीं असुख रचिती; ।
इतरांचे तों, तैशा विरहीं, तत्काळ ती असु खरचिती. ॥ १

'हा सीते! **रा**[2] कापतिमुखि[3]! सुख मज तव समागमें होतें; ।
कोणी न म्हणे, म्हणतों पुनरपि कर नवस, माग, मी हो तें.' ॥ २

बहु स **म** जावी लक्ष्मण; मग तेथुनि ऋष्यमूकगोत्रींस[4] ।
जाती; त्यांतें पाहुनि पावे सुग्रीव कीशें[5] तो त्रास. ॥ ३

वातात्म **ज** पाठविला सुग्रीवें; विप्रवेष तो यातें ।
भेटे, पावोनि निवे, पांथ बहु तृषार्त जेंवि तोयातें. ॥ ४

तो आश **य**, वृत्त पुसे, लक्ष्मण सांगे तयासि, तो वाहे ।
स्कंधीं, करि सुगळाशीं भेटि, कपिप्रभु हि बहु सुखा लाहे. ॥ ५

त्या[6] भास्क **रा** त्मजाशीं प्रभुशीं शास्त्रोक्त सख्य तें झालें; ।
आलें मनास रविच्या; शक्राचें चित्त हर्षलें, भ्यालें. ॥ ६

दोघे स **म** सुखदुःख, प्रिय कार्य करावया, प्रतिज्ञा ते ।
करिते झाले, स्वयशें सुखवाया सज्जनांप्रति ज्ञाते. ॥ ७

'नेली र **ज** निचरें स्त्री अनुमानें जानकी असें जाणें; ।
अस्मच्छ्रुतीस[7] वांटित गेली ती रामनाम हीं वाणें. ॥ ८

---

१. कल्पतरु. २. शोभा. ३. हे चंद्रवदने. ४. पर्वतास. ५. वानर. ६. सुग्रीवाशीं. ७. वायनें.

रुचिच[1] **य**, मणिकांचनमय, दिव्य, अलंकार उत्तरीयपटीं ।
बांधुनि, सोडुनि गेली, आम्हां कीशांत, याचि अद्रितटीं. ॥ ९
**रा**मा! या **जे** गतीधरकुहरीं[2] ते नग[3] तसे चि आहेत.' ।
**प्र**भु त्यासि म्हणे, 'दाखिव, आण अलंकार, पुरविं हा हेत.' ॥ १०
**सीताप्रि य** नग पाहे **राम**; म्हणे '**लक्ष्मणा**! पहा बा! हे. ।
तो नेणे इतर. म्हणे, 'जाणें नूपुर चि यांत हें आहे.' ॥ ११
साश्रु उ **रा** शीं **प्रभु** धरि, भिजवी शोकोदकें समस्त नग; ।
हारासि म्हणे, 'हा! तूं भाग्यें होतासि मजसम स्तनग[4]. ॥ १२
बा! सांगें **म** ज, नेली कोणिकडे राक्षसीं प्रिया माजी? ।
त्या वधिन सपरिवारा. मज युग ती, येतसे त्रियामा[5] जी.' ॥ १३
**सुगळ श्री** रामातें, अश्रु पुसुनियां, म्हणे, 'तया अरितें ।
नेणें; भेटविन तुज स्त्रीरत्न, करूनि यत्न, मी परि तें. ॥ १४
माझी ही **रा** जसुता! स्त्री हरिली **वा**ळिनें, तदपि धीरा ।
मी कपि हि त्यजित नसें, तूं कां त्यजितोसि पंडिता! वीरा?' ॥ १५
त्याप्रति **म** नुजवर म्हणे, 'करितों बा! प्रथम मी तुझ्या कार्या; ।
शोधाया मद्दयिता मग करशील प्रयत्न तूं आर्या!' ॥ १६
**प्र**भु बी **ज** पुसे तैशा वैराचें; **सु**गळ तो असें कळवी; ।
'मायावी असुर, तया **वा**ळी भंगूनि संगरीं पळवी. ॥ १७
तो सभ **य** शिरे विवरीं, द्वारीं ठेवूनि मज, तयामागें ।
शिरला **वा**ळी हि, जसा व्याघ्र चि व्याघ्राचिया वधा रागें. ॥ १८
संवत्स **रा** उपरि ये रक्ताचा विवरभरि महापूर; ।
शब्द न पडतां कानीं, गमलें वधिला चि शत्रुंनीं शूर. ॥ १९
शोकें भ्र **म** लों, विवरद्वारीं ठेवूनि गिरिधरा आलों; ।
रडलों; अभिषेकीं मी वश सचिवांच्या दुराग्रहें झालों. ॥ २०
तो **वा**ळी, **ज** यशाली, ये, मज पाहुनि पदीं, भरे रागें.' ।
'अंगें मारीन' म्हणे. 'भ्रमलों सर्वत्र, लागला मागें. ॥ २१
हा आश्र **य** निर्भय नग मज; कारण सांगतों तुला याचें. ।
**वा**ळी बळजलधि[6], मथन करि **दुंदुभि**नामका लुलायाचें[7]. ॥ २२

१. शोभापुंज. २. पर्वतगुहेंत. ३. दागिने. ४. स्तनावर लोळणारा. ५. रात्र. ६. समुद्र. ७. रेड्याचें.

त्यातें यो **ज** न उडवी, तद्बळदर्पासि निंदुनि, करानें; ।
आश्रम मतंगमुनिचा भरला तद्रक्तबिंदुनिकरानें. ॥ २३

क्षुब्धाश **य** मुनि शापी, 'तो वाळी मूढ ऋष्यमूकनगीं ।
व्यसु हो प्रवेशतां ची, क्षम कोण मदुक्तलंघनास जगीं ?' ॥ २४

**वाळिप रा** क्रम परिसुनि, पादांगुष्ठें शरीर दश गांवें ।
प्रभु दुंदुभिचें उडवी, ज्याचें शेषें असीम यश गावें. ॥ २५

एके चि **म** हाबाणें प्रभु भेदी सप्तताल भूमितळ; ।
वाळिवधीं संप्रत्यय होउनि वर्णी सुकंठ रामबळ. ॥ २६

वाळीतें **श्री** राम प्रभु मारायासि सिद्ध होय. मग ।
सुगळासि म्हणे 'हटिक, त्वदेहित मद्बाणविद्ध हो यमग. ॥ २७

तो सम **रा** येतां, प्रभु एकेचि शरें तया उरीं ताडी, ।
पाडी, तद्राज्यश्रीस्त्री भोगायासि तदनुजा धाडी. ॥ २८

वानर **म** हाबळ अमित सुग्रीवें आणवूनि भेटविले. ।
त्यांचे प्रतापदहन प्रभुपवमानें पळांत पेटविले. ॥ २९

सुरारा **ज** दिशेसि विनत, वरुणदिशेतें सुषेण पाठविला; ।
धनददिशेतें शतबळ; सुग्रीवें पण मनांत आठविला. ॥ ३०

तैसेचि **यं** मदिशेतें जांबवदंगदमरुत्सुतादि कपी ।
धाडी, मास अवधि करि, कीं प्रभु विरहार्त जळ हि नीट न पी.॥

शोधुनि **रा** जसुतेतें विनतादिक परतले, श्रमुनि आले; ।
वाळिसुतादि, अवधितें लंघुनि, चिंतार्त शासना भ्याले. ॥ ३२

म्हणति, '**म** रावें; दुस्तर सागर पाहोनि, बोलिले, 'हाय!' ।
धन्य जटायु प्रभुच्या जेणें कार्यार्थ वेंचिला काय. ॥ ३३

त्या, अनु **ज** मरण परिसुनि, कीशांसि पुसे जटायुचा भ्राता. ।
संपातिनामका त्या अंगद कथि वृत्त, सुत जसा ताता. ॥ ३४

अर्पून तो **य** भ्राल्या; सांगे निजवृत्त, जानकीशोध. ।
तो धर्मज्ञ म्हणे, 'मज साधुनिशाकरमुनींद्र करि बोध. ॥ ३५

कथितां **ज** नकसुतेची वार्ता तच्छोधकांसि, तुज लक्ष ।
दक्ष स्तवितिल, होतिल रवितेजें दग्ध भव्य नव पक्ष. ॥ ३६

---

१. समूहानें. २. मृत. ३. योजनें. ४. सुग्रीव. ५. शत्रु. ६. मृत. ७. पूर्वेस. ८. पश्चिमेस. ९. उत्तरेस. १०. दक्षिणेस.

**सीता प्र य** ता दिसती मजला **लं**कापुरीं अशोकवनीं; ।
शत योजन पाहतसे गृध्र; करा यत्न, जा, तिच्या अवनीं.' ॥ ३७

गृध्रव **रा** नें ऐसें सांगुनि, होउनि सपक्ष, हर्षानें ।
केलें गमन, निववविले कपि सर्व, जसे मयूर वर्षानें[1]. ॥ ३८

**मारुति म** हेंद्रशिखरीं चढला, ऋक्षपकृतस्तवें[2] फुगला; ।
निजबळ कळतां, सद्यश मिळतां, राहेल कवि कसा उगला? ॥ ३९

---

## सुंदरकांड.

बळसिंधु **श्री मा**रुति, लंघुनि शतयोजनाब्धि तो, पैरा[3] ।
पावे **प्र**भुवरशरसा; ज्या अतिदुस्तर हि मार्ग सोपारा. ॥ १

हरुनि प **रा** क्रमलेशें **मा**रुति **लं**काधिदेवतातेजा, ।
शिरला पुरींत; तृणसे राक्षस, देवां द्विजांसि खाते, ज्या. ॥ २

**रावणधों म** विलोकुनि, पाहे **रा**मप्रिया अशोकवनीं. ।
तों तेथें तो खळ ये, तीतें प्रार्थूनि न्यावया भवनीं[4]. ॥ ३

धिक्कारी र **ज** निचरा तें, बैसुनि शिंशपानगीं[5], पाहे; ।
**मा**रुति मनीं म्हणे, 'हे **प्र**भुला योग्या महासती आहे.' ॥ ४

विफळप्र **य** त्न होउनि, **द**शमुख, जोडुनि महाघ[6], रागेला; ।
नव्हतां वश, 'गिळिन' असें वदुनि, न पावुनि मुहा[7], घरा गेला. ॥ ५

विश्वास पु **रा** या तो, **प्र**भुगुण गाऊनि, दे तिला मुद्रा[8]. ।
चूडामणिसह[9] **दे**वी **प्र**भु आणाया निरोप दे रुद्रा[10]. ॥ ६

मथुनि प्र **म** दवन, वधुनि बळ, अक्ष[11], म्हणे मनांत, 'कां पडला ।
दृष्टिस न **द**शमुख?' रणीं दाटुनि कपि घननरवासि[12] सांपडला. ॥ ७

नेला प्रभं[13] **ज** नतनय बांधुनि राक्षससभेसि, बोलविला; ।
बोलुनि **सु**रमुनिमस्तक शतवार सकंपसा चि डोलविला. ॥ ८

'श्रीरामप्रि **य** सख हो, देतो जें दास 'दे' वदे, वद या ।
'शरणागता मज अभयदाता तूं,' करिल **दे**वदेव दया. ॥ ९

प्रबळ स्त्री **ज** नकसुता; न शिवावें तापल्या पहारेतें. ।
अतिहित या ही त्या ही लोका ही आपल्या पहा रे तें. ॥ १०

---

१. वृष्टीनें. २. जांबवंतानें केलेल्या स्तुतीनें. ३. पलीकडील बाजूस. ४. घर. ५. सिसव्याचे झाडावर. ६. मोठें पाप. ७. आनंद. ८. अंगठी. ९. मूद. १०. मारुतीला. ११. रावणाच्या पुत्राचें नांव. १२. इंद्रजिताला. १३. मारुति.

**प्र**भुचें प्रि **य** वस्तु[1] कधीं न जिरे, साजे चि ना पद[2]क चोरा; ।
अनुभविल केशराचें कैसें रे राक्षसा! पद कचोरा[3]?' ॥ ११

इत्यादि ब **रा** रागें भरुनि वदे, तें न त्या खळा साहे. ।
पाहे असिस, म्हणे तों त्या तदनुज[4] साधु, 'दूत हा आहे.' ॥ १२

तैलार्द्रें अ **म** राहित वस्त्रशतें वेष्टवूनि पुच्छातें ।
पेटवुनि, म्हणे, 'फिरवा **लं**केंत, करूनि घोष, तुच्छातें.' ॥ १३

**वा**तसुत "**श्री रा**मो जयति' असें म्हणुनि तो उडे सहसा. ।
जाळी **लं**केसि; म्हणे 'रे! राक्षस! हो! रडा, मला न हसा.' ॥ १४

होय समी[5] **रा** त्मज[6] तों दीन श्रीरामदार[7]दाहभयें; ।
विझवुनि पुच्छ समुद्रीं, **श्री**तें पाहुनि, निवे बहु स्वजयें. ॥ १५

पुनरपि **म** हितनयेतें नमुनि, तदाज्ञा, खळासि निंदुनि, घे. ।
तेथुनि, कीशचकोरां निववाया, तो **क**पींद्रइंदु निघे. ॥ १६

त्या लंघुनि **ज** लधीतें, गर्जोनि **म**हेंद्रपर्वतीं उतरे. ।
झाले जयापुढें ते राक्षस, सिंहापुढें जसे कुतरे. ॥ १७

तो परम **य** शस्वी त्या वृद्धा[8] भेटे नमूनि; आनंदी ।
कपि आलिंगुनि म्हणती, 'श्रीरामनिदेश[9]शंभु हा **नं**दी.' ॥ १८

'म्यां शुद्धाचा **रा** ती **प्र**भुदयिता देखिली सती **सी**ता. ।
**गी**ता मुमुक्षुनें[10] तशि, झाली मद्दृष्टिदर्शनें सीता[11]. ॥ १९

केले सद्रु **म** भग्न क्षणदाचरं[12] ही, त्यजूनियां शंका; ।
डंका श्री**रा**माचा गाजविला, ती हि जाळिली **लं**का.' ॥ २०

हें वृत्त **औं ज** नेयें[13] कथितां, परमोत्सवें वनीं चेष्टा ।
बहु करिति, उडति, नाचति, भक्तजनेष्टा चि त्या, न नीचेष्टा. ॥

**प्र**भुतें प्रि **य** कळवाया, ते **जां**बवदादि उसळले खोंतें[14]. ।
यश अमृतवर्ष, कपिबळ अंकुरलें शुष्क मुसळ लेखों[15], तें. ॥ २२

**वा**नर **रा ज** मनःप्रियमधुवन अत्यंत रम्य पाहून, ।
शिरले **यु**वराजाच्या आज्ञेतें, मागतां च, लाहून. ॥ २३

---

१. 'वस्तु'शब्द संस्कृतांत नपुंसकलिंगी आहे. २. स्थान, पदवी. ३. एक प्रकारची वनस्पति. हिचे अंगीं सुवास असल्यामुळें ही केशांना लावीत असतात. ४. बिभीषण. ५. रावण. ६. मारुति. ७. सीता. ८. जांबवानास. ९. आज्ञा. १०. मोक्षेच्छूनें. ११. संतुष्टा. १२. राक्षसानें. १३. मारुति. १४. आकाशाला. १५. माना.

राजाचें भ **य** न धरुन, वनपाळा **द**धिमुखासि ताडून, ।
पाडून फळें भक्षुन, मधु[1] प्याले मधुवनांत झोडून[2]. ॥ २४

तो वानर **रा** जातें सांगे **द**धिमुख रडोनि बोभाट. ।
त्या कार्यसिद्धि समजे, वाटे सद्गुणचि वर्णितो भाट[3]. ॥ २५

लक्ष्मण स **म** जे, समजे **रा**म हि निजकार्यसिद्धि, कीं भृत्य[4] ।
करितात अतिक्रम[5] ते, करिती स्वाम्युक्त सिद्धि जे कृत्य. ॥ २६

ते विजय **श्री** मंडित **प**वनसुतप्रमुख, सर्व जे आले, ।
श्री**रा**मलक्ष्मण**सु**गळ यांतें साष्टांग वंदिते झाले. ॥ २७

विरहाधी **रा** त्मा **प्र**भु त्यांसि पुसे, 'लागली कशी शुद्धी[6]? ।
**सी**ता कोठें आहे? माझ्या ठायीं कशी तिची बुद्धी?' ॥ २८

ते सकळ **म** रुत्तनया प्रेरिति; तो **प्र**भुसि नमुनि मणि अर्पी. ।
श्री**सी**तावृत्त कथी; तें त्या, रुग्णासि[7] अमृतसें, तर्पी. ॥ २९

जों शतयो **ज** नजलनिधि लंघुनि, जायासि लागलों **रा**मा! ।
प्रगटे, विश्राम मला द्यायातें, **ता**रकारिचा मामा. ॥ ३०

मम हृद **य** म्हणे विघ्न, स्व उरें पाहूनि ताडितां, स्वामी ! ।
वदला, 'त्वद्विश्रामा आलों, तव बंधु **वा**युसख बा! मी.' ॥ ३१

सांत्वुनि धें **रा** धरातें, पुनरपि जों उसळलों त्वरित सुरसा[10], ।
शतयोजन मुख पसरी नागांची माय खावया **सु**रसा[11]. ॥ ३२

तों सोडीं मी **म** नुकुलतिलका! निजनवति[12]योजनाकार; ।
तनु[13] होउनि, शिरुनि मुखीं, निघतां झाली प्रसन्न ती फार. ॥ ३३

आकर्षी म **ज** **रा**मा! छायाग्रह[14] **सिं**हिका[15]; तिच्या पोटीं ।
शिरुनि, हरुनि हृदय, वधिलि; तव पदपद्में कृताभयें मोठीं. ॥ ३४

मकराल[16] **य** लंघुनि, ती **लं**का शोधुनि, सती अशोकवनीं ।
देखिलि तव विरहार्ता; यत्न करीं त्वरित बा! तिच्या अवनीं[17]. ॥ ३५

खपले र **ज** निचर बहुत बा! मजसह करुनि अल्प समरमखा[18]; ।
वदलों, 'दहना[19]! **लं**का, जाणुनि हा दिवस कल्पसम, रम, खा. ॥ ३५

---

१. मद्य. २. सर्व. ३. स्तुतिपाठक. ४. चाकर. ५. मर्यादाउल्लंघन. ६. शोध. ७. रोग्याला. ८. मैनाक पर्वत. ९. पर्वत. (मैनाक). १०. देवासारखा. ११. नागमातेचें नांव. १२. नव्वद. १३. सूक्ष्म. १४. छाया ओढणारी. १५. राहुमाता. १६. समुद्र. १७. रक्षणीं. १८. यज्ञ. १९. हे दहना, हा दिवस कल्पसम जाणुनि रम, (आणि) लंका खा, असा अन्वय.

मज हा ज **य** प्रसादें तुमच्या, त्या ही महासतीच्या, हो ! ।
लंकेप्रति तत्र भवद्यात्रा[1] कारण मुहा[2] सतीच्या[3] हो. ॥ ३७

क्रूरमति **रा** क्षसींत, स्मरणें तुझिया चि, धृतिमती वसती ।
एकांबरैकवेणी[4], तन्वंगी, व्याकुळा अतीव[5], सती. ॥ ३८

कुशळ सु **म** तिनें पुशिलें श्रीरामा ! तुज सलक्ष्मणा, सुगळा; ।
शीघ्र निघा तत्प्राणत्राणार्थ[6]; ग्रास हि न गिळा, उँगळा[7].' ॥ ३९

---

## युद्धकांड.

बहु मुदित **श्री** **राम**प्रभु होय, म्हणे, 'अगा ! महाबाहो ! ।
बा ! त्वत्प्रसाद सर्वां सदरिखळाश्वां लगाम हा बा ! हो. ॥ १

बा ! **वायुकुमा** **रा** ! त्वां वांचविला सकळबंधु हा **राम**. ।
कल्पतरूंचा आम्हां श्रांतांला भेटलासि आराम[8]. ॥ २

कर्णसदृश **म** ज न दिसे प्रिय; अवितरणीं[9] कृतघ्नता पाहें; ।
यास्तव, आलिंगन तुज देतों सर्वस्वभूत बापा ! हें.' ॥ ३

यापरि वदे **ज** गद्गुरु; आलिंगी **वायुनंदना** सुचिर; ।
याहुनि नित्य परमसुखकीर्तिप्रद वस्तु कोणतें रुचिर[10] ? ॥ ४

तो प्रभु विज **य** मुहूर्तीं **ह**नुमत्स्कंधीं बसे, निघे तूर्ण[11]. ।
**सौ**मित्रि **अं**गदरथीं, चंद्र जसा उदयपर्वतीं पूर्ण. ॥ ५

जलनिधिती **रा** नेल्या **सु**गळें बहु ऋक्षपतिचमू भारी. ।
**राम**, **बि**भीषण भेटे, त्या **लं**काराज्य, अभय दे, तारी. ॥ ६

नतजलधि **म** त **न**ळकरें[12] सेतु करवि **राम**राय शत गांवें[13]. ।
उतरुनि, **अं**गदवदनें अरिस म्हणे, 'पामरा ! यश तगावें.' ॥ ७

करिती भारी **जं** न्य[14] क्षणदाचर[15], ऋक्ष, कीश, जे वन्य. ।
'अद्भुत असें न अन्य' त्रिदश[16] म्हणति 'यांस त्यांस ही धन्य.' ॥ ८

करि अहिम **य** बाणांनीं घननाद[17] निबद्ध सानुजा **राम**ा. ।
दाऊनि सती रडवी; त्या व्यसनीं[18] पक्षिराज ये कामा. ॥ ९

---

१. तुमचें जाणें. २. आनंद. ३. सीतेच्या. ४. तिपेडीवेणी न घालणारी. (विरहिणी.) ५. अतिशय. ६. रक्षण. ७. थुंका. ८. बाग. ९. न देणें. १०. सुंदर. ११. सत्वर. १२. वानरविशेष. १३. योजनें. १४. युद्ध. १५. राक्षस. १६. देव. १७. मेघनाद. (इंद्रजित्). १८. संकट.

विकळ अनु **ज**, **म**नुजवरें, निरखूनि उरांत लागली शक्ती, ।
**द**शमुख जिणुनि पळविला; कांहींशी प्रगटली रणीं शक्ती. ॥ १०

कपिसेनाक्ष **य** करिता, **क**पिपतिहृतकर्णनास, मत्त, महा ।
**प्र**भुनें वधितां, वदला खळ, 'हा **घ**[1]टकर्ण ! वीरसत्तम ! हा!' ११

सांत्वुनि ताता, **रा**[2] वणि, जेंवि गिळायास **रा**हु इंदु निघे, ।
**दा**शरथी खिळुनि, रणीं जय साधुनि, गुप्त खां[3]त राहुनि, घे. ॥

अतिसंकटीं **म** रुत्सुत **औ**ष[4]धिनगशृंग अतिजवें आणी. ।
सबळ **वि**भु विशल्य करुनि, पावुनि, ये; अश्रुंनीं सुरां न्हाणी. १३

मग करुनि **श्री** **सी**तामाया, **रा**वणि, तिला वधुनि, मोही. ।
झुंजुनि अहोरात्रत्रय, वधिला **श**[5]क्रारि **ल**क्ष्मणें तो ही. ॥ १४

**प्र**भु, वधुनि **रा** क्षसांच्या बहु शतकोटि, स्वयें रणीं पाहे ।
अस्त्रबळ. म्हणे, 'माझें कीं ऐसें चि **स्म**[6]रारिचें आहे.' ॥ १५

**द**शमुख स **म** रीं **प्र**भुच्या अनुजोरीं शक्ति दारुणा हाणी. ।
पुनरपि **सु**[7]षेणवचनें औषधिनगशृंग **वा**तसुत आणी. ॥ १६

रथ **दे**[8]ववैरा **ज** धाडी, त्यावरी बैसुनि, **द**शानना ताडी. ।
रण सप्त रात्र संतत करुनि, हरुनि असु, धरातळीं पाडी. ॥ १७

**प्र**भुच्या विज **य** महोत्सवसमयीं दुं[9]दुभि नभांत वाजविले. ।
लाजविले मेघ तिहीं; प्रतिनादांहीं दिगंत गाजविले. ॥ १८

गंधर्व अप्स **रा** बहु करिती आलाप; **रा**मरायाला ।
गाति, नटति, वर्णिति, जो श्रीमदं[10] आला पैरा[11], मरायाला. ॥ १९

त्या दिव्यकुसु **म** वर्षे हर्षे **श**क्रादि पूजिती अमर. ।
'जय! जय!' म्हणति मुनीश्वर, जे **प्र**भुवरचरणनीरजें[12]भ्रमर. ॥ २०

राज्य दिलें, अ **ज** रामर केला, जों चंद्रसूर्य, तों वरि तो. ।
**प्र**भुनें प्रणत **बि**भीषण गौरविला; नत चि सिद्धितें वरितो. ॥ २१

अग्निस्नानें प्र **य** ता दयिता स्वीकारिली सुर[13]वरमतें. ।
**प्र**भुयश सेवुनि कविमन, मृ[14]गमन परिसुनि जसें सुरे[15]व, रमतें. २२

सुरमुनिरा **ज** र्षिस्तुत **द**शरथ उतरे, विमान सोडून; ।
भेटे पुत्रास, पदावरि पडतां साश्रु हात जोडून. ॥ २३

---

१. कुंभकर्ण. (रावणबंधु.) २. इंद्रजित्. ३. आकाशांत. ४. पर्वत. (द्रोणाचल.) ५. इंद्रजित्. ६. शिव. ७. वैद्यविशेष. ८. इंद्र. ९. नगारे. १०. लक्ष्मीचा धूर. ११. शत्रु. १२. कमल. १३. देवश्रेष्ठ. १४. हरिण. १५. सुस्वर.

युद्धिं प्राप्तक्ष **य** ते सर्व उठविले दयासुधावर्षें. ।<br>हें **प्र**भुयश अत्यद्भुत गाती गंधर्वदेवता हर्षें. ॥ २४

बसला कपि **रा**[1] क्षसपतिसह **राम** सदार **पु**ष्पकविमानीं. ।<br>त्या **पु**ष्पकयानातें मधुपाकुळ कल्पपुष्प कवि मानी. ॥ २५

प्रिय करुनि **म** नुष्येश्वर **सी**तेसि म्हणे, 'प्रिये ! पहा सेतू. ।<br>त्वत्प्राप्तिस हा **न**ळकृत, मुक्तिस गुरुकृत सुबोधसा, हेतू.' ॥ २६

स्वसहायांचीं **श्री** शें नामें, कृत्यें, प्रियेसि जाणविलीं. ।<br>दाखविलीं भटरत्नें, जीं **सु**ग्रीवें जयार्थ आणविलीं. ॥ २७

जलनिधिती **रा** वनितें दावूनि, म्हणे, '**बि**भीषणें आर्यें ।<br>येथें मज भेटि दिली; नेलीं येणें चि सिद्धिला कार्यें.'॥ २८

तारा[2] रुमा[2] हि **मै**[3] हिला कीशाच्या **पु**ष्पकांत घे **सी**ता. ।<br>त्यांच्या[4] श्री**ज**नकसुता, जेंवि सुधावृष्टि, दृष्टि करि सीतां[5]. ॥ २९

**प्र**भु वदला, '**ज** नकसुते ! हे **पं**पा; ऋष्यमूक सन्नग[6] हा; ।<br>**सु**गळ अभय दे येथें मज, ज्या म्हणवी वियोगपन्नग[7] हा.'॥ ३०

जी तापसप्रि **य** तमा, ती **पं**चवटी प्रियेसि दाखविली. ।<br>**गो**दावरीसुधा त्या **श्री**च्या तृषितेक्षणा[8]सि चाखविली. ॥ ३१

भेटे निषाद **रा** जा; तो पावे ज्या यशा, **म**रुत्त न या. ।<br>**भ**रतातें कळवाया **प्र**भु तेथुनि पाठवी **म**रुत्तनया[9]. ॥ ३२

शिष्यसम, स **म** य पाहुनि, **राम** **भ**रद्वाजमुनिपदा लागे. ।<br>'सुरसफलसमृद्धि असो मार्गीं,' ऐसा तयासि वर मागे. ॥ ३३

हृष्ट **भ**रद्वा **ज** मुनिस करुनि, वरुनि शीघ्र गति, दयाधामें ।<br>वल्कजटाकुशमलधर, कृश, सानुज **भ**रत, निववि‍ला **रा**में.॥ ३४

गुरु सचिन **य** नमिला; मग जननीजन, सचिव, पौर, हर्षविले. ।<br>**नं**दिग्रामीं घेउनि वेष प्रेमाश्रु सर्व वर्षविले. ॥ ३५

कपिवर, र **ज** नीचरवर, प्रमुदित, नररूपरम्यवेशधर, ।<br>करिती पुरीप्रवेश **प्र**भुसह, बैसोनि रथकरेणु[10]वर. ॥ ३६

झाले जयज **य** कार **प्र**भुच्या राज्याभिषेकसमयांत. ।<br>देवादिजीवमात्रीं परमोत्सव होय या चि सम यांत. ॥ ३७

---

१. बिभीषण. २. ह्या दोन सुग्रीवाच्या स्त्रिया. ३. स्त्रिया. ४. त्यांच्या दृष्टि श्रीजनकसुता सीता करी. ५. थंडगार. ६. उत्तम पर्वत. ७. सर्प. ८. डोळे. ९. मारुति. १०. हत्तीण.

राष्ट्रीं, पुरीं, पु**रा** तन जे नृप, कोणीं हि ते न आठविले. ।
जेंवि पर दिगंतातें, **प्र**भुनें निजराज्यगुण हि पाठविले. ॥३८

त्या परम स **म** र्थानें रंजविल्या स्वप्रजा प्रजासम; या ।
**प्र**भुच्या तेजें हर्षें जन, वर्षे घन, न लंघितां समया. ॥ ३९

---

## उत्तरकांड.

राज्यपद वरि **श्री** मान्**सी**तापति, धरुनि धर्मनीतिपथा. ।
परिसे [1]**घ**टजमुनिमुखें **रा**वण**क**पिपति**म**रुत्सुतादि कथा. ॥ १

मुनिवर [2]चतु **रा** ननसुत **पु**लस्त्य, तत्तनय **वि**श्रवा नांवें. ।
तत्सुत **वै**श्रवण, तया दे **लं**का तात, जीस वानावें. ॥ २

राक्षससुता **सु म** ति वरि, दुसरी ती **कै**कशी, तिचे तनय ।
**द**शमुख**घ**टकर्ण, सुता **शू**र्पणखाख्या, **बि**भीषण हि सनय.॥३

तप करुनि **कं ज** जवरें द्विजदेवांचा महोग्र होय अरी. ।
**वै**[3]श्रवणाची **लं**का प्रथम चि मोडूनि धर्मनीति हरी. ॥ ४

**धनद** पराज **य** करि, घे त्याचें **पु**ष्पकविमान हिसकून; ।
त्या **नं**दीश्वर शापी, **प्र**भुसामर्थ्यें वधास हि सकून. ॥ ५

करि **कै**लास ध **रा** [4]धरचालन, भुज अडकवी तळीं **रु**द्र. ।
धर्षण करूनि पावे **वे**दवतीशाप **हि**[5]मनगीं क्षुद्र. ॥ ६

त्या **अ**नरण्याख्य **म** हिप शापी; **य**मभटमृगांत होय हरी; ।
**भो**गवतीतें जिंकी; असुरांशीं युद्ध करूनि सख्य करी. ॥७

शापी **ध**नदात्म **ज** **न**ळकूबर; **श**क्रासि **मे**घनाद धरी. ।
मग **अ**र्जुन **द**शवदना बांधी; **वा**ळी हि सर्व गर्व हरी. ॥ ८

निपट शिशु **वि [6]य** न्मणितें फळ मानुनि, **वा**तसुत उडे व्योमीं. ।
वरलाभ **घ**टज कथि; तें यश वर्णूं काय काय बुध हो! मी? ॥

गौरवुनियां नि **ज** पुरा साधु **बि**भीषण, **सु**कंठ, पाठविले. ।
**मा**रुतिला स्वयश दिलें **प्र**भुनें, प्रिय तें त्रिकाळ आठविलें.॥१०

मग गर्भिणी प्रि **य** तमा होय; पुसे **प्र**भु तदीय दोहद, या ।
सांगे मुनिवनदर्शन, ज्यांची राहों न दे चि मोह दया. ॥११

---

१. अगस्त्य. २. ब्रह्मा. ३. कुबेराची. ४. पर्वत. ५. हिमालयपर्वत. ६. सूर्य.

कथितां भद्र[1] च **रा** नें पौरकृत स्वापवाद ही, **राम** ।
लोकांचा हि तिचा ही, पुरवी, त्यागुनि तपोवनीं, काम.॥ १२
श्री**वा**ल्मीकिमुनि **म** नीं समजे, पुण्याश्रमीं तिला रक्षी; ।
लक्षी कन्याशी, ज्या सदया सुतनिर्विशेष मृगपक्षी. ॥ १३
सांगे स्वभ्रात्यास **श्री** पति **नृ**ग**नि**मि**य**यातिशापकथा. ।
श्वोल्[2]कन्याय करी; न विलंघी **राम** धर्मनीतिपथा. ॥ १४
लवणाख्यां असु **रा** तें **श**त्रुघ्न वधी, रची पुरी, नाम ।
**म**थुरा ऐसें ठेवी, पुरवी **य**मुनातटस्थमुनिकाम. ॥ १५
जाय फिरुनि, स **म** यीं ज्या श्रीमत्**प्रा**चेतसाश्रमीं राहे, ।
श्री**रा**मायणगाते **सी**तासुत उपजतां हि हा पाहे. ॥ १६
उठवी मृत द्वि **ज** शिशुतें, शूद्राचा करुनि **म**नुजदेव लय; ।
**श्वे**तकथा कथुनि, **वि**भुसि अत्यद्भुत [3]**कुं**भतनुज दे वलय.॥ १७
जो **इ**क्ष्वाकुतन **य** नृप **दं**ड, **क**विसुताव्रतघ्न, उद्दाम, ।
त्या भस्म करी श्री**क**वि, **दं**डकवन म्हणूनि जाहलें नाम.॥ १८
**र**घुराज अ[4]ध्व **रा** सि श्रेष्ठा करि सांग तु[5]रगमेधा त्या. ।
सुरमुनि बहु मानवले, [6]**स**त्यचि [7]**सा**केतपुर गमे [8]**धा**त्या. ॥ १९
यज्ञांत परम **म** धुरस्वर**कु**श**ल**वगीत निजचरित **राम** ।
ऐके, प्रसन्नमानस होय, पुसुनि त्यांस **आ**दिकविनाम. ॥ २०
[9]**आ**दिकवि म्हणे '**ज** रि हे **सी**ता शुद्धा नसेल, तरि तपलों ।
तें व्यर्थ असो, **रा**मा ! ज्या यमनियमांस मी सदां जपलों !' ॥
**सी**ता म्हणे, 'धरे! **य** श हो; लज्जा पाहुं दे न देवि ! वर. ।
**प्र**भुहुनि जरि मन माझें अन्यत्र नसेल, शीघ्र दे विवर. ॥ २२
सहसा उलली **ज** गती; सिंहासन चंद्रसूर्यनि[10]भ आलें; ।
त्यावरि भूदेवीनें बसवुनि नेली सुता असें झालें. ॥ २३
अत्याकुलहृद **य** **प्र**भु होतां, अवतारतत्त्व **वि**धि कळवी. ।
**प्र**भुचें मन, तूं **वि**ष्णू, श्री**सी**ता, कथुनियां असें, वळवी. ॥ २४
दश शत वर्षें **रा** ज्य **प्र**भु हयमेधादिमख करी शतशा; ।
प्रगटि यशा, ज्या लाजे **हि**मनग, दुग्धाब्धि, विधु, [11]**क**रीश, तशा.

---

१. हेर. २. कुत्रा व घुबड. ३. अगस्त्य. ४. यज्ञात. ५. अश्वमेध. ६. ब्रह्मलोक. ७. अयोध्या. ८. ब्रह्मदेवास. ९. वाल्मीकि. १०. सदृश. ११. ऐरावत.

चवघांचे सुत **म** हित, स्वपितृसमगुणाढ्य, आठ जे सनय. ।
अभिषिक्त **त**क्ष **पु**ष्कळ दो नगरीं स्थापिले **भ**रततनय. ॥२६

लक्ष्मण हि, मग **श्री** म**द्रा**में अभिषेचिले तनुज दोघे. ।
**अं**गद हि, **चं**द्रकेतु हि, बसवूनि पुरद्वयीं, सुयश तो घे.॥२७

धरि काळ भूसु[1] **रा** चें रूप, **प्र**भुला म्हणे, 'रहस्य असे; ।
वध्य द्रष्टा श्रोता हो.' द्वारीं **रा**घवोक्त बंधु वसे. ॥ २८

**वि**धिवच 'आग **म** न करीं वैकुंठाप्रति' असें कथी काळ. ।
तों **ल**क्ष्मणासि भिववी **दु**र्वासा, जेंवि आखुला[2] व्याळ. ॥२९

**प्र**भु निज अनु **ज** त्यागी, तो सशरीर त्रिविष्टपा[4] नेला. ।
आत्मप्रयाणनिश्चय **भ**रता श्रुत तदनुजास ही केला. ॥३०

**कु**शलव तन **य** निज, तयां अभिषेचुनि दोन दे पुरें **रा**म. ।
सुत **सु**भुज **श**त्रुघाती, त्यांचा पुरवी **अ**रिघ्न ही काम. ॥३१

तो **सु**गळ वान **रा** धिप, निजपद देऊनि **अं**गदा, आला. ।
भेटे भक्त **बि**भीषण. '**लं**केंत' म्हणे 'सुखी रहा त्याला.॥३२

जों **क**लियुग, म **म** वचनें, तों **मैं**दं[5]! **द्वि**विद ! **जां**बवन् हे ! या ।
भूवरि सुखी असावें, माझी आज्ञा तुह्मां नव्हे हेर्या[6] !'॥३३

**र**घुपति सप्र **ज** सर्वां जीवांते, पुरगृहें चि सोडुनि, घे; ।
सानुग **सु**गळ, सचिवकपियूथप[7]सह, जेंवि चंद्र सोडुं[8], निघे.॥३४

'**प**वनसुता ! स्व **य** शोमृत सेवित सुखरूप तूं रहा सुचिर' ।
शुचि रसिक प्रियसद्गुण वर दे **प्र**भु सकृप वर असा रुचिर.॥३५

आला सामर[9] **कं ज** ज, बहु रम्य विमानकोटि घेऊन. ।
न्हाणून **गो**प्रतारीं, बसवी **प्र**भुचा प्रसाद जाणून. ॥ ३६

**श**रयूच्या स्नानें **य** ति सूकर, मार्जार, आखु, अहि, कुतरे ।
झाले, दिव्य विमानीं चढले, त्यांतुनि न काक ही उतरे.॥३७

तो **सं**तानाख्य ब**रा वि**धिलोक समीप लोक शुभ केला. ।
क्रममुक्तिप्रद तो त्या स्थाना जन सर्व उत्सवें नेला. ॥ ३८

निजभक्तजन **म** यूर प्रमुदित करि सुखघन स्वयें **रा**म. ।
रुद्रं[10] सहस्राब्दांतीं वसवी **वै**कुंठ आपुलें धाम. ॥ ३९

---

१. ब्राह्मण. २. उंदराला. ३. साप. ४. स्वर्ग. ५. मैंद, द्विविद, जांबवद् इत्यादि वानरविशेष. ६. साज्य. ७. कळप. ८. नक्षत्रांसह. ९. देवांसह. १०. अकरा. 'अब्द' शब्द दिनवाची घेतल्यानें अकरा हजार अब्दांचीं तीस वर्षे होनात. यावरून रामानें तीस वर्षे राज्य केलें असें होतें.

# ५. मंत्ररामायण.[1]

(गीतिवृत्त.)

## उपोद्घात.

श्रीमद्गणेशगुरुपदनखशशिकांतिच्छटा[2] जयंतु[3]तराम्[4] ।
प्रतिभारत्नं[5] लब्धं[6] यासु[7] मयेदं[8] मनस्तमोघ्नीषु[9]. ॥ १
ज्यांच्या हृत्कासारीं[10] होय गुणस्नेहबिंदुही[11] फार, ।
सारज्ञ, असूयोज्झित[12], त्यांला माझा असो नमस्कार. ॥ २
मंत्रप्रयुक्त रचिलें चरित्र भावेंचि **रा**मरायाचें; ।
म्हणवूनि 'मंत्ररामायण' ऐसें नाम टेविलें याचें. ॥ ३
**श्री**कारापासुनियां **म**कारपर्यंत वर्ण जे तेरा, ।
ते **रा**घवचरितांतीं ग्रथिले, हें **रा**मभक्त हो! हेरा[13]. ॥ ४
हा मंत्र **बा**लकांडीं आरंभीं स्पष्ट सर्व आर्यांच्या. ।
त्यांच्या[14] विलोकनानें आनंद असो मनांत आर्यांच्या[15]. ॥ ५
आर्येच्या प्रथमदलीं[16] दुसरा हा मंत्रवर्ण समजावा; ।
दुसऱ्या कांडापासुनि षट्कांडीं हाचि मार्ग उमजावा. ॥ ६
एका मंत्रगुणीं मीं आर्यामुक्ताचि गुंफिल्या तेरा; ।
ते **रा**मचरित कंठीं माला घालोनि, मुक्तिसुख हेरा. ॥ ७
**शि**शुकांडाच्या[17] अंतीं सप्तार्यायुक्त एक मंत्र असे; ।
एक **अ**योध्याकांडीं एका आर्येंत पूर्ण मंत्र वसे. ॥ ८
संक्षिप्त कांडपंचक अतिविस्तारप्रयुक्त तो सावा; ।
त्या **यु**द्धकांडपद्मीं तृप्तहि कविचित्तभृंग बैसावा. ॥ ९
केवळ **उ**त्तरकांड श्रीरघुपतिमंत्ररत्नमंजुषा[18]; ।
पूषा[19] खलघूकांचा[20], अतिसुखदा सर्वसाधुंची भूषा. ॥ १०

---

१ मागील 'बालमंत्ररामायणा'प्रमाणें यांतही **'श्रीराम जयराम जयजयराम'** हा मंत्र साधिला आहे. याची रचना ही मागल्याच रामायणाप्रमाणें आहे. २. शोभायमान गणपति आणि गुरु यांच्या नखचंद्राच्या कांतीचे समूह ते. ३. जय पावोत. ४. अत्यंत. ५. उत्तमबुद्धिरूपरत्न. ६. मिळालें. ७. ज्या, नखशशिकांतिछटा त्यांच्या ठायीं. ८. म्यां हें. ९. अंतःकरणसंबंधीं मल घालविणाऱ्या (नखशशिकांतिछटा या शब्दाचें विशेषण.) १०. हृदयसरोवरीं ११. गुणरूपतैलबिंदु. १२. दोषारोप किंवा मत्सर न करणारे. १३. पहा. १४. मंत्राच्या. १५. श्रेष्ठांच्या. १६. पहिल्या चरणीं. १७. बालकांडाच्या. १८. राममंत्ररत्नांची पेटी. १९. सूर्य. २०. दुष्टघुबडांचा.

देहीं आत्मा, तैसा आर्यांतीं मंत्रवर्ण सांग वसे; ।
सूक्ष्मदृशावांचुनियां कथापरालाचि तो कसा गवसे? ॥ ११
श्रीकार असे पूर्वीं [1]सर्वग्रंथांतरांत रा जाणा, ।
अंतीं मकार, एवं श्रीराम असें तरी मनीं आणा. ॥ १२
सर्वत्र एक आत्मा, म्हणउनियां वंदिती जसे ज्ञानी; ।
हा ग्रंथ मंत्रगर्भित, यास्तव नमिजेल सर्व सुज्ञानीं. ॥ १३
[2]मंत्रास्पद यास्तव हा ग्रंथ कवीला असे सदा हितसा; ।
गरुडासि [3]रमापतिपदपद्मांकितमूर्धकालियाहि तसा. ॥ १४
नृपमुद्रांकित पत्र प्रजेसि होतें जसें शिरोधार्य; ।
प्रभुचरित मंत्रचिन्हित, यास्तव धरितील मस्तकीं आर्य. ॥ १५
[4]आर्यकथाछंदानें [5]आर्याछंदेंची जन्मलीं सरलें; ।
यांहीं माझें तनुवाक्कर्ममन:पाप सर्वथा [6]सरलें. ॥ १६
गीर्वाणशब्द पुष्कळ, [7]जनपदभाषाचि देखतां थोडी, ।
यास्तव गुणज्ञलोकीं याची घ्यावी हळूहळू गोडी. ॥ १७
प्राकृतसंस्कृतमिश्रित, यास्तव कोणी म्हणेल जरि [8]कंथा; ।
[9]भवशीतभीतिभीतस्वांताला दाविला बरा पंथा. ॥ १८
कोठें दूरान्वितपद, कोठें चुकली असेल [10]यतिमात्र; ।
अतिमात्र दोष ऐसें, न वदोत कवी समस्त गुणपात्र. ॥ १९
ग्रंथीं अष्टादशशत आर्या, आणीकही पुढें ऐशी; ।
[11]चतुरूनसार्धशतमित मंत्रहि, संख्या विलोकिजे ऐशी. ॥ २०

---

## बालकांड.

श्रीकांतपौत्र नारद भगवत्पदपद्मभृंग, [12]सद्योगी, ।
आला वाल्मिकिमुनिच्या स्थानाला तो [13]जगद्धितोद्योगी. ॥ १
'राघवचरित्र भावें गावें' ऐसा करोनि उपदेश, ।
गेला हरिगुणकीर्तनपरवश तो [14]निर्जरर्षि, [15]वरदेश. ॥ २

---

१. सर्व ग्रंथांत. २. मंत्रस्थान. ३. कृष्णपदचिन्हित ज्याचें मस्तक असा कालिय सर्प. ४. श्रेष्ठरामकथा छंदानें. ५. आर्यावृत्तें. ६. संपलें. ७. देशभाषाचि. ८. गोदडी. ९. संसाररूप थंडीच्या भयानें भ्यालें जें मन त्याला. १०. विरामस्थान. ११. चारकमी दीडशें, म्ह० एकशें शेचाळीस. १२. उत्तम योगी. १३. जगाच्या कल्याणाविषयीं उद्योग करणारा. १४. देवर्षी. १५. वरदश्रेष्ठ.

मग वाल्मीकिमुनीश्वर, निजशिष्यजनासमेत, तमसेला[1] ।
माध्यंदिननियमार्थ स्वधर्मनिष्ठ, प्रबुद्ध, तो गेला. ॥ ३
जगतीसुर[2] तो, जाउनि तमसातीरीं, स्मरेषुविद्धातें[3] ।
क्रौंचखगातें पाहे, निजपत्नीप्रीतिपाशबद्धातें. ॥ ४
यमतुल्यें निष्करुणें, रति करितां, क्रौंच तो निषादानें ।
वधितां, करुणाब्धि द्विज वदला तेथें असें विषादानें. ॥ ५
रागें वदतां, झाली प्रकट छंदोमयी[4] अशी वाणी; ।
तेव्हां विस्मित मुनि तो नियम करुनि हेंच मानसीं आणी. ॥ ६
मनन करी मुनिवर तो; त्याच्या स्थानासि येउनी धाता[5] ।
सांगे, 'नारदकथित प्रभुचरित वदें' म्हणोनि वरदाता. ॥ ७
'जगदीशचरित वर्णी, तच्छ्रवणें सर्व तरतिल प्राणी; ।
यास्तव वाल्मीके! तुज म्यां हे छंदोमयी दिली वाणी. ॥ ८
यक्षवरानुजरिपुचें[6] अतिपूताचरित नैकपद्यांहीं[7] ।
हृद्यांहीं[8] वर्णावें; त्वत्कृति नमिजेल ते सुविद्यांहीं.' ॥ ९
जलजोद्भव तो ऐसें वदोनि जातां, तदीयवरदानें ।
रामायणाख्य रचिलें काव्य मुनीनें, सुखप्रकरदानें[9]. ॥ १०
'यश विभुचें पढवावें कवणासि?' म्हणे 'बहुश्रुतासि' कवी; ।
तों नृपसुत कुशलव तो, कुशल विलोकूनि, त्यांसि हें शिकवी. ॥ ११
रात्रिदिवस मधुरस्वर इतस्ततः[10] प्रीतियुक्त ते[11] गाती; ।
तें ऐकुनि, रघुवीरें नेले स्वसभेसि बंधु सांगाती. ॥ १२
मणिमयभद्रासनगत[12] राम स्वजनासि काव्य आयकवी; ।
त्यांसि म्हणे, 'तें गा हो! जें वदला सर्वविप्रराय कवी[13].' ॥ १३
'श्रीरघुनाथनिदेशें[14] कथिता झाला असें कवीन[15] मुनी; ।
कुशलव कुशलवचनपटु गाती, गुर्वंघ्रिला[16] मनीं नमुनी. ॥ १४

---

१. नदीविशेष २. ब्राह्मण. ३. कामबाणानें ताडित अशा. ४. वेदरूप किंवा श्लोकरूप. ५. ब्रह्मा. ६. यक्षांचा स्वामी जो कुबेर त्याचा कनिष्ठ बंधु रावण त्याच्या रिपूचें म्ह० रामाचें. ७. अनेक श्लोकांहीं. ८. सुंदरांहीं. ९. सुखसमूह देणारानें. १०. इकडेतिकडे. ११. कुशलव. १२. रत्नखचितसिंहासनस्थ. १३. वाल्मीकि. १४. श्रीरामाच्या आज्ञेनें. १५. कविश्रेष्ठ. १६. गुरूच्या पायांला.

**रा**जप्रिया **अ**योध्या **को**सलदेशीं यथार्थनामा जी; ।
तीतें **अ**जसुत **द**शरथ पाळी, जो ख्यात या **जनामाजी**. ॥ १५
**म**ह्यवन[1]प्रौढकरें, धर्मपरें, देवकार्यसिद्धिकरें; ।
**द**शरथनृवरें केलें त्रिभुवन धवल स्वसद्यश:प्रकरें[2]. ॥ १६
**ज**गतीपतीस होत्या सार्धत्रिशत[3] प्रिया **अ**जश्रेष्ठा[4]; ।
**कौ**सल्या, **कै**केयी, आणि **सु**मित्रा तयांत ही श्रेष्ठा. ॥ १७
**य**मनियमें, पुत्रार्थ, क्षितिपें, सुरपूजनाद्यधीनमनें[5], ।
इच्छादानें, मानें, तोषविले मंदधी, सुधी नमनें. ॥ १८
**रा**जास सौख्य कांहीं प्राप्त न झालेंच पुत्ररत्नाचें; ।
यास्तव चिंताकुल तो मानी वैफल्य[6] सर्व यत्नाचें. ॥ १९
‘**म**नुवंशीं जन्मुनियां, झालों अनपत्य मी, न लोक मला; ।
यास्तव हयमेधीं हे द्यावी द्विजहस्तकीं’ म्हणे ‘कमला[7].’ ॥ २०
**ज**नपति मग यज्ञास्तव **व**सिष्ठमुखभूसुरांसि[8] तो प्रार्थी; ।
त्यांहीं तोषविला बहु आशीर्वादें नृपाल पुत्रार्थी. ॥ २१
‘**य**जनाचें[9] साहित्य क्षिप्र करीं’ यापरी अनुज्ञा[10] ते ।
करुनि, यथागत[11] गेले **व**सिष्ठमुख भूमिनिर्जर ज्ञाते. ॥ २२
**ज**यशाली भूप म्हणे मंत्रिजनाला, ‘समस्त संभार ।
**स**रयूतीरीं करणें, तुम्हांवरी हा असे महाभार.’ ॥ २३
**य**त्नें साहित्य तदा करोनियां ते प्रधान यज्ञाचें, ।
आनंदविती मानस **कौ**सल्याजानिचें[12], नयज्ञाचें. ॥ २४
**रा**जेंद्रासि म्हणे तो **सु**मंत्रनामा प्रधान अनवीन[13]. ।
‘आज्ञा असेल तरि मी हितकाम तुझ्या पदास विनवीन. ॥ २५
**म**नुजाधीशा! वदला भविष्य पूर्वी **स**नत्कुमार मुनी; ।
तें आयकिलें ऋषिजनवदनें मीं, तत्पदांबुजीं रमुनी.’ ॥ २६
**श्रीवि**धिनंदन वदला ‘आद्ययुगीं कीं **वि**भांडकर्षिसुत, ।
मुनि **ऋ**ष्यशृंगनामा होइल, सद्वृंदवंद्य[14], लोकनुत[15]. ॥ २७

---

१. पृथ्वीच्या रक्षणाविषयीं दक्ष हस्त ज्याचा असा. २. स्वकीर्तिसमूहानें. ३. साडेतीनशें. ४. दशरथास. ५. देवपूजादिवश मन ज्याचें असा. ६. निरर्थकत्व. ७. संपत्ति. ८. वसिष्ठादिब्राह्मणांस. ९. यज्ञाचें. १०. आज्ञा. ११. आले तसे. १२. कौसल्यापतीचें. १३. जुना. १४. साधुसमूह ज्याला नमस्कार करतो असा. १५. लोकस्तुत.

**रा**ष्ट्राच्या क्षेमास्तव त्याला नेईल **लो**मपाद[1], तदा ।
होईल वृष्टि, तेव्हां देइल **शां**ता सुता स्ववांछितदा[2]. ॥ २८

**म**नुवंशज **द**शरथ नृप असेल अनपत्य, **लो**मपादसख; ।
तो त्या मुनिप्रसादें पावेल अनन्यलभ्य पुत्रसुख.' ॥ २९

**ज**ननार्थ[3] नंदनाच्या प्रार्थुनि तो **ऋ**ष्यशृंग आणावा; ।
अनपत्यतासुखद्रुम[4] मुनिप्रसादें समूळ खाणावा. ' ॥ ३०

**य**जमानें **अ**जपुत्रें हें ऐकुनि, जाउनी, पदीं नमुनी, ।
सत्कारुनि, **शां**तेसह, नगरा नेला कृपानदीन[5] मुनी. ॥ ३१

**रा**घवधृतपद, **का**श्यपपुत्रवसिष्ठप्रमृत्यवन्यमर[6] ।
हयमेधासि, यथाविधि, संपादिति वेदनीरजभ्रमर. ॥ ३२

**म**ग पुत्रेष्टी करितां, हविराहरणार्थ, भूमिवर लेख[7] ।
आले **वि**धि, **सु**रनायक, चूडारत्नीकृतर्क्षवरलेख[8]. ॥ ३३

**ज**गदीश्वरनिजनाभीसरोवरोद्भूतपद्मजनितातें[9] ।
म्हणती **रा**वणपीडित सुर 'रक्षावा स्वकीयजन[10] तातें. ॥ ३४

**य**मसम पीडा करितो तो खळ; आम्हांसि मरण ही नाहीं; ।
तद्दलपराजितांहीं किजे कसें त्यासम रण हीनाहीं?' ॥ ३५

**ज**लजोद्भव, हें परिसुनि, जाय सुरांसहित सिंधुकूलातें[11]; ।
तेथें स्तविता झाला **श्री**शातें, सज्जनानुकूलातें. ॥ ३६

**य**जितां, **अ**जित प्रकटुनि देवांला दर्शनें सुखी करवी ।
शरणागतजनसंसृतिभीतिध्वांतप्रभंजनैकरवी[12]. ॥ ३७

**रा**जीवलोचनें त्या देवोक्तांचें करोनियां श्रवण, ।
'मा भैष्ट'[13] अशा शब्दें तोषविले स्वांघ्रिपंकजप्रवण[14]. ॥ ३८

**म**धुमथन म्हणे, 'जन्मुनि **द**शरथदारोदरीं, जगद्वेषी ।
मारीन; तुम्हीं व्हावें स्वांशानें वानरर्क्ष[15] सद्वेषी.' ॥ ३९

---

१. राजविशेष २. 'स्वमनोरथपूरका. ३. उत्पत्त्यर्थ. ४. अनपत्यतादुःखवृक्ष. ५. कृपा-समुद्र. ६. काश्यपुत्रवसिष्ठप्रभृतिब्राह्मण. ७. देव. ८. शिरोभूषणीकृत आहे चंद्र ज्याणें; ९. जगदीश्वराच्या नाभिकमलापासून झाला जो ब्रह्मा त्यातें. १०. स्वकीयभक्त. ११. समुद्रतीरातें. १२. शरण आले जे जन त्यांच्या संसारभयरूप अंधकाराचा नाश करणारा एक सूर्य. १३. भिऊं नका. १४. आपल्या चरणकमलीं नम्र असे. १५. वानर व आस्वल.

श्रीकांत, वदोनि असें, अदृश्य होतां, स्वयें तदा ज्ञाते ।
ब्रह्माद्यमर यथोक्त प्रवर्तले, नमुनियां तदाज्ञा, ते. ॥ ४०

राशि तपाचा काश्यप मुनि पुत्रेष्टी करी, तदा निकट ।
[1]प्राजापत्य पुरुष, त्या कुंडापासूनि, जाहला प्रकट. ॥ ४१

मनुजेंद्रकरीं देउनि पायसपरिपूर्णहेमपात्रातें, ।
'दे भार्यांसि' म्हणे 'हें होइल भवसागरीं नृपा [2]त्रातें.' ॥ ४२

जन्म सफल मानुनि, तो स्वपायसाचे करोनि [3]युग भाग, ।
कौसल्येला देउनि, कैकेयीलाहि दे महाभाग. ॥ ४३

यद्यपि भूपें न दिला भाग सुमित्रेसि, तरिहि त्या तीतें ।
निजभागार्ध समर्पुनि, आनंदविती अपार नृपतीतें. ॥ ४४

राय, यजनावसानीं, [4]विभांडकसुतादिभूसुरसभा जी, ।
मणिहारादिविभूषणनिवेदनें, [5]नतिपुरःसर, [6]सभाजी. ॥ ४५

महिषी [7]अंतर्वत्नी होउनियां, त्या तनुप्रभानिकरें ।
चिंतातमासि जिंकिति, [8]नृपसुखपृष्ठासि थापटोनि करें. ॥ ४६

[9]जनकल्याणदशोभनकाळीं त्या प्रसवल्या नरेशस्त्री; ।
ते वेळा झाली तैं बंधनविच्छेदनक्षमा [10]शस्त्री. ॥ ४७

यज्ञेश्वर कौसल्येपासुनि पावे [11]संदिष्टजननास; ।
यास्तव होणार जगीं सज्जनकल्याण, [12]दुष्टजननास. ॥ ४८

जन्म ज्येष्ठसुताचें, मध्यान्हीं, चैत्रमाससितपक्षीं ।
झालें, कर्कटलग्नीं, नवमीदिवशीं, [13]पुनर्वसुस्वर्क्षीं. ॥ ४९

[14]यमल सुमित्रा प्रसवे, [15]यमलक्षण जे असाधुलोकांचे; ।
ऐका ते साकेताधिप करि संस्कार सर्व तोकांचे. ॥ ५०

राम असें दशरथ नृप [16]अन्वर्थ ज्येष्ठसूनुचें नाम ।
ठेवी; भरत असें तो [17]कैकेयीजास, लब्धनिजकाम. ॥ ५१

महदानंदें, दशरथ भूप सुमित्रासुतांसि सुविधानें ।
लक्ष्मण शत्रुघ्न अशीं ठेवी सारीं यथार्थ [18]अभिधानें. ॥ ५२

---

१. प्रजापति देवता ज्याची असा. २. रक्षणकर्त्रे. ३. दोन. ४. ऋष्यशृंगादिविप्रसभा. ५. नमस्कारपूर्वक. ६. पूजी. ७. गर्भिणी. ८. दशरथसुखाची पाठ. ९. जनाला कल्याण देणारा आणि चांगला अशा काळीं. १०. तरवार. ११. साधूंना आवडलेल्या जन्मास. १२. दुष्टांचा नाश. १३. पुनर्वसु ह्या उत्तम नक्षत्रीं. १४. जुळें. १५. यमामारखें. १६. यथार्थ. १७. कैकेयी-पुत्रास. १८. नामें.

श्रीसूर्यवंशमणि तो करि पुत्रांचीं [1]यथोक्त [2]उपनयनें; ।
संतत अतृप्तचित्तें सेवी [3]तन्मुखरुचीस नृप नयनें. ॥ ५३

[4]राक्षसपीडाव्याजें कौशिक मागोनि दशरथाजवळी, ।
हृदयीं [5]रामाभिधनिजपुण्यफळातें महासुखें कवळी. ॥ ५४

[6]मह्यमर [7]बलातिबला विद्या दे, क्षुत्तृषार्तिहरणार्थ; ।
अर्पी [8]धनुःश्रुतीतें, सज्जनरक्षार्थ, दुष्टमरणार्थ. ॥ ५५

[9]जन्य कराया, रोधी मुनिच्या मार्गासि ताटका चंडी; ।
विश्वामित्रनिदेशें तीस वधी सर्वलोककोदंडी. ॥ ५६

यश जोडाया, जाउनि सानुज विभु आश्रमास, यज्ञाचें ।
त्राण करी; असुरवधें मन सुखवी [10]मंत्रसंचयज्ञाचें. ॥ ५७

राजा जनक मुनीतें, स्वक्रतुसिद्ध्यर्थ, धाडुनी मंत्री, ।
'दर्शन देउनि मातें धन्य करावें' म्हणोनि [11]आमंत्री. ॥ ५८

मर्त्याकृतिला विभुला नेतां, मार्गीं कथी [12]पुरोवृत्ता; ।
चरणें गौतमजाया उद्धरवी, [13]कामसुखपरावृत्ता. ॥ ५९

जनकपुरा मग जाउनि, भंगुनि [14]भवचापदंड बाळपणीं, ।
कौशिकमुनिप्रसादें, जिंकी रघुवीर जानकीस पणीं. ॥ ६०

यतचित्तें त्या जनकें, धाडुनि [15]शिबिकारथेभवाहातें, ।
दशरथ, पूर्णमनोरथ, [16]सांतःपुर, आणिला, विवाहातें. ॥ ६१

जनपदजन बहु तेव्हां मिळते झाले कवि [17]प्रभूपयमीं; ।
गंधर्व, यक्ष, चारण, किंनर, सुरलोक, विप्र, भूप, [18]यमी. ॥ ६२

[19]यज्वा जनक, [20]स्वौरसं कन्या जे ऊर्मिला, तिचा पाणी ।
लक्ष्मणवीराकरवीं धरवी; तें लोक फार वाखाणी. ॥ ६३

राजाचा [21]अनुजन्मा, कुशध्वजाख्य प्रसिद्ध, तो कन्या ।
श्रुतकीर्ति [22]रिपुघ्नाला दे; भरतालाहि मांडवी धन्या. ॥ ६४

---

१. यथाशास्त्र. २. व्रतबंध, मुंजी. ३. त्या रामाच्या मुखशोभेस. ४. राक्षसपीडेच्या मिषानें. (कपटानें.) ५. रामरूपस्वपुण्यफळा. ६. ब्राह्मण. ७. विद्याविशेष ८. धनुर्विद्येतें. ९. युद्ध. १०. मंत्रसमूहज्ञविश्वामित्राचें. ११. बोलावी. १२. पूर्वी झालेल्या गोष्टीला. १३. विषयसुखापासून मागें फिरलेली. १४. शिवधनुष्याचा दंड. १५. पालखी, रथ, हत्ती, घोडे, यांतें. १६. सस्त्रीक. १७. रामलग्नीं. १८. योगी. १९. यज्ञकर्ता. २०. आपल्या स्वजातीय स्त्रीचे ठायीं झालेली. २१. कनिष्ठ बंधु. २२. शत्रुघ्नाला.

**म**हदुत्सवें विवाहीं अर्पी नृप जांवयासि[1] नगराशी[2]; ।
पूजुनि पंक्तिरथातें[3], आज्ञा दे जावयासि नगराशी. ॥ ६५

**श्री**[4]कंठशिष्य भार्गव, शिवचापध्वंसकुपित, आला जो; ।
हरिलें तद्यश **रा**में जें, त्याला कां न चंद्रमा लाजो ? ॥ ६६

**रा**[5]ग मनांतिल पहिला जातां, दुसराचि राग[6] मग झाला; ।
**म**हदानंदें भार्गव गेला, निववूनि कपटमनुजाला[7]. ॥ ६७

**ज**यशाली राघव तो करी **अ**योध्यापुरीं प्रवेशास; ।
**य**त्न न करितां जिंकुनि बाहुजकाळास[8], विप्रवेशास. ॥ ६८

**रा**जा, पुत्रचतुष्टयलाभें, अनुरूपतद्वधूलाभें, ।
'**म**त्सम सुखी न कोणी लोक' म्हणे 'मृत्युचेंहि न मला भें[9]'. ॥ ६९

**ज**न, हृत्पद्मीं पावे सुख वृद्धीतें, तसें नसे फार; ।
**य**शही वाढे सद्मीं, रघुवीर जसा जसा महोदार[10]. ॥ ७०

**ज**[11]गतीहृत्तापातें हळू हळू कीर्तिभाधिपें विझवी; ।
**य**त्नें करूनि सज्जनचित्तातें सच्चरित्र तो रिझवी. ॥ ७१

**रा**ज्यसुखाहुनि **द**शरथ पुत्रसुखें हृष्ट पुष्ट झाला; जे ।
**म**र्त्येतर तत्पतिही **क**श्यपही त्यासि सुप्रजा लाजे. ॥ ७२

---

## अयोध्याकांड.

'स्व**श्री** ज्येष्ठसुतातें द्यावी' हें मानसांत नृप आणी; ।
दिधलें **व**सिष्ठमुनिनें अनुमोदन, ऐकतां अशी वाणी. ॥ १

सा**रा** सारविचारप्रवीण मुख्य प्रधान जे होते; ।
पुसतां हें, नृपतीतें म्हणती 'लोकेष्ट' सर्वही 'हो' ते. ॥ २

[12]क्ष्मा**म**र **व**सिष्ठ पाहे, हर्षातें आंवरूनि, योगातें[13]; ।
अभिषेकाचें करवी साहित्य, करूनियां नियोगातें[14]. ॥ ३

अ**ज**सुतचिकीर्षितातें[15] जाणुनियां, शीघ्र **मं**थरा दासी ।
**कै**केयीला सांगे; ते तों पावे महाविषादासी. ॥ ४

---

१. जामातास. २. दागिने. ३. दशरथातें. ४. ह्या मंत्राच्या रचनेच्या संबंधानें वरील उपोद्घातांत ८ वी आर्या पहावी. ५. क्रोध. ६. प्रीति. ७. रामाला. ८. क्षत्रियनाशकास. ९. भय. १०. मोठा उदार. ११. पृथ्वीच्या हृदयसंबंधी संतापातें. १२. ब्राह्मण. १३. महादियोगातें. १४. आज्ञेतें. १५. दशरथाच्या मनोरथातें.

स्वी **य** [1]सुतातें राज्यप्राप्ति असावी म्हणोनि, [2]मानवती ।
 **रा**माभिषेकसमयीं विघ्न करी; त्यासि देव मानवती. ॥ ५

त्या **रा** जेंद्रें केले, जाउनि, सामाद्युपाय, जे असती; ।
 तरि समजेना, जडली तीस पिशाचीच **मं**थरा [3]असती. ॥ ६

'दे **म** त्सुतासि पृथ्वी, [4]अटवी **रा**मासि,' हें वदोन, [5]वर ।
 सत्यप्रतिज्ञ मूर्छित केला, मागोनि हेच दोन वर. ॥ ७

नि **ज** सुतवियोगविव्हळ, सत्यच्युतिभीत, तो असा विनवी; ।
 '**कै**केयि ! तुझ्या ठायीं निर्दयता हे अशी नसावि नवी. ॥ ८

व **य** माझें बहु गेलें, पुत्रोत्पत्त्यर्थ यत्न बहु केला; ।
 त्याशीं वियोग करितां, न कशी धरिशी [6]मदंतशंकेला. ॥ ९

तु **ज** राज्य सर्व दिधलें, आणिकही माग जें [7]अभीष्ट तुला; ।
 [8]गुणवदपत्यवियोगक्लेशासि जगत्रयीं नसेची [9]तुला. ॥ १०

का **य** तुझा **रा**मानें केला अपराध? सांग गे [10]प्रमदे ! ।
 कां माझ्या बाळावरि करिसी हा कोप? सांग गे [11]प्रमदे ! ॥ ११

हा **रा** ज्ञि ! पुत्र माझा सुकुमार, कुमार, [12]बहुविनीत, कृती; ।
 त्वत्पदलीन, तरीही, याविषयीं कां तुझी अशी प्रकृती? ॥ १२

कां **म** ति धरिली नंदनवियोगवन्हींत कांत होमाया? ।
 कां मज वृद्धावरिली **कै**केयी ! त्यागिली अहो ! माया? ॥ १३

हे, **श्री** पतिप्रसादें, वृद्धपणीं पुत्र जाहले चार; ।
 हें जाणुनि, हें वर्तसि, झाला तुज काय भूतसंचार?' ॥ १४

त्या **रा** यें **कै**केयीगुणें, करूनी तदा विलापातें, ।
 स्त्रीतें, पुत्रवियोगें होणार प्रांत, दाविला [13]पातें. ॥ १५

तों **मं** [14]ध्यममातेच्या गृहासि जाऊनि जों पहातात; ।
 **रा**घवलक्ष्मण, मूर्छित जनक विलोकूनि, म्हणति 'हा तात!' ॥ १६

तें **ज** ननीला पुसतां मूर्छेचें कारण स्वयें **राम**; ।
 पूर्वकथा सांगुनि ते प्रकट करी आपुला [15]मनःकाम. ॥ १७

---

१. स्वपुत्रातें. २. मानिनी. (कैकेयी.) ३. दुष्टा. ४. अरण्य. ५. नवरा. ६. माझ्या नाशाच्या शंकेला. ७. इच्छित. ८. गुणीपुत्रवियोगक्लेशासि. ९. तुलना, बरोबरी. १०. हे स्त्रिये. ११. त्रास देणारे. १२. अतिनम्र. १३. पतनानें. १४. कैकेयीच्या. १५. मनोरथ.

आ **य** कतां **राम** म्हणे, 'माते ! दैत्यारिंचा रिपु त्रास ।
सत्यविनाशापासुनि कां धरितो !' निर्मुनीहि पुत्रास. ॥ १८
हा **रा** राज्यभार सारा भरतें घ्यावा शिरीं, जरी श्रमही; ।
पितृसत्यत्राणास्तव, मी सेवावी सुखें अरण्यमही.' ॥ १९
स्व **म** त प्रकट करुनियां, रघुपति तीतें करूनियां नमन; ।
गमन करी धैर्यार्णव, ज्याचें तिळमात्र भंगलें न मन. ॥ २०
नि **ज** मातेला सांगे राघव भरतप्रसूचरित्रास; ।
तें ऐकतां, धरी ते पतिसुतदुःखें मनीं परित्रास. ॥ २१
भ **य** शोकासह हृदयीं रामासि धरूनि, माय फार रडे; ।
बाष्पोदकें सचैल स्नपन तदा त्या रघूत्तमासि घडे. ॥ २२
'म **ज** ही समागमें ने. तुज वांचुनि ही पुरी मला कारा;' ।
ऐसें वदोनि हृदयीं घट्ट धरी ते सुनिर्मलाकारा. ॥ २३
शं **य** जोडुनि **राम** म्हणे, 'जननि ! उपेक्षूं नको पिता माझा; ।
कैकेयीशब्दशरक्षत, [11]मद्विश्लेषविकल, हा राजा.' ॥ २४
हा **रा** ज्ञी सुतशब्द श्रवण करुनि, होय ते [12]विगतहारा; ।
[13]'हा राम!' म्हणोनि करी उरीं प्रहारासि [14]वर्जिताहारा. ॥ २५
न **म** न करुनियां निघतां, न शके माता सुतासि वरजाया; ।
जायाहि निघे त्याची, लक्ष्मणही सिद्ध जाहला जाया. ॥ २६
ते **श्री** काय पुरीची, [15]सीताव्याजें, रघूत्तमासहित, ।
जाणोनियां निघाली, निवारितांही, प्रियोत्तमास [16]हितें. ॥ २७
हें **रा** यासि कथाया, कैकेयीच्या स्वकीयगेहातें ।
जाउनि, सुमंत्र [17]वाक्यें कळवि, नमुनि तातपादयुग हातें. ॥ २८
सु **म** ति सुमंत्रहि विनवी कैकेयीतें अनेकवचनांहीं; ।
परि तद्दुरुक्तिबाणें न फुटे ऐसें जनीं कवच नाहीं. ॥ २९
'तु **ज** वनवास बरा कीं, ताताला नरकवास,' हें अदया, ।
निर्लज्जा, कैकेयी रामासि पुसे महादृषद्धृदया. ॥ ३०

---

१. दैत्यांचा. २. सत्यनाशापासून. ३. कैकेयीच्या चरित्रास. ४. नेत्रोदकें. ५. सवस्त्र. ६ स्नान. ७. बंदिशाला. ८. अतिनिर्मलरूपा (रामाला.) ९. हस्त. १०. कैकेयीच्या वाग्बाणे विद्ध. ११. माझ्या वियोगानें विव्हळ. १२. हाररहिता. १३. हाय. १४. आहार सोडलेली अशी. १५. सीतामिषानें. १६. हितकर. १७. म्हणणं. १८. त्या कैकयीच्या दुर्भाषणरूपबाणानें. १९. महापाषाणाचें आहे हृदय जिचें.

रा **य** असें आयकतां, 'हाय !' म्हणे 'बायको नव्हे, कृत्या[1]; ।
काय करूं? जाय वना बा! यश जोडीं, करूनि सत्कृत्या.' ॥ ३१
तों **रा** क्षसी तशी ते **रा**मातें 'वल्कलें' म्हणे 'धरणें; ।
चवदा वर्षें विपिनीं राहुनियां, आत्मतात उद्धरणें.' ॥ ३२
श्र **म** न गणुनि, सावरजें[2] **रा**में केलें तिच्या मनासारें[3]; ।
वल्कल धरितां भिजली परभू जननेत्रजीवनासारें[4]. ॥ ३३
ग **ज** गति सुकुमार अशीं तिघें निघालीं वनासि पदचारें; ।
स्वरथ **द**शरथ प्रेषी, **सु**मंत्रमांत्रिप्रयुक्तसुविचारें. ॥ ३४
तो[5] **य** जपत्राक्षातें तो यजमानाचिया निदेशाला[6] ।
कथुनि, प्रार्थुनि, यांनीं स्थापुनियां, ने तदिष्टदेशाला[8]. ॥ ३५
भि **ज** विति सज्जन पौर क्षोणीला बाष्पजीवनासारें; ।
जाती **रा**मासह ते; पुर भासे त्यांसि पितृवनासारें[9]. ॥ ३६
पा **य** धरुनियां म्हणती, '**रा**मा! आम्ही तुझेचि सांगाती.' ।
रडती, पडती पढती[10] स्तोत्रें, त्याच्याचि कीर्तिला गाती. ॥ ३७
पौ **रा** प्रहासी जाणुनि, निजल्या स्थानीं, करोनीयां मंत्र[11], ।
आमंत्रण न करुनियां, वंचुनि, निशि जाय **राम** स**सु**मंत्र. ॥ ३८
अ **म** रनदीच्या तीरीं गेला **र**घुवीर **शृं**[12]गवेरातें; ।
तेथें **गु**हनाम वसे निषादपति, जो हंसे **कु**बेरातें. ॥ ३९
तो, **श्री द**शरथनंदन आला, हें ऐकतांचि, संप्रकृती[13].।
येउनि करी सपर्या[14], वृत्तश्रवणें सखेद, सुप्रकृती. ॥ ४०
'सा **रा** विभवें[15] तुझा मी दास' म्हणे 'ये पुरासि अवनाला[16]; ।
राज्य प्राज्य करावें, यानें[17] करावें कदापि न वनाला.' ॥ ४१
सा **म** पुरःसरवाक्यें, **राम** म्हणे, 'या मदीय नेमातें ।
रक्षावें धर्मज्ञा !; तोषविलें त्वां सुहृज्जनें मातें.' ॥ ४२
र **ज** नी पादपमूळीं[18] वाहुनि, पावोनियां प्रभातासी[19], ।
वंदी रविला; ज्याची नित्य तमाला महाप्रभा तोंसी[20]. ॥ ४३

---

१. तामसदेवताविशेष. २. कनिष्ठबंधुसहितें. ३. मनासारखें. ४. लोकांच्या नेत्रसंबंधी उदकाच्या दाट वृष्टीनें. ५. कमलपत्राक्षातें. (रामातें.) ६. आज्ञेला. ७. रथीं. ८. त्या रामाला इष्ट जो देश त्याप्रत. ९. स्मशानतुल्य. १०. म्हणती. ११. मसलत. १२. पुरविशेष. १३. प्रधानासह. १४. पूजा. १५. संपत्ति. १६. रक्षणाला. १७. गमन. १८. वृक्षमूळीं. १९. प्रातःकालासी. २०. तासून टाकी, क्षीण करी.

'जा य' सुमंत्रासि म्हणे राघव 'रघुवंशभवनदीपासी; ।
सुखरूप वसें.' आपण गेला [1]हरिपादभवनदीपासीं. ॥ ४४
तो रा म सुरनदीतें मग गुहनौकाश्रयेंकरूनि तरे; ।
मायानदीस जैसा जन याच्या भक्तिसंश्रयें उतरे. ॥ ४५
'ने म जला सांगातें, लक्ष्मण जैसा तसेंचि मज [2]लेखें;' ।
हें वदतां तो वारी गुहासि सामोत्तरें [3]मनुजलेख. ॥ ४६
द्वि ज तरुलताढ्य आश्रम रामाच्या दे नितांत [4]मोदें मना; '
जेथ भरद्वाजरुचि प्रकाशितां भू हंसे [5]तमोदमना. ॥ ४७
न य कुशल राम वंदी शिरीं भरद्वाजपादकमलासें; ।
तो हृदयीं आलिंगुनि वर्षे सानंद बाष्प कमलातें. ॥ ४८
पू ज न करूनि, आज्ञा, आशीर्वादासमेत, दे सुमुनी; ।
तत्तापासह राघव गेला, तेथूनि, तत्पदें नमुनी. ॥ ४९
भ य वर्जित, जाउनियां, वसवी तो चित्रकूट शैलास; ।
जैसा [6]सेनानीचा तात, [7]शिवानाथ, देव, कैलास. ॥ ५०
धो रा श्रमें सुमंत्रही, जाउनि नगरीं, [8]अजात्मजास नमी; ।
नृप त्यास म्हणे, 'दुःखें, झालों बा! आज [9]यमपथासन मी. ॥ ५१
तों म त्पुत्र सुखी कीं? जो म्यां पापें वनास घालविला; ।
हें काय योग्य केलें? बापा! आनंददीप मालविला. ॥ ५२
हे [10]'श्री भारावह मज, यश गेलें, रात्रिदिन मनीं झुरतों; ।
[11]जलदाभकाय, पंकजनयन, न येतां घरास, मी मरतों. ॥ ५३
मि[12]'श्री म्हणोनि वदनीं निजहस्तें घातली पहा [13]सिकता; ।
कैकेयीस वरुनियां, वश झालों, नीति शिकविता [14]सिकता. ॥ ५४
त्या रा जीवदलाक्षें कथिलें मज काय? सांग तद्वृत्ता; ।
सौमित्रि काय वदला? सीता आहे कशी सुसद्वृत्ता.?' ॥ ५५
या [15]म नुजेंद्रोक्तीतें श्रवण करुनि, तो सुमंत्र त्यासि म्हणे, ।
'वज्रहृदय मी निर्दय कथितों तें सर्व ऐक राजमणे!. ॥ ५६

---

१. गंगेपासीं. २. गण. ३. नरदेव. ४. आनंद. ५. सूर्यास. ६. कार्तिकस्वामीचा. ७. उमापती. ८. दशरथास. ९. यममार्गी रहाणारा. १०. या मंत्राच्या रचनेच्या संबंधानें उपोद्घातांतील ८ वी गीति पहावी. ११. मेघतुल्यदेह. १२. साकर. १३. वाळू. १४. शिकणारा. १५. दशरथाच्या भाषणातें.

तु **ज** वंदुनियां येथुन गेला **रघुवीर शृंग**वेरातें; ।
　झाला पूज्य **गुहा**तें, जैसा **गौरी**पती **कु**बेरातें. ॥ ५७
प **य** फल भक्षुनि, रचिल्या वटदुग्धें त्या स्थळीं जटा **रामीं**; ।
　त्या देखिल्या सुहृज्जनहृदयाच्या भेदिल्या कुठारा मी. ॥ ५८
ते **रा** जसुता **सी**ता सेवितसे प्रेमयुक्त कमलाक्षा; ।
　जीचे, वनसंचारें, दिसती पद रक्त, जरि नसे लाक्षा[1]. ॥ ५९
ग **म** नश्रम न गणुनि, तो लक्ष्मण दृढ मानसीं, जसा अशनी[2]; ।
　स्वकरकृताग्रजशयनाजवळचि जागे निरिच्छ जो अशनीं[3]. ॥ ६०
सें **ज** लघनश्याम[4] मला 'जाणें' ऐशा करी नियोगातें[5]; ।
　**गं**गेला उतरोनी, गेला, देवोनियां वियोगातें.' ॥ ६१
आ **य** कतां हें मूर्छित झाला नृपती; तयासि **कौ**सल्या ।
　जलवातकरस्पर्शें सावध करि, दावुनी स्वकौशल्या. ॥ ६२
**अ** **ज** सुत रात्रीं स्मरतां स्वकर्म, महिषीस सर्व निजवृत्त ।
　सांगे, **कौ**सल्यांकस्थितमस्तक[6], अस्तशक्ति[7], सद्वृत्त[8]. ॥ ६३
'तो[9] **य** जदलाक्षि! पूर्वीं मी, मृगयालुब्ध, एकदा रातीं ।
　**शरयू**तीरीं होतों, शरपाणी, एकटा, मृगारातीं. ॥ ६४
नी[10] **रा** दानागतमुनिपात्ररवाकर्णनें अजाणानें, ।
　तापस, गजभ्रमानें, वधिला मी, शब्दपाति बाणानें. ॥ ६५
म **म** बाणविद्ध तापस 'हा तात!' असें म्हणोनि आरडला; ।
　तों मीं धांवत जाउनि विलोकिला तो, धरेवरी पडला. ॥ ६६
'हा **श्री** मुने! तुझा मी निष्कारणशत्रु वध्य; सकृपा[11] हें ।
　हस्तीभ्रमेंचि घडलें पाप **अयोध्या**पतीस मज पाहें.' ॥ ६७
हे, **रा** ज्ञि! वाक्य ऐकुनि, 'जननीजनकासमीप ने मातें;' ।
　ऐसें सशल्य[12] तापस वदतां केलें तदीय कामातें. ॥ ६८
हें **मं**[13] दुष्कृत जाणुनि, अंधें, वृद्धें, सकोप, तत्पितरें ।
　म्हणती, 'त्वां ही मरणें **सुत**शोकें यापरीच तप्ततरें.' ॥ ६९

---

१. लाख. २. वज्र. ३. भक्षणीं. ४. राम. ५. आज्ञेतें. ६. कौसल्येच्या मांडीवर ठेवलें मस्तक ज्याणें असा. ७. नष्ट झाल्या सर्वशक्ति ज्याच्या असा. ८. सुस्वभाव. ९. हे कमलाक्षि. १०. उदकग्रहणार्थ आला जो मुनि त्याच्या पात्रशब्दश्रवणेंकरून. ११. सदया. १२. बाणाग्र आहे हृदयीं ज्याच्या असा. १३. माझें दुष्ट कर्म.

म ज तें इष्टचि शापप्रदान गमलें तदानपत्याला; ।
मग वृद्धासह दिधला तद्वाक्यें वन्हि मी वनीं त्याला. ॥ ७०
भ य तेंचि मनीं होतें, केवळ माझेंचि कर्म मज फळलें; ।
या सुतशोकें घडतें मरण; मला निश्चयेंचि हें कळलें. ॥ ७१
हें रा ज्ञीला सांगुनि, पुत्राचें करुनि मानसीं स्मरण, ।
'हा राम ! राम!' ऐसा विलाप करितांचि, पावला मरण. ॥ ७२
या म रणीं, चार जरी पुत्र, तरी एकही न याजवळी; ।
तेव्हां होता सानुज भरत, नृपाज्ञे करूनि आजवळीं. ॥ ७३
द्वि ज वर वसिष्ठ ठेवुनि तैलद्रोणींत भूपदेहातें; ।
'दे हातें पुत्र' म्हणे 'भरतासि,' सुमंत्र करि, वदे हा तें. ॥ ७४
नै य वित् चार प्रेषुनि, न कळत आणोनि, सांगती 'तातें ।
केलें स्वर्गमन, तुला अर्पुनियां सर्व भूमि भरतातें.' ॥ ७५
हें ज ननीचें चरित श्रवण करुनियां, सखेद, फार रडे; ।
दंडाहत भुजग तसा कोपें मातेकडे तदा मुरडे. ॥ ७६
'प्रि य वधिला पापिष्ठे !, धाडुनि विपिनासि सद्गुणकरंडा; ।
केली अकीर्ति, आपण झालिस, पापाशयें, स्वयें रंडा. ॥ ७७
मा रा वें तुज पापे !, परि म्हणतो रामराय माय तुला; ।
यास्तव उपाय नाहीं; गरलाची तुजचि योग्य काय तुला ? ॥ ७८
य म कार्यकारिणी तूं कृत्या, मोहूनि यास विश्वास ।
पत्नी होउनि गिळिला राजा, माझा पिता, सविश्वास. ॥ ७९
न्ही श्री दया जयाच्या ठायीं, जो स्तुत्य या जनामाजी; ।
त्याला वनासि धाडुनि, केली तूं काय कामना मांजी ? ॥ ८०
तूं रा क्षसीपरीसहि अधमा, जे निजकुटुंब खातीस; ।
मीही पाप तुझा सुत,' हें बोले होय पीरखा तीस. ॥ ८१
वि म ना भरत क्लेशें कौसल्येच्या पदावरी लोळे; ।
डोळे उघडुनि, हृदयीं धरुनि, रडे राम मानसीं घोळे. ॥ ८२

---

१. आजाचे घरीं. २. तेलाचे कढईत. ३. वसिष्ठ. ४. नीतिज्ञ दूत. ५. स्वर्गास गमन.
६. विषाची. ७. उपमा. ८. जगास. ९. विश्वासयुक्त. १०. माझी. ११. विमुख, परका.

भि **ज** वी नेत्रजलानें **कौ**सल्या तप्त सूनुचा काय[1]; ।
    [2]ताताग्रजविश्लेषज्वलनप्रशमार्थ वर्षली काय? ॥ ८३

'श **य** न तुझ्या तातानें केलें, रुसला खरा जनावरता; ।
    याला समजावीसा कोण असे? बाळका! [3]सुभावरता !. ॥ ८४

त्या **रा** घवें पुरीला वियोग दिधला, नृपेंहि धरणीला; ।
    ईर्ष्या पुत्रासह ही केली, कीं दाखवूनि करणीला. ॥ ८५

ग **म** न रघुवरें केलें **कै**[4]केय्याज्ञेवरूनि [5]अटवीला; ।
    कालाज्ञेनें जाउनि भूपें स्वर्गासि लोक फटवीला. ॥ ८६

भु **ज** निर्जितारिवृंदें, वत्सा! जनकें तुझ्याचि [6]उद्दंड ।
    एकाच्या अपराधें केला सर्वांसि सारखा दंड. ॥ ८७

का **य** करूं? [7]वैधव्यज्वलनज्वालांतरीं तनू न जळे; ।
    न कळे पातळ केलें कोण? असा शोक ज्यामुळें उजळे'. ॥ ८८

ति **ज** ला **व**सिष्ठ [8]गुरुसम, जाउनि, समजावुनि, क्षण क्रमुनी; ।
    **भ**रताकरवीं करवी भूपाच्या [9]और्ध्वदेहिकास मुनी. ॥ ८९

प्र[10] **य** त प्रधान पौर, प्रजा **व**सिष्ठासवें तयावर ते; ।
    [11]मुकुटाभरणासाठीं प्रार्थुनियां, जाहले तया वरते. ॥ ९०

पौ **रा** दिकांस तेव्हां **भ**रत म्हणे, 'हें नको मला राज्य; ।
    [12]आज्यनिषेकें जैसा वन्हि, तसा शोक कां करूं [13]प्राज्य? ॥ ९१

व **म** नासमान माझ्या मनास हें राज्य देतसे विकृती;' ।
    ऐसें वदोनि **भ**रत [14]स्वाग्रजपदपूत मार्ग सेवि [15]कृती. ॥ ९२

जे **श्री** स्वयेंचि आली, यत्न न करितां, अशीसही [16]वैरंजी; ।
    तातादिकांसि मारुनि दुःखें संपादिती महीवर जी[17]. ॥ ९३

धी[18] **रा** ग्रणी, महात्मा, सेनेसहवर्तमान [19]सप्रकृती, ।
    **भ**रत समातृक, गेला [20]अटवीला, शोकविव्हलप्रकृती. ॥ ९४

---

१. देह. २. दशरथाचा जो रामवियोगाग्नि त्याच्या शांतीकरितां. ३. उत्तम भक्तितत्परा. ४. कैकेयीच्या आज्ञेनें. ५. वनाला. ६. मोठा. ७. वैधव्याग्निज्वालांत. ८. पितृतुल्य. ९. उत्तर-क्रियेस. १०. पवित्र. ११. मुकुटरूप अलंकारासाठीं, राज्याभिषेकासाठीं. १२. घृतसिंचनें. १३. पुष्कळ. १४. रामाच्या चरणानें पवित्र, १५. कुशल. १६. त्यागी. १७. श्री. १८. धीरश्रेष्ठ. १९. प्रजासहित. २०. वनाला.

श्र **म** रनदीतें उतरुनि, गुहसंगें, अग्रजांघ्रिलाभरतें; ।
मग, **चि**त्रकूटपर्वतवनवासी **राम** वंदिला **भ**रतें. ॥ ९५

कं[3] **ज** दलायतलोचन, वल्कलवासा, जटी महालिंगी,[4] ।
जयशाली, यशशाली, **राम** प्रेमेंकरोनि आलिंगी. ॥ ९६

ता **य** **व**सिष्ठमुनीचे वंदुनि, जननीजनास तो वंदी ।
मंदीकृतवनवासक्लेश, महाधीर, वीर, आनंदी. ॥ ९७

गौ[5] **रा** मात्यनतांघ्री ऐके जों **राम** तातमरणातें; ।
तों ये मोह मनासी, नेत्रांसींही महातम,[6] रणातें.[7] ॥ ९८

श **म** वी **व**सिष्ठ राघवशोकज्वलनासि[8] बोधभुवनानें;[9] ।
भुवनानेकाभीष्टद[10] तर्पी तातासि तो विभु वनानें.[11] ॥ ९९

अं **ज** लि रचूनि, **भ**रत, स्तवुनि, म्हणे, '**मै**थिलीश्वरा ! ज्यातें ।
जें योग्य तेंचि द्यावें; तूंचि विभो ! योग्य विश्वराज्यातें. ॥ १००

न **य** निपुणा ! धर्मज्ञा ! नाहीं लोकांत तूजपरि वेत्ता;[12] ।
क्षोणीवरणें होइन, तुज [13]परिवित्ती करोनि, [14]परिवेत्ता. ॥ १०१

भ **ज** न तुझ्या चरणाचें, हें राज्य प्राज्य दे मला देवा !; ।
न मज वियोगज्वलनीं, होमीं हो; मी करीन पदसेवा. ॥ १०२

कीं[15] **य** हि तुझ्या वियोगें दुर्वह, भूभार हा कसा वाहूं ? ।
काय कृपा झाली ते ? कां तूं त्यजितोस लोकसा बा ! हूं.' ॥ १०३

हीं[16] **रा** यिताश्रुधारें, 'हा **राम** !' असे विलाप त्या **भ**रतें ।
केले जे तच्छ्रवणें आलें **प्र**भुच्या दयाब्धिला भरतें.[17] ॥ १०४

'श्र **म** लासि; जा पुरीला; येइन सरतांचि वर्ष चवदावें; ।
ताताज्ञानिरतातें, **भ**रता ! मातें, अणीक न वदावें. ॥ १०५

तों **श्री सी**तापतिला **भ**रत म्हणे, 'न करितां कृतावधिला; ।
शपथपुरःसर कथितों, होइल लोकांत अनुज तूं वधिला. ॥ १०६

ता **रा** वयासि मजला, दुःखसमुद्रांत पादुकातरणी,[18] ।
तरणिकुलालंकारा[19] ! दे; ज्या करितात पापघात रणीं.' ॥ १०७

---

१. गंगेतें. २. रामपदलाभरतें. ३. कमलपत्रासारिखे विस्तीर्ण नेत्र ज्याचे असा. ४. ऋषिरूपधारी. ५. नगरवासी लोक आणि प्रधान यांणीं नमिले पाय ज्याचे असा. ६. मोठा अंधकार. ७. शब्दातें. ८. रामशोकाग्नीस ९. ज्ञानोदकानें. १०. अनेकलोकमनोरथपूरक. ११. उदकें. १२. ज्ञानी. १३. परिवेत्त्याचा बंधु. १४. ज्येष्ठबंधूचा विवाह न होतां कनिष्ठबंधूचा विवाह झाला तो. १५. देहहि. १६. हारवत् अश्रुधारा ज्याची. १७. भरती. १८. पादुकारूप नौका. १९. सूर्यकुलभूषणा.

का **म** पुरवितां **राम**ें, गुर्वाज्ञा म्हणुनि **भ**रत तो परते; ।
पर तेथचि **रघुपतिपदपद्मी**ं[1] तच्चित्त भृंगरूप[2] रते. ॥ १०८

'भ[3] **ज** कामरद्रुमा ! तूं मजला विसरूं नको!' म्हणोनि रडे; ।
**भ**रत क्लेशें गेला, परि मन त्याचें न सर्वथा मुरडे. ॥ १०९

तो **य** तिसमानधर्मा **नं**दिग्रामीं वसे, न **सा**केतीं; ।
वल्की[4], जटी[5], फलाशी[6], भूशायी[7], प्राण ठेवि संकेतीं. ॥ ११०

का **रा** गृहगतसम तो, सामात्य सदैव पादुका अर्ची[8]; ।
शिंपी विवेकनीरें[9], परि न शमे शोकवन्हिची अर्ची[10]. ॥ १११

स्व **म** नीं **रा**घवमूर्ति, स्थापुनि भद्रासनींहि[11] सद्योगें; ।
**र**घुवीरपादुकांला, पूजुनि पाळी प्रजेसि तद्योगें[12]. ॥ ११२

र **ज** नीचरकाळहि तो[13] सज्जनवृंदाचिया सुभुवनातें ।
अवलोकित **वि**भु गेला सानुज, सस्त्रीक, **अ**त्रिभवनातें. ॥ ११३

न्या **य** पथेंचि मुनीतें वंदी जो मान्य या त्रिभुवनातें; ।
पूजुनि **वि**भुला मानी, कैवल्यानून[14] **अ**त्रि भुवनातें. ॥ ११४

नि **ज** भूषणें समर्पुनि **सी**तेला मायशीच[15] मुनिभार्या ।
आर्या[16] **अ**नुसूया ते सत्कारी, जे सतीस सत्कार्या[17]. ॥ ११५

क्ष **य** राक्षसलोकांचा करावया, तो, उदंड कारुण्या[18] ।
हृदयीं धरूनि, पावे, **अ**त्रिस वंदूनि, **दं**डकारण्या. ॥ ११६

वा **रा** वयासि राक्षसतिमिरातें[19] **रा**म तो महातरणी; ।
गेला शत्रुजनांतीं, ज्याचा शरदानकाम हात रणीं. ॥ ११७

क **म** लायमानलोचन, पावे जाऊनि **दं**डकारण्य; ।
भक्त**म**यूरावरि करि करुणाघन[20] तो उदंड कारुण्य. ॥ ११८

---

## अरण्यकांड.

दिव्य**श्री** मंडित तो, **रा**म जसा **दं**डकावना गेला; ।
पूजुनि मुनि म्हणति, 'तुझ्या पदें विसावा दिलाचि **गं**गेला.' ॥ १

---

१. भरतचित्त. २. भ्रमररूप. ३. हे भजणाऱ्यांच्या कल्पद्रुमा. ४. वल्कलें धारण करणारा. ५. जटाधारी. ६. फलाहारी. ७. भूमीवर निजणारा. ८. पूजी. ९. विवेकोदकें. १०. ज्वाला. ११. सिंहासनीं. १२. पादुकाज्ञेनें. १३. राम. १४. मोक्षाहून उणें नव्हे. १५. मातेसारखीच. १६. श्रेष्ठा. १७. सत्कारास योग्या. १८. दयेला. १९. राक्षसरूप अंधकारातें. २०. दयामेघ.

अम[1] **रा** धिपापरी तो झाला विप्रांसि पूज्य सुखराशी, ।
प्रखरासिबाणपाणी[2]; लाजे रवि तत्पदाब्जनखराशी[3]. ॥ २

आश्र **म** वासी मुनि ते सत्कारिति सुस्वभाव सुमतीला; ।
त्याकाळीं बहु लाजे गतप्रभा **वि**धिसभा वसुमतीला[4]. ॥ ३

तों द्विज **ज** शत्रू राक्षस, **वि**राध आला गिरी जसा ढळला; ।
**सी**तेला हरुनि पथीं, 'आहार' म्हणे 'बराचि आढळला.' ॥ ४

निर्भ **य** दोघे बंधू, करितां युद्ध, स्वबाहुंनीं कैवळी[5]; ।
स्कंधीं वाहुनि निघता झाला तो सर्व आननें[6] कैवळीं[7]. ॥ ५

प्रख[8] **रा** सी ते छेदिति, असतां स्कंधींच, बाहुदंडांतें; ।
ते पुष्पवंत[9] जाणों, दोघे करितात **रा**हुदंडातें. ॥ ६

तो, अम **म** रप्रभ दुसरें देह धरुनियां, कथी सुसद्वृत्त ।
**रं**भालिंगनकुपित, **द्र**विणप्रदलब्धशाप हें वृत्त.' ॥ ७

सानु **ज** **राम** तयाचा आच्छादी देह करुनियां पदर; ।
स्वर्गोत्सुकशरभंगस्थाना[10] गेला, हरूनि विप्रदर[11]. ॥ ८

विनं[12] **य** पुरःसर नमिला मुनि तोही, पूजुनि प्रमोदानें[13]; ।
गेला स्वर्लोकातें[14], तर्पुनिया[15] पावकासि[16] तनुदानें. ॥ ९

मग **ज** गदीश, **सु**तीक्ष्णद्विजाश्रमाला करोनियां काशी; ।
गेला **अ**गस्त्यमुनिच्या स्वस्थानासी द्वितीयनाकाशी[17]. ॥ १०

आम्ना **य**[18] मूर्तिला त्या 'रामोऽस्मि'[19] असें कथूनियां वंदी; ।
बंदी[20] होय **अ**गस्त्यही, आघ्राण करी शिरीं महानंदी[21]. ॥ ११

सत्का **रा** नंतर, दे आशीर्वादासवें धरेशासी[22] ।
**ब्र**म्हास्त्र, **वि**ष्णुकार्मुक, **श**क्रेषुधियुग्मरत्न, लोकासी. ॥ १२

प्रण **म** न करूनि मुनिला, गेला तेथूनि **राम** वल्कपटी[23] ।
**गो**दावरीतटीं त्या **पं**चवटीतें वधावया कपटी. ॥ १३

---

१. इंद्रासारखा. २. तीक्ष्ण खड्ग आणि बाण हातामध्यें ज्याच्या असा. ३. त्याच्या पदकमलनखासि. ४. पृथ्वीला. ५. कौटाळी. (दोहों हातांमध्यें धरी, असा भाव.) ६. मुखें. ७. ग्रासी. ८. तीक्ष्ण आहे खड्ग ज्यांचे असे. ९. सूर्यचंद्र. १० स्वर्गमनोत्कंठित शरभंग ऋषीच्या आश्रमास. ११. विप्रभीति. १२. नम्रतापूर्वक. १३. हर्ष. १४. स्वर्गलोकास. १५. तृप्त करून. १६. अग्नीस. १७. दुसऱ्या स्वर्गासच. १८. वेदमूर्तिला. १९. राम आहें. २०. स्तुतकर्त्ता. २१. मोठा आनंद ज्याला असा. २२. पृथ्वीपतीस. २३. वल्कलरूप वस्त्रें धारण करणारा.

तेथें **श्री**[1] कंठनिजश्यालोच्चतनू जटायुगृध्रातें ।
पाहुनि, **सी**ता मानी निजचित्तीं [2]पक्षवन्महीध्रातें. ॥ १४

मग **रा** घवासि पुसतां, 'दशरथनृपमित्र मी' म्हणे 'गृध्र; ।
[3]संपात्यवरज, कश्यपवंशज, नामें जटायु, न [4]महीध्र.' ॥ १५

विश्रा **म** पावला बहु, जटायुला दिवस होय [5]पर्व तसा; ।
'पंचवटीस वसा' हें सांगोनि उडे सपक्षपर्वतसा. ॥ १६

[6]अनु **ज** कृतच्छदसदनीं, [7]सदनिष्टविनाशदक्ष पादरज; ।
[8]दर जगतीचें हरितो [9]हरितोषद, [10]कौसलेशजोदरज. ॥ १७

[11]इच्छ **य** विकला प्रार्थी शूर्पणखा राघवास [12]अविदग्धा; ।
मृगजलपूरास जशी वनहरिणी, [13]दवपावकविदग्धा. ॥ १८

रुचि **रा** क्षी हेमंतीं, रघुनाथाला म्हणे, 'मला वरणें; ।
आवरणें [14]स्मरवैरी, रक्षीं वीरा! [15]भुजामलावरणें.' ॥ १९

तोसा **म** युक्तवाक्यें, राम म्हणे, 'मी असें सदार जनीं; ।
अस्त्रीक बंधु माझा; त्याला [16]युग होतसे सदा रजनी. ॥ २०

जा, तु **ज** वरील बलवान्, मजहुनि तो योग्य, हें मला [17]वाटे;' ।
ऐसें वदोनि, अंतस्मित लावी एकदां तिला वाटे. ॥ २१

ते जा **य** लक्ष्मणाप्रति, धरूनियां रम्यरूपवेश [18]स्त्री; ।
तीस विलोकुनि मानी रामानुज तो मनी जशी [19]शस्त्री. ॥ २२

[20]चिंत **ज** शराग्निदग्धा मी [21]सुविदग्धासि तूज [22]जलदासी, ।
आलें शरण शरण्या! रक्षावि स्वाधरामृतें दासी.' ॥ २३

'मी तो **यँ**[23] जमुखि! राघवदास' म्हणे 'मज कशास वरतीस? ।
जा तुज वरील राम, त्यजुनि अरण्या क्षमेस [24]वरतीस.' ॥ २४

अशि **रा** क्षसी अनार्या, येथेंही पावली न कामातें; ।
पुनरपि रामास म्हणे विनवुनियां, कीं, 'त्यजूं नका मातें.' ॥ २५

---

१. महादेवाचा स्वकीय मेहुणा जो मैनाक पर्वत त्यासारिखा उंच देह ज्याचा अशा जटायुपक्ष्यातें. २. सपक्ष पर्वत अशातें. ३. संपातीचा कनिष्ठ बंधु. ४. पर्वत. ५. संक्रांत्यादिक पर्वासारिखा. ६. लक्ष्मणकृत पर्णशालेंत. ७. साधूंच्या अकल्याणाच्या नाशाविषयीं दक्ष चरणरज ज्याचें असा. ८. भय. ९. इंद्राला संतोष देणारा. १०. कौसल्येचा पुत्र. (राम.) ११. कामविव्हला. १२. मूर्खा. १३. वणव्यानें दग्धा असी. १४. कामरूप शत्रू. १५. बाहुरूप शुद्ध आच्छादनानें. १६. युगासारिखी. १७. भासे. १८. ती शूर्पणखा. १९. शस्त्रधारी. २०. कामबाणपीडिता. २१. चतुरासि. २२. मेघासी. २३. कमळवदने. २४. वरणारीस.

[1]अभि **म** तकाम न होतां, **शूर्प**णखा क्रूरदेहरूपा, हे; ।
[2]क्रोधेस्मराभितप्ता, **वैदे**हीतें स्वयें हरूं पाहे. ॥ २६

मातृ **श्री** भ्रातृस्त्री भीता व्याघ्रीपुढें जशी हरिणी; ।
लक्ष्मण तीतें केशीं धरी, हरी जेंवि माजली [3]करिणी. ॥ २७

मग **[4]रा** मावरजानें [5]श्रुतिसह तीच्या हरूनि नाकाशीं, ।
तोषविलें, हांसविलें, भयही दिधलें, क्षणांत [6]नाकाशी. ॥ २८

पर **म** क्रोधें मग ते **शूर्प**णखा, जाउनि **ज**नस्थाना ।
**खरदू**षणादिकांला सांगुनि, करवी ससैन्यप्रस्थाना. ॥ २९

ते र **ज** नीचर, [7]चवदा सहस्र नक्तंचरांसि वेगानें, ।
घेउनि रणासि येतां, [8]वायस करिती [9]शिवांसवें गानें. ॥ ३०

हाका **य** थेष्ट मारिति, म्हणती 'मारा, धरा, चिरा, भाजा;' ।
[10]अंचिराभा झाली ते, धाकें, **अ**जपुत्रसूनुची [11]भाजा. ॥ ३१

मग, '**रा** जकन्यकेला रक्षावें' हें कथूनि भावाला; ।
[12]ध्वांतीं सूर्य, तसा तो दावी रक्षोगणीं प्रभावाला. ॥ ३२

जे स **म** राला आले **रा**घव त्यांचें करूनियां शमन, ।
[13]शमननगर भरुनि, करी [14]क्रव्यादांचेंहि पूरिताश मन. ॥ ३३

त्यांत **ज** नस्थानाला **शूर्प**णखा मात्र [15]निस्त्रपा पाहे, ।
**द**शवदनासहि जाउनि सांगे संपूर्ण वृत्त पापा हे. ॥ ३४

संक्ष **य** **ख**रादिकांचा; भगिनीनासाविनाश मर्त्यकरें; ।
यास्तव मनीं **द**शानन, मानुनि बहु दुःख, कोपला निकरें. ॥ ३५

जेव्हां **ज** नकसुतेचें **शूर्प**णखा रूप, भाग्य वाखाणी; ।
हृदयवनीं [16]**स्मर**सूकर [17]विवेकवल्लीस तेधवां खाणी. ॥ ३६

निश्च **य** करी स्वचित्तीं, हरावया **स्त्री**च **रा**मरायाची; ।
अनिवार्य बुद्धि ऐशी, उपजे [18]रात्रिंचरा मरायाची. ॥ ३७

मग **रा** क्षसेंद्र जाउनि **मा**रीचाला म्हणे, 'स्वयें हरण ।
कनकाकृति होउनियां, करणें त्वां **जा**नकीमनोहरण.' ॥ ३८

---

१. इच्छित मनोरथ. २. क्रोधकामपीडिता. ३. हत्तीण. ४. लक्ष्मणानें. ५. कर्णांसह. ६. स्वर्गास. ७. चवदा हजार राक्षसांस. ८. कावळे. ९. कोल्ह्यांसह. १०. विद्युल्लतेसारखी क्षणांत नाहींशी झाली कांति जीची. ११. भार्या. १२. अंधकारीं. १३. यमनगर. १४. मांस खाणाऱ्यांचेंही. १५. निर्लज्जा. १६. मदनवराह. १७. विचारवेलीस. १८. राक्षसा.

[1]विक्र **म** रघुनाथाचा **मा**रीच तदा स्वयें वदे; वारी; ।
परि तें स्वहित न मानी तो, विपरीतस्वभाव [2]**दे**वारी. ॥ ३९

मातृ**श्री** चें घडतें दर्शन, हा निश्चय स्वयें केला; ।
[3]गत्यंतरविरहास्तव, गेला **मा**रीच **पं**चवटिकेला. ॥ ४०

असु **रा** धिपहि [4]जलदपथनिहितरथ जपे निजेष्ट साधाया; ।
खरतर विषरस सेवुनि, पामर इच्छीतसे जसा [5]धाया. ॥ ४१

तो हे **म** हरिण होउनि, **मा**रीच, न लावितांहि घटिकेला, ।
गेला सभयमनानें, **रा**वणवाग्बद्ध **पं**चवटिकेला. ॥ ४२

त्याला **ज** सें विलोकी **वै**देही साभिलाष तोंच, पळ ।
अवकाश न करितां, बहु वेगें, गेला पळोनि तो चपळ. ॥ ४३

स्त्रीप्रि **य** जाणुनि, [6]उटजीं ठेवुनियां लक्ष्मणासि त्या मागें, ।
शरकार्मुकधर **रा**घव गेला विपिनीं **मृ**गाचिया मागें. ॥ ४४

रघु **रा** जसिंह नेला, लोभवुनी, फार दूर वीरमणी; ।
[7]रमणीयाकृतिलोभें, धांवे, आनंदवावया [8]रमणी. ॥ ४५

मग **म** मभेदिरा**घ**वशरविद्ध [9]क्ष्मातळावरी पडला; ।
'हा तात !' असें [10]**रा**मध्वनिसंनिभ आर्तरूप आरडला. ॥ ४६

तो, र **ज** नीचररूप प्रकटोनि, पडोनि, कांपवी [11]अटवी; ।
फटवी **रा**मासि असा; [12]**द**शतुंडाला महासुखें नटवी. ॥ ४७

हा आ **य** कोन शब्द, व्याकुळ होऊनि; [13]**दा**शरथिजाया, ।
पतिजीवहानिभीता, **सी**ता, [14]निजदिवरासि कथि जाया. ॥ ४८

तेव्हां **ज** नकसुतेला **सौ**मित्रि म्हणे,' न सत्य; हे माया; ।
त्रैलोक्यांतहि नाहीं वीर, रणीं जो वधील **रा**मा या. ॥ ४९

तूं भ **य** मनांत कांहीं न धरावें; हे [15]पलाशजनमाया; ।
**र**घुवीराला पीडी ऐसा कोणी नसेचि [16]जनमाया.' ॥ ५०

हें दी **रा** चें वाक्य श्रवण करुनियां म्हणे, 'तुझा काम ।
कळला मज, दुर्बुद्धे ! परि [17]मत्तनुनाथ एक **र**घुराम; ॥ ५१

---

१. पराक्रम. २. देवांचा शत्रु. (रावण.) ३. अन्यगति नाहीं म्हणून. ४. आकाशीं स्थापिला रथ जेणें. ५. तृप्त व्हाया. ६. पर्णशालेंत. ७. सुंदर आकृतीच्या लोभें. ८. स्त्री. ९. पृथ्वीवर. १०. रामशब्दतुल्य. ११. वन. १२. रावणाला. १३. सीता. १४. आपल्या दिरास. १५. राक्षस-कपट. १६. उत्पन्न व्हाया. १७. मत्पति.

ऐसें **म** होग्र वदतां, लक्ष्मण करि कर्णपाणिसंगतिला; ।
'शिव ! शिव !' म्हणोनि वंदी, दुर्वाक्यश्रवणकंपितांग, तिला. ॥ ५२
'हा हा **श्री राम** !' असें दुःखाकुल तो वदोन कर जोडी; ।
**सी**तेसि म्हणे, 'माते! पापाची तूं वृथा न कर जोडी. ॥ ५३
माते! **रा** हें स्वस्था; जातों त्वत्पादपंकजा नैत मीं; ।
साग्रज सत्वर येतों; मग्न करावें स्वचित्त तूं न तमीं.' ॥ ५४
प्रेण **म** न करून गेला, नेला **प्र**भु ज्या पथेंचि **मा**रीचें; ।
तों यतिवेष **द**शमुख हरण करी त्या **ध**राकुमारीचें. ॥ ५५
व्याघ्रें **ज** शी कुरंगी, तशि नेतां राक्षसें धरूनि करें; ।
'हा लक्ष्मण! हा रघुवर!' अशि **सी**ता आरडे, रडे, निकरें. ॥ ५६
'जैसा **य** वन वधाया नेतो धेनूसि, हा तसाचि खल;' ।
ऐसें वदोनि रडती वनदेवी; तो पडे वनीं चिखल. ॥ ५७
तों त्या **रा** नीं होता **द**शरथनृपमित्र, **गृ**ध्रराज, बळी; ।
**सी**ताविलाप ऐकुनि, जाय नभीं **पं**क्तिकंधराजवळी. ॥ ५८
पक्षी, **म** हापराक्रम, **ज**टायु त्याला म्हणे, 'अरे चोरा ! ।
हो, राजकन्यकेला सोडुनियां, दूर बाष्कळा! पोरा! ॥ ५९
कां तु **ज** मृत्यूवदनप्रवेश रुचला ? गतत्रपा[10]! सून ।
माझी सोडीं; **लं**का होऊ विधवा न आजपासून. ॥ ६०
हें का **य** दुष्टबुद्धे! मूढा! नीचा! निशाचरापसदा[11]! ।
स्वकुळसमुच्छेदकर[12] व्यर्थचि संपादितोसि पाप सदा.' ॥ ६१
ऐसें **ज** रि हित कथिलें, तें **रा**वण सर्व वाक्य परिसून, ।
तैसाचि जाय गर्वें; **ज**टायुची सोडिली न परि सून. ॥ ६२
मग **यं**[13] मदंडाशनिसमनिजचंचूपक्षपादनखराहीं ।
मोडुनि रथ, गृध्र म्हणे, 'मदायुधें पाहिलींस न खरा[14]! हीं.' ॥ ६३
मग **रा** वण अन्यायें, खड्गें छेदूनि गृध्रपक्षतिला[15], ।
अन्यरथीं स्थापुनियां, घेउनि गेला मनुष्यभक्ष्य[16] तिला. ॥ ६४

---

१. कानांवर हात ठेवणें. २. संपादन, मिळवणें. ३. नम्र. ४. दुःखीं. ५. नमस्कार. ६. सीतेचें. ७. हरिणी. ८. जटायु. ९. रावणाजवळ. १०. हे निर्लज्जा. ११. हे राक्षसाधमा. १२. स्वकुलनाशक. १३. यमदंडवज्रतुल्य जीं स्वचंचू, पंख, पाय, नखें, त्यांहींकरून. १४. गाढवा. १५. जटायूचे पंखाच्या मूळांस. १६. राक्षस.

नेतां **म** हासतीतें पाहे दूरून ऋष्यमूक [१]नग; ।
[२]सुगलादि कपी देखे; सोडी [३]कौशेयबद्ध त्यांत [४]नग. ॥ ६५
आत्म **श्री** नाशास्तव, नेउनियां **जा**नकीस **लं**केला, ।
ठेवी **अ**शोकवनिकागर्भी, न धरूनि पापशंकेला. ॥ ६६
खश **रा** नें मारुनियां, तो **राम** वनांत [५]**ता**टकातनुजा, ।
मागें फिरोनि येतां, [६]कांतारीं भेटला स्वयें [७]अनुजा. ॥ ६७
[८]प्रण **म** न करून **ल**क्ष्मण, **वि**भुला [९]**सी**तोक्ति सर्व आयकवी; ।
तच्छ्रवणें व्याकुल बहु झाला चित्तांत सुज्ञराय [१०]कवी. ॥ ६८
तों नि [११]**जें** उटजा येतां, मार्गी होती अनेक अपशकुन; ।
हानीतें सुचवीती नि[१२]जदेहस्फुरण, मृग, [१३]शिवा, [१४]शकुन. ॥ ६९
आल **य** जाउनि पाहे, तों **सी**ता **रा**घवासि भेटेना; ।
त्या समयाहुनि दारुण मृत्यु, असें **ल**क्ष्मणासि वाटेना. ॥ ७०
'[१५]रुचि **रा** क्षा नाहीं कीं, वत्सा ! हें अन्यगेह वाटतसे; ।
इतरस्थलासि आलों, चुकती [१६]अनभिज्ञ लोक वाट, तसे. ॥ ७१
वत्सा! **म** ज जरि म्हणसी, '**सी**तेची हेच होय [१७]दलशाला; ।
तरि मीच **रा**मनामा नसेन; साध्वी दिसेल काशाला ? ॥ ७२
ते म **ज** वांचुनि नाहीं गेली **गो**दावरीविहारातें; ।
क्षण मद्विरहें तीतें युग होतें; भार भावि हारातें. ॥ ७३
तें प्रि **य** तमा न [१८]हिंस्रें वधिली; नाहींच रक्त भूवरतें; ।
नेलीच राक्षसानें;' म्हणोनि शोधी स्थल [१९]क्ष्मावर तें. ॥ ७४
'कोठें **ज** नकसुते ! तूं गेलीस ? धरासुते ! प्रिये जाये ! ।
न करीं विनोद; झाला व्याकुल अत्यंत देह माझा; ये. ॥ ७५
तूं का **य** कोप धरिला ? अपूर्व मृग नाणिला म्हणून मनीं; ।
तरि चंद्रमृगहि आणुन देइन, हें तूं असत्यसें [२०]नं मनीं. ॥ ७६

---

१. पर्वत. २. सुग्रीवादि. ३. रेशमी वस्त्रबद्ध. ४. दागिने. ५. मारीचा. ६. वनीं. ७. लक्ष्मणा. ८. नमस्कार. ९. सीतावाक्य. १०. ज्ञाता. (राम.) ११. स्वपर्णशालेला. १२. आपलें अंगस्फुरण. १३. भालवा. १४. पक्षी. १५. सीता. १६. अज्ञानी, न जाणते. १७. पर्णशाला. १८. घातकें. १९. पृथ्वीपति. (राम.) २०. मानूं नको.

**श्वशुरा**का परलोकीं गेलिस जरि तूं करावया नमना; ।
पुसल्यावांचुनि कैशी **सीते**! झालीस आज यानमना? ॥ ७७

न्यावें **म** जही तेथें, श्वशुराची प्रार्थना करून, सती ! ।
भरत करू राज्यातें, तुजवांचुनि वेंचुनी, सुखें नसती. ॥ ७८

राज्य**श्री** हरुनि, जरी कैकेयीनें वनास पाठविलें; ।
तरि तव योगें तें मीं नाहीं कांहीं मनांत आठविलें. ॥ ७९

मज **रा** जकन्यके ! तूं वरूनियां पावलीस न सुखातें; ।
खातें हें चित्तातें; सांगों कोणास मी स्वदुःखातें? ॥ ८०

हा क**म** लाक्षि ! तैनूदरि ! सुंदरि ! जाये ! प्रिये ! अये ! सदये ! ।
विधुमुखि ! पिकगर्वापह, अमृताहुनि गोडसें, स्वयें वद; ये. ॥ ८१

पंक **ज**, विधु, हरि, गज, पिक, चमरीमृग, कीर जिंकिले होते; ।
त्वन्मित्रातें मातें, त्वद्वैरें, पीडितील सखि ! हो ! ते. ॥ ८२

हा प्रि**य** तमे ! वियोगज्वलनमुखीं होमिलेंस कां मातें? ।
वैरी संतोषविले, टाकुनि यातें वनीं सकामातें.' ॥ ८३

ऐसा **रा** त्रिदिवसही विलाप करि शोकपर, जसा कोक; ।
कोकनदाक्ष, सुमित्रातोकसहित, तो करी विकळ लोक. ॥ ८४

शोधी **मे** दिराक्षीला कांतारीं, तों स्वतातमित्रातें ।
पाहे **जटायु**तें तो; मानी आकाशनष्टमित्रातें. ॥ ८५

मग **ज** वळ जाय; पाहे; तों शस्त्रछिन्नपक्षती, पक्षी ।
आसन्नमरण होउनि, राममुखातें स्वलोचनें लक्षी. ॥ ८६

'माझ्या**य** शासवें ते **सीता** नेली **दशाननें रामा**!;' ।
ऐसें वदोनि, पावे अन्यजनालभ्यनित्यनिजधामा. ॥ ८७

सानु**ज** राघव तेव्हां, 'हा तात !' असें रडोनियां त्यातें, ।
स्वपित्यातें दुर्लभ जें, तें दे जल, दाह करुनि, चुलत्यातें. ॥ ८८

१ गमनीं आहे मन जीचें अशी. २. जगून. ३. हे कृशोदरि. ४. हे चंद्रमुखि. ५. कोकिलांचा गर्व दूर करणारें. ६. चंद्र. ७. सिंह. ८. वनगाय. ९. चक्रवाक पक्षी. १०. कमलनेत्र राम. ११. लक्ष्मणसहित. १२. सीतेला. १३. वनीं. १४. आकाशापासून पतित सूर्यच. १५. शस्त्रच्छिन्न आहेत पंखांचीं मूळें ज्याचीं असा. १६. जवळ आलें मरण ज्याला असा. १७. अन्यांला न मिळणारें जें अविनाशी निजपद त्यातें.

तो तो[1] **य** जाक्ष[2] अगमृगनगभृंगपतंगभुजगसंघातें ।
'सीता विलोकिली कीं?' म्हणुनि पुसे[3] मूढ **कामशरघातें.** ॥ ८९

ऐसें **रा** नीं फिरतां, अधोमुखीनाम राक्षसी, नीचा, ।
लक्ष्मणशस्त्रें, पावे, स्वगुणें, गतिला[4] दशास्यभगिनीच्या. ॥ ९०

ते भ्र **म** तां क्रौंचवनीं, यथार्थनामा[5] कबंध दोघांतें ।
कवळी योजनभुज तो, [6]सिकतासेतू जसा जलौघातें. ॥ ९१

तेव्हां **श्री**[7] कंठगलश्यामासियुगें धरूनियां, धीर ।
[8]कदलीकांड तसे ते प्रचंड भुजदंड खंडिती वीर. ॥ ९२

मग **रा** क्षस निजशाप, [9]स्थूलशिरोविप्रदत्त, आयकवी; ।
सुग्रीववानरर्षभमैत्री करणें प्रियासि हें शिकवी. ॥ ९३

'हा म **म** देह करावा दग्ध' अशी प्रार्थना करी, विनवी; ।
आज्ञा घेउनि, गेला निजलोकातें, तनू धरून नवी. ॥ ९४

दनु **ज** कबंध ज्वलनीं होमुनियां, ते दयानिधी जाती; ।
तों शबरी करि भावें, मतंगविप्राश्रमांत, पूजा ती. ॥ ९५

भावें **य** शोनिधीतें पूजुनि, हर्षे तपस्विनी शबरी; ।
सद्भक्तितुष्ट होउनि, अर्पी गति तीस [10]जानकीश बरी. ॥ ९६

सत्का **रा** च्या ग्रहणें, स्वदर्शनें, करुनियां विशुद्ध तिला; ।
आज्ञा घेऊनि पुसे, रघुनायक [11]ऋष्यमूकपद्धतिला. ॥ ९७

'[12]अभि **म** तदानधुरीणा! मजवरि केली अपार [13]अनुकंपा; ।
[14]शंपाजितचापलता! जाउनि आधीं विलोकिजे पंपा. ॥ ९८

नि[15]ज **ज** नकल्पतरो! तूं, तेथुनियां, [16]सर्वलोकनगरा जा; ।
मग पाहें सुग्रीवप्लवगाश्रय ऋष्यमूक[17]नगराजा. ॥ ९९

नित्य **य** शश्चंद्र तुझा दूर करू साधुविप्रतापातें; ।
वृद्धि असो [18]करिशुंडाजितदोर्दंडद्वयप्रतापातें. ॥ १००

---

१. कमलनेत्र. (राम.) २. वृक्ष, हरिण, पर्वत, भ्रमर, पक्षी, सर्प, यांच्या समूहा. ३. मोहित. ४. शूर्पणखेच्या. ५. राक्षसविशेष. ६. वाळूचा बांध. ७. शिवकंठवत् काळ्या खड्गद्वयें. ८. केळीचे कवंडे. ९. स्थूलशिरा ब्राह्मणानें दिलेला. १०. राम. ११. ऋष्यमूक मार्गाला. १२. इच्छित दानाविषयीं अग्रगण्या. १३. दया. १४. विद्युल्लतेस अजिंक्य धनुर्लता ज्याची अशा हे रामा. १५. भक्तकल्पद्रुम. १६. सर्वलोकनामक नगरास. १७. पर्वतराज. १८. हत्तीचे सोंडेस अजिंक्य जें भुजद्वय त्याचा जो प्रताप त्यास.

यानि**ज** पददासीचें स्मरण असों दे’ म्हणोनियां, न तिला ।
शबरी करी, तदा प्रभु निघता झाला, स्वयें पुसोन तिला. ॥ १०१
निर्द**य** कामशिलीमुखविद्धहृदय[1] राम पावला कंपा; ।
तैसाचि विविधशुकपिकबकशिखिकोकादिसंकुला पंपा. ॥ १०२
रघु**रा** ज तेथ जाउनि, पंपातीरीं करी निवेशातें, ।
तों [2]स्मरमार्गणगणही [3]रामहृदब्जीं करी प्रवेशातें. ॥ १०३
तेथें **म** यूर, सारस, हंस, कपिक्रौंचकीरकोकांतें; ।
सस्त्रीकांतें पाहुनि, मानी प्रभु धन्य पक्षिलोकांतें. ॥ १०४

---

## किष्किंधाकांड.

पंपेची **श्री** पाहुनि, राम म्हणे लक्ष्मणास, ‘कां मातें ।
सीता टाकुनि गेली स्नेहासह काननीं सकामातें ? ॥ १
वा[4]पुष्क**रा** परीसहि, सीतेचें नेत्रयुग्म बहु रुचिर, ।
दैवें तिजशीं मजशीं योग न राहूं दिला सख्या! सुचिर. ॥ २
मातें क**म** लमृणालें विलोकितां स्मरति युवतिच्या सुभुजा; ।
[5]प्रणयक्रोधें मजला बद्ध करायासि सर्वथा वि[6]भु ज्या. ॥ ३
[7]अलिपुं**ज** देखतां, मज सीतेचे केश लक्ष्मणा! स्मरती; ।
[8]तत्कबरीसम हे शिखिपिच्छकलाप स्वमानसीं भरती. ॥ ४
मद्वृंद**य** हंसपक्षी पीडिति गति भाषणेंकरून वनीं; ।
नवनीतकोमलांगी सीता दिसते मला मनोभवनीं. ॥ ५
वत्सा! [9]धे**रा** रुहातें वेष्टुनि, वल्ली जशाचि आहेत, ।
सीतालिंगित होतों ऐसा, परि तो न पूरला हेत. ॥ ६
वत्सा! वि**म** ल जसें हें पंपाजल यापरीस हृदय तिचें; ।
यतिचें व्रत मज दिधलें तद्विरहें; [10]क्रौर्य सुसह न नि[11]यें तिचें. ॥ ७
[12]पुष्पव्र**ज** हा मातें [13]स्मरमार्गणवृंदसाचि जाचितसे; ।
हा वायु वि[14]रहेंशिखिला दीप्त करुनि, मत्तनूसि [15]पोचितसे. ॥

१. निर्दय जो काम त्याच्या बाणांनीं फोडिलें हृदय ज्याचें असा. २. कामबाणसमूहही. ३. रामाच्या हृदयकमलीं. ४. कमलाहून. ५. प्रीतिकोपें. ६. समर्थ. ७. भ्रमरसमूह. ८. त्या सीतेच्या वेणीसारखे. ९. वृक्षातें. १०. क्रूरपणा. ११. दैवाचें. १२. पुष्पसमूह. १३. मदनबाणसमूहासारखाचि. १४. वियोगाग्निला. १५. शिजवितसे.

पिकें[1] का य बोलते हे सीतेचे शब्द ऐकिल्यावरि? ते ।
मधुरोक्त्यभ्यासार्थ, प्रांजलि तीच्या पदांस कीं वरिते. ॥ ९

कीरद्वि[2] ज नासेला सीतानासोपमान[3] साजेना; ।
तें नाक[4] नाक माझ्या चित्तानें, हा विमूढ लाजेना.' ॥ १०

रघुना य क ऐसा बहु विलाप तेथें करी वियोगानें; ।
नानोपायें लक्ष्मण, समजावी पादभक्तियोगानें. ॥ ११

सुग्रीव रा घवातें पाहुनि, धरि वालिचारशंकेला[5]; ।
वायुसुतासि[6] म्हणे, 'त्वां जाउनियां शोध पाहिजे केला.' ॥ १२

तेव्हां तो मं रुदात्मज मुनिवेषातें धरूनि, सद्वृत्त; ।
विनयें मधुरोक्तीनें, जाऊनि पुसे तयासि तद्वृत्त. ॥ १३

'कोठें हो श्री मंत! प्रयाण[7] करितां? स्वनाम कळवावें; ।
स्वकुशळकथनसुधेनें मत्कर्णाच्या क्षुधेसि पळवावें. ॥ १४

खड्गश[8] रा सनपाणी, वीरमणी, मान्य सर्वलोकांहीं, ।
वल्की, जटी, मुनीही, दिसतां; नाहींच समजलों कांहीं. ॥ १५

तुम्हीं अ म रपती[9] कीं, भूभारोद्वहनदक्षभुजदंड? ।
आखंडलविष्णूसे[10], गमतां देतां प्रहर्ष उदंड[11]. ॥ १६

करुणा[12] ज लधर दोघे, श्यामतनू, चित्रचाप, तापहर; ।
देहद्वयधारी कीं, एक त्रिपुरघ्न सुप्रताप हर. ॥ १७

मी तन य मारुताचा[13]; नाम हनूमान् असें असे माझें; ।
सुग्रीवदूत आहें; वृत्त वदा, इष्ट कर्णकामा जें. ॥ १८

मी वान रा कृतीतें आच्छादुनि अन्य वेष आदरिला; ।
तुमच्या स्वदर्शनानें माझा हृत्ताप सर्व संहरिला. ॥ १९

वालीना म कपीश्वर; तदनुज सुग्रीव ऋष्यमूकदरी[14] ।
वसवितसे धाकानें; अग्रज जो तोच जाहला तदरी[15].' ॥ २०

वातात्म[16] ज वाक्याचें श्रवण करुनि, रामही वनामाजी ।
सांगे स्वकथा, इच्छित होता तो आंजनेयनामा[17] जी. ॥ २१

---

१. कोकिल. २. पोपटपक्ष्याच्या नाकास. ३. सीतेच्या नाकाची उपमा. ४. स्वर्ग. ५. वालिदूतशंकेला. ६. वायुपुत्र. (मारुति.) ७. गमन. ८. तलवार आणि धनुष्य धारण करणारे. ९. भूभारधारणसमर्थ आहेत भुजदंड ज्यांचे. १०. इंद्रविष्णुतुल्य. ११. पुष्कळ. १२. दयामेघ. १३. वायूचा. १४. ऋष्यमूकपर्वताची गुहा. १५. त्याचा शत्रु. १६. मारुतीवाक्याचे. १७. अंजनीपुत्र. (मारुति.)

पादद्व **य** **रामाचें** वंदुनि माथां भवांबुनिधिपोत[1]; ।
सुग्रीवासि तराया, घेउनियां जाय **आंजनापोत[2]**. ॥ २२

वंदी प्रां[3] **ज** लि **राघवपदपद्मातें** **सुकंठ[4] बहुमानें**; ।
सानुज **रघुपति हृदयीं** आलिंगी **त्यासि बाहुयुग्मानें**. ॥ २३

पूजुनि **य** थोक्त केलें; **शिखिसाक्षिक[5]** सख्य **दीनबंधूशीं**; ।
शरणागतजनरक्षणदक्षासीं **सत्कृपैकसिंधूशीं[6]**. ॥ २४

मग वीं[7] **रा** भूषणमणि **राम** कथी **स्वात्मवृत्त सुगळाका[8]**; ।
दुःखकथा ते त्यातें मोही, **जैशी महाभुजगकाका[9]**. ॥ २५

त्यावर **म** हामती तो, पूर्वकथा कथुनि **रामरायातें**; ।
कौशेयबद्ध[10] गगनच्युत भूषणपुंज दाखवी त्यातें. ॥ २६

त्या काळीं **श्री** **राघव** अवलोकुनि भूषणासि **नयनांहीं**, ।
हृदयीं धरुनि, म्हणे, 'हा **विधे[11]! तुला लेशमात्र नये[12] नाहीं.**' ॥ २७

तीं संस्का **रा** वांचुनि मळलीं होतीं म्हणूनियां काय, ।
प्रक्षाली नेत्रजलें, **दाराभरणें[13]** समस्त **रघुराय**! ॥ २८

ऐशा स **म** **यीं लक्ष्मण रघुनाथाला नमून समजावी**; ।
आपत्काळीं धीरें हृदयीं **धृति[14]** सर्वथा **धरित जावी**. ॥ २९

**रघुरा** **ज** वैरकारण **सुग्रीवातें** पुसे; तदा तोही ।
**रामासि** म्हणे, 'वदतों पूर्वकथा; ऐक **धर्मसेतो! ही**. ॥ ३०

पूर्वी ज **य** शालीशीं **वालीशीं** युद्धकाम **मायावी[15]** ।
**दुंदुभिसोदर[16]** दानव आला नामें **करुन मायावी**. ॥ ३१

**वालिप** **रा** क्रमभीतप्राणत्राणार्थ तो वरी विवर; ।
बिलवदनीं मज ठेवुनि, शिरला **मत्पूर्वज[17] प्रवीरवर**. ॥ ३२

बिळधा **म** द्वारीं त्या होतों मी **वालिमार्ग** पाहात; ।
तों बहु दिवसां आला आंतुनियां **रक्तपूर** वाहात. ॥ ३३

तेव्हां म **ज** गमलें कीं, गेला **वाली** कपींद्र परलोका; ।
शोकाकुल मी झालों; **मायावीचाहि** लागला धोका. ॥ ३४

---

१. संसारसिंधुनौका. २. अंजनीचा पुत्र. ३. हस्त जोडून. ४. सुग्रीव. ५. अग्निसाक्षिक. ६. उत्तमकृपेचा एक समुद्र त्यासि. ७. वीरश्रेष्ठ. ८. सुग्रीवाला. ९. मोठ्या सर्पाची काळ. १०. रेशमीवस्त्रबद्ध. ११. हे दैवा. १२. नीति. १३. स्त्री सीता इचे अलंकार. १४. धैर्य. १५. कपटी. १६. दुंदुभिराक्षसाचा बंधु. १७. वाली.

चित्तीं भ **य** बहु होतें **मा**यावीचें, म्हणोनि बिलवदनीं ।
ठेवुनि महाशिलेला, तेथुनि आलों सशोक निजसदनीं. ॥ ३५

[1]कपिरा **ज** पारलौकिक केल्यावर, त्या प्रधानलोकांहीं ।
राज्याभिषेक केला, परि मी चित्तीं न तोषलों कांहीं. ॥ ३६

**वा**लीही **य** त्नानें मारुनियां दानवासि तो परते; ।
पाहे शिळा बिलाच्या वदनीं; फोडी भुजाबळें पर ते. ॥ ३७

तो नग **रा** ला येउनि, पाहे भद्रासनीं मला **वा**ली; ।
अत्यंत क्रोधासह धांवे मारावयासि त्या कालीं. ॥ ३८

मीं निज **म** स्तक त्याच्या राज्यासह अर्पिलें जरी चरणीं, ।
केला निश्चय त्यानें परंतु अत्यंत माझिया मरणीं. ॥ ३९

**किष्किंधाश्री रा**मा ! मजला झाली जशीच [2]**सं**यमनी; ।
[3]यमनिभ बंधुहि झाला; प्रवृद्ध भय तत्क्षणींच होय मनीं. ॥ ४०

[4]त्राण क **रा** या तनुचें, गेलों जेथें पळोनि मी **रा**मा ! ।
तेथें तेथें आला हा **वा**ली कोपयुक्त संग्रामा. ॥ ४१

त्यावर **म** तंगमुनिच्या वरप्रसादें, त्यजोनि धाकासी, ।
या गिरिगुहेंत वसतां, येउनि केलीस तूं बुधा ! **का**शी. ॥ ४२

येथें [5]कं **ज** दला क्षा ! **वा**लीपासूनि भीति मज नाहीं; ।
त्याचें कारण कथितों, तें ऐकावें तुम्हींच सुजनांहीं. ॥ ४३

[6]बहु मा **य** महिषरूपी, दुंदुभिनामा, महोग्र, जयशाली ।
दानव युद्धासाठीं येतां, त्यातें वधी बली **वा**ली. ॥ ४४

त्या असु **रा** ला मारुनि, **वा**ली गर्वें तदीयदेहातें, ।
[7]लघुतूलपुंजसंनिभ, उडवी कवळोनि आपुल्या हातें. ॥ ४५

तें शव, [8]**म** ही ध्रसंनिभ, **म**तंगविप्राश्रमासमीप पडे; ।
तद्रक्ताचे झाले त्या [9]मुनिराजोटजांगणांत सडे. ॥ ४६

तें तो द्वि **ज** अवलोकुनि, कोपें तापोनि यापरी शापी; ।
'ज्याचें कर्म असें, तो येतां या पर्वतीं मरो पापी.' ॥ ४७

---

१. वालीचें उत्तरकार्य. २. यमनगरी. ३. यमतुल्य. ४. रक्षण. ५. हे कमलनेत्रा. (रामा.) ६. पुष्कळ मायावी. ७. लहान कापसाच्या गोळ्यासारखा. ८. पर्वततुल्य. ९. मतंगऋषीच्या पर्णशालांगणांत.

हा निश्च **य** जाणुनियां, येथें येऊनि रक्षिले प्राण; ।
शरणागतजनरक्षणकुशला[1] ! आतां करीं परित्राण.' ॥ ४८

हें सह **ज** कृपासागर ऐकूनि म्हणे तयासि रघुवीर; ।
'किष्किंधा तुज देतों, मारुनि पापी कपी; धरीं धीर. ॥ ४९

हा प्रत्य **य** सुगलाला[2] यावा, याकारणें महाधीर ।
पादांगुष्ठें उडवी दुंदुभिदेहासि तत्क्षणीं दूर. ॥ ५०

परि हा **रा** नट[3] वानर न धरी विश्वास, म्हणुनि एकशरें ।
छेदूनि सप्तताली[4], पर्वतही फोडिला रघुप्रवरें. ॥ ५१

हस्तासि **म** स्तकासह रामपदीं अस्तभीति[5] तो लावी; ।
किष्किंधेला जाउनि, मग वालीला रणास बोलावी. ॥ ५२

तों वीर **श्री** कांत[6], प्रचंडभुजदंड, धांवला वाळी; ।
दोघांचें कोपानें झालें भुजयुद्ध तीव्र त्याकाळीं. ॥ ५३

रघुवी **रा** नें त्यांचा भेद दिसेना, म्हणोनियां बाण ।
नाहींच करीं धरिला, रक्षाया मित्रबंधुचे[7] प्राण. ॥ ५४

'गुल्मद्रु **म** वल्लीगणअंतर्हित[8] तो रघूद्वह त्राण ।
करिल' म्हणुनि सुग्रीवहि रण करि, जों होत कंठग प्राण. ॥ ५५

रघुरा **ज** मुक्त मार्गण[9] मार्ग न दावी रिपूसि नाकाचा[10]; ।
यास्तव जीवितरक्षणपर तो परतोनि जाय कपि कोंचा[11]. ॥ ५६

अपज **य** लज्जित कपि तो, पळोनियां, जाय ऋष्यमूकातें; ।
भरताग्रज समजावी सुग्रीवातें, अतीव[12] मूकातें[13]. ॥ ५७

'तूं वान **रा** धिनाथा ! पुनरपि करणें अशाचि कलहातें; ।
मी शर सोडुनि, त्याच्या हृदयाचें निर्मितों शकल हातें. ॥ ५८

मी, प्रथ **म** युद्धकालीं भेद दिसेना, म्हणूनियां बाण ।
नाहीं हस्तीं धरिला, रक्षायाकारणें तुझे प्राण.' ॥ ५९

ऐसें तो **ज** गदीश्वर सांगुनि, त्याच्या गळ्यांत वल्लीला ।
बांधी; व्रणनिवारणनिपुणौषधिचीच[14] ते धरी लीला. ॥ ६०

---

१. शरण आलेल्या जनाच्या रक्षणाविषयीं कुशला. (हे रामा.) २. सुग्रीवाला. ३. रानांत रहाणारा. ४. सात तालवृक्ष. ५. निर्भय. ६. वीरश्रीचा पति. ७. सुग्रीवाचे. ८. कांड नसोन मुळांत खांद्या फुटल्या ज्याला असे वृक्ष आणि वल्ली यांच्या आड राहिलेला. ९. बाण. १०. स्वर्गाचा. ११. भितरा. १२. अत्यंत. १३. मौन धारण करणाऱ्यातें. १[illegible]ण निवारण्याविषयीं प्रवीण जी औषधि तिचीच.

भेदक[1] **य** शोनिधानें **रामें** ऐसें करोनि कपिकंठीं, ।
पाठवितां तो गेला, जे **किष्किंधापुरी**, तेंदुपकंठीं[2]. ॥ ६१
तो क्रोधें[3] **ज** नक वाक्यें बोलोनि, रिपूसि शीघ्र पाचारी; ।
स्वाधिक्षेपश्रवणें[4] ये युद्धाला अपत्रपाचारी[5]; ॥ ६२
त्या कालीं **य** शानें **तारा** वारी, धरोनि चरणातें, ।
**वालीस**; म्हणे, 'जावें, **सुग्रीवाशीं** स्वयें नच रणातें. ॥ ६३
दिव्यप **रा** क्रम राघव, **खरदूषणताटकाविराधारी**[6], ।
**सुग्रीवमित्र** झाला, समानसुखदुःख चापशरधारी. ॥ ६४
त्वद्विक **म** निर्जित तो पुनरपि आला करावया आजी[7]; ।
याचें भय मज भासे, समरा जाऊं नका स्वयें आजी.' ॥ ६५
'दोर्वीर्य[8] **श्री** गर्वें **वाली** हांसोनियां, म्हणे तन्वि[9] ! ।
मातें रणांत जिंकी, ऐसा भूमंडलीं नसे धन्वी[10]. ॥ ६६
धर्मज्ञ **रा** ज नंदन, सज्जन, सद्विद्य, तो कुलीन, सती[11] ! ।
वैरहि त्याशीं नाहीं, शंका चित्तीं धरूं नको, नसती.' ॥ ६७
या परि **म** हिषी तेव्हां समजावुनि, जाउनी, महाबल हा ।
खळ हानिला न चिंती, **सुग्रीवाशीं** स्वयें करी कलहा. ॥ ६८
दोघे भु **ज** युद्धातें प्रवर्ततां, परमतीव्र तत्काल ।
गुल्मांतरित **रघूद्वह** सोडी दूरूनि बाण तत्काल[12]. ॥ ६९
केवळ **य** मदंडासम लागे जाऊनि बाण तो यातें; ।
हृदयीं करी क्षतातें, सेवाया **वा**लिप्राणतोयातें[13]. ॥ ७०
क्रूरश **रा** हतवक्षा **वाली** सोडूनि शीघ्र भावातें; ।
पडला धरणीवरता वरें[14] **तारे**चा, तरू जसा वातें[15]. ॥ ७१
**ता**रार[16] **म** णमुखी ते तारारावें[17] रडोनियां, त्यातें; ।
**तारा** म्हणे, 'कपींद्रा ! तारावें दुःखसागरीं मातें. ॥ ७२
हा नाथा! **ज** न्मदशा झाली कां अप्रदक्षिणा[18] माझी ? ।
तुजला काळभुजंगें गिळिलें वीरा ! कसें क्षणामाजी[19] ? ॥ ७३

---

१. भेद दाखविणारे. २. तिच्याजवळ. ३. राग उत्पन्न करणारी. ४. धिक्कारादिवाक्यश्रवणे. ५. निर्लज्जाचारी. ६. खर, दूषण, ताटका, विराध याचा शत्रु.(राम.) ७. युद्ध. ८. भुजवीर्याच्या गर्वें. ९. हे सुकुमारी. १०. धनुर्धारी. ११. हे तारे. १२. त्याचा म्ह० वालीचा नाशक. १३. वालिप्राणोदकाते. १४. पति. १५. वायूने. १६. चद्रमुखी. १७. उच्चस्वरे. १८. प्रतिकूला. १९. क्षणांत.

**रामा! का य** कपींद्रें केला तूझा वधार्ह अपराध ? । –
नव्हे हा **खर दूषण**, नव्हे **त्रिशिरा कबंध**, न **विराध**. ॥ ७४
कां सह **ज** दया त्यजिली ? सागर झाला क्षणांत [1]मरुधन्व; ।
माझ्या ठायीं झालें कां हें **यमदंड**तुल्य तव [2]धन्व ? ॥ ७५
जोडावें **य** श मजही पतिशीं योजूनि [3]**ता**टकारातें !' ।
ऐसा करी विलाप, प्रियास हृदयीं धरूनि, **तारा** ते. ॥ ७६
तेंव्हां **ता रा** [4]लोचनजलसेकें [5]लब्धसंज्ञ तो **वा**ळी, ।
कांतेला समजावुनि, निजहस्तें **अंग**दासि कुरवाळी. ॥ ७७
कांचन **म** य माला दे [6]दुःखावनतानुजास; [7]तोकास ।
**राम**करीं; कालकरीं जीवित; शोकास आप्तलोकास. ॥ ७८
त्याकाळीं **श्री** रघुवर करवी त्याची क्रिया यथायुक्त; ।
मग **किष्किधा**श्रीशीं केला **सुग्रीव** तोहि संयुक्त. ॥ ७९
तो युव **रा** जा केला **अंगद रा**में; तदा [8]प्लवंगांनीं ।
मानस आनंदविलें **सीता**पतिचें तदीयगुणगानीं. ॥ ८०
[9]पुर्याग **म** नार्थ कपी प्रार्थी **प्र**भुला [10]तदंघ्रिजलजाली; ।
ते प्रार्थना तयाची, **भ**रताची प्रार्थना, तशी झाली. ॥ ८१
'सरतां [11]**जं** लधरकाल, त्वदीयपादांबुजद्वयाधीन; ।
धाडुनि कपिसेनेला, **सीता**देवीस शीघ्र शोधीन.' ॥ ८२
हा निश्च **य** केल्यावर, कपिला **प्र**भु तो म्हणे, 'स्वनगरा जा;' ।
घनकाळीं गृह केला **रा**में **प्र**स्रवणनाम [12]नगराजा. ॥ ८३
कामश **रा** कुल **रा**घव [13]कंदरसदनीं वसे [14]सखेदमना; ।
दमनास म्हणे, 'करिशी, कां बाणगणें [15]**स्म**रा ! सखे! [16]दमना. ॥ ८४
वत्सा ! श्र **म** ला आत्मा, हा वर्षाकाल [17]कालसा झाला; ।
गगनच्युत जलधारा या धरिती [18]कालकूटसाजाला. ॥ ८५
[19]सप्राणा **ज** नकसुता असेल ? मी काय तीस पाहीन ? ।
स्त्री हारवूनि रडतों, ऐसा कोणी नसे [20]त्रपाहीन. ॥ ८६

---

१. निर्जलदेश. २. धनु. ३. हे ताटकाशत्रो. ४. तारानेत्रजलसिंचनें. ५. सावध. ६. दुःखानें नम्र झाला जो सुग्रीव त्याला. ७. अपत्यास. (अंगदास.) ८. वानरांनीं. ९. नगरास येण्यास. १०. त्या रामचरणकमलसंबंधीं भ्रमर. ११. पर्जन्यकाल. १२. पर्वतश्रेष्ठ. १३. गुहागृहीं. १४. खिन्नचित्त. १५. हे मदना. १६. दमविण्याला, पीडेला. १७. मृत्युसा. १८. विषाच्या सांचाला. १९. जीवंत. २०. निर्लज्ज.

नैर रा य देत असतां, अभाग्य हा मी न पावलों कमला; ।
कांतेला हारविलों; हांसत असतील सर्व लोक मला.' ॥ ८७
ऐसा वि ज नीं राघव, वर्षाकालीं, करी विलाप वनीं; ।
ज्याला स्पर्श करुनियां, नवा नवा खेद दाविला पैवनीं. ॥ ८८
वैर्षव्या य त वासर, वर्षाकालीं, जसे तसे सरले; ।
गगनापासुनि सैचपल हळू हळू, सर्व मेघ ओसरले. ॥ ८९
पैंभा क रा स शारद कालहि आला, परंतु न हॅरीन; ।
यास्तव अनुजास म्हणे प्रभु, 'आतां प्लैवगजीवन हरीन. ॥ ९०
कपि का म लुब्ध झाला; निजप्रतिज्ञातवाक्यनिर्वाहीं ।
यत्न करीना, केवळ कृंतघ्न हा दुष्ट निंद्य सर्वाहीं. ॥ ९१
किष्किंधा श्री लाभें झाला मदमत्त; नाठवी मातें; ।
सौमित्रे ! जाउनियां, धाडावें त्यास कालधामातें.' ॥ ९२
हें वाक्य रा घवाचें ऐकुनियां, दिव्यचापशरधारी ।
लक्ष्मण किष्किंधेला गेला सक्रोध तो विरोधारी. ॥ ९३
लक्ष्मण म त जाणुनियां, प्लक्षप्रभनामक प्रधान कृती ।
सुग्रीवातें करि तो बोध, तदा होय निर्मलप्रकृती. ॥ ९४
लक्ष्मण ज सा स्वैकार्मुकगुणघोषातें करी पुरीपाशीं; ।
तों तारेसि म्हणे कपि, 'सांपडलों सुभ्रु ! आज यमपाशीं.' ९५
कपि ना य कवाक्यातें ऐकुनियां शीघ्र जाय ते तारा; ।
सौमित्रीतें विनवुनि, म्हणे, 'प्रभो ! किंकरासि या तारा. ॥ ९६
रामें श रा सि सोडुनि, वालिव्यसनासि नाशिलें धीरा ! ।
चापगुणध्वानें तूं कामव्यसनासि खंडिलें वीरा ! ॥ ९७
येतां श्र म लासि पथीं, पूजेसह हा कपीश घे देवा; ।
सुग्रीवातें द्यावी, अभयासहवर्तमान, पदसेवा.' ॥ ९८
सांत्वन ज लेंचि तारा, सौमित्रिक्रोधवन्हिला शमवी; ।
सुग्रीवशिरःषट्पद लक्ष्मणपदपंकजांतरीं रमवी. ॥ ९९

---

१. दशरथ. २. राज्यश्री. ३. वायूंनीं. ४. वर्षासारखे मोठे. ५. दिवस. ६. विद्युल्लतेसह. ७. सरोवरमित्र. ८. सुग्रीव. ९. वानराचे प्राण. १०. उपकार विसरणारा. ११. यमलोकातें. १२. विराधराक्षसाचा शत्रु. १३. कुशल. १४. आपल्या धनुष्याच्या दोरीच्या शब्दातें. १५. सुंदर भ्रुकुटी जीची अशी. १६. सुग्रीवाच्या स्त्रीचें नांव. १७. वालीरूप दुःखास. १८. धनुःशब्दें. १९. लक्ष्मणक्रोधाग्नीला. २०. सुग्रीवमस्तकभ्रमर. २१. लक्ष्मणचरणकमलीं.

[1]सविन **य** [2]बद्धांजलि तो सुग्रीव [3]रघूत्तमांघ्रियुगलीला ।
वंदी, तो धरि तीतें, [4]राघवपदसालिपद्मयुगलीला. ॥ १००

तो बद्धां **ज** लि विनवी, म्हणे, 'विभो! आज [5]वाततनयानें ।
[6]अखिलकुलाचलनिलय प्लवंगबल आणिलें सुविनयानें. ॥ १०१

तूं विज **य** पावशील स्वबळें मारोनि रावणास रणीं; ।
सामात्यपुत्रबांधव, तो दुष्ट धरील [7]यमपुरीसरणी. ॥ १०२

शोधाया **रा** जसुता, कपिसेना प्रेषितों दिगंतातें; ।
याला आज्ञा द्यावी, [8]स्वस्थस्वांतें करूनियां, [9]तातें.' ॥ १०३

आज्ञा न **म** नपरातें देतां सुग्रीव 'जा' म्हणे 'तूर्ण; ।
[10]मासातिक्रम होतां, दंडीन, शिरें करीन शतचूर्ण.' ॥ १०४

नमुनि **श्री** रामातें, लक्ष्मण सुग्रीव वंदुनी, [11]विनत ।
पूर्वदिशेला गेला, कपिसेना घेउनी, स्वयें [12]विनत. ॥ १०५

गेला **नी** [13]**रे** धीश्वरदिक्प्रांताला सुषेण वेगानें; ।
उत्तर दिशेसि शतबलि गेला, [14]रविसूनुच्या [15]नियोगानें. ॥ १०६

[16]सांगद **म** [17]रुदात्मजही, कुमुदकनलनीलजांबवत्सहित ।
दक्षिणदिशेसि गेला, करावया सर्वसाधुलोकहित. ॥ १०७

[18]धनद **ज** लेशसुराधिप यांच्या सर्वत्र शोधुनी [19]आशा, ।
[20]मासातिपात न करुनि, आले कपि, ते न पूरिती [21]आशा. ॥ १०८

गेले जे, [22]**य** मकाष्ठा शोधाया, [23]वातजादि कपि वीर, ।
सीतो[24]पलब्धि नाहीं, यास्तव धरिती न मानसीं धीर. ॥ १०९

वानर **रा** जा, अवधि क्रमितां, दंडील सर्वथैव करें; ।
यास्तव सचिंत शोधिति विपिनें, गिरिगव्हरें, [25]सुभीतिकरें. ॥ ११०

फिरतां **म** हा वनांतीं, राक्षस पाहोनि, अंगदें स्वकरें ।
त्या दशमुखभ्रमानें, वधिला, कोपोनियां मनीं निकरें. ॥ १११

---

१. नम्र. २. हात जोडलेला. ३. रामपदद्वया. ४. रामचरण जे तेंच भ्रमरयुक्त कमलद्वय त्याच्या लीलेला. ५. मारुतीनें. ६. सर्वपर्वतवासी वानरसैन्य. ७. यमनगरमार्गे. ८. स्वस्थ चित्तें-करून. ९. शीघ्र. १०. महिन्याचें उल्लंघन. ११. नम्र. १२. विनतनामक वानर. १३. पश्चिमेस. १४. सुग्रीवाच्या. १५. आज्ञेनें. १६. अंगदासह. १७. मारुतिहि. १८. कुबेर, वरुण, इंद्र, यांच्या. १९. दिशा. २०. महिन्याचें उल्लंघन. २१. इच्छा. २२. दक्षिणदिशा. २३. मारुति आदिकरून. २४. सीतेचा शोध. २५. अतिभयंकरें.

जातां ते **ज** ल कामी कुहरीं[1] शिरले, तदा स्वयें अर्ची[2] ।
त्यांतें **सा**वर्णिसुता[3], **स्वयंप्रभाख्या**, तपोग्निची अर्ची[4]. ॥ ११२
आज्ञा हो **य** तिची, मग जाती कपि **विंध्यपर्वतापाशीं**; ।
**सीतो**पलब्धि नाहीं, यास्तव धरिती अखर्वतापासीं[5]. ॥ ११३
'हा मास **ज** री गेला, तरि तो दंडील **विभु**; कसें करणें ? ।
धरणें' म्हणती 'अनशनसद्व्रत, येथेंचि सर्वथा मरणें. ॥ ११४
भाग्योद **य** गृध्राचा **जटायु**चा थोर, जो स्वयेंच, रणीं ।
विक्रम करूनि झाला परलोकीं पूज्य निर्मलाचरणी[6]. ॥ ११५
आम्हास **रा** घवाची सेवा कांहींच पुण्यदा न घडे;' ।
हें वदतां, **विंध्यगुहागतसंपातिश्रुतींत**[7] शब्द पडे. ॥ ११६
विकल[8] **म** ना **सं**पाति स्वानुजमरणास ऐकता झाला; ।
'कालव्यालें केवळ, न कळत, गिळिलें' म्हणे '**मम भुजाला.**' ११७
मग तो **श्री** रघुपतिच्या दूतांसि म्हणे, 'निजाभिधान[9] कथा; ।
वदतां मृतिवृत्तयुता[10], **जटायु**ची शोकसंनिधानकथा.' ॥ ११८
गृध्रव **रा** तें[11] कथिती पूर्वकथा प्लवग[12] ते; तदा हा, तें ।
ऐकोनि, पावला बहु शोकाग्निकरूनि चित्तदाहातें. ॥ ११९
'हा वत्सा ! **म** रण तुला आलें; केलेंसि तुष्ट परलोका; ।
व्याकुल बहु मी झालों; टाकुनि गेलासि कां मला तोकौं[13] ?' १२०
गृध्रद्वि **ज** अनुजातें करूनियांपांजलिप्रदान[14], मनीं ।
शोकाकुल होउनि, तो स्वदशा तेव्हां सुखप्रदा न मनी[15]. ॥ १२१
मग 'आ **य** का' म्हणे 'हो पूर्वकथा; एकदा स्वबलगर्वें ।
**सूर्य**रथाप्रति गेलों, तों केला दाह फार **खगदेवें**[16]. ॥ १२२
**सूर्य**क **रा** च्या स्पर्शें गगनपथीं देहदाह बहु झाला; ।
तेव्हां, निजपक्षाधःस्थापुनि[17], संरक्षिलेंचि अनुजाला. ॥ १२३
अग्निस[18] **म** ब्रध्नकरें झाले अत्यंत विकल मत्प्राण; ।
जळले मत्पक्ष, परी केलें मीं बंधुचें परित्राण. ॥ १२४

१. गुहेंत. २. पूजी. ३. सावर्णिमनूची कन्या. ४. ज्वाला. ५. महातापास. ६. निर्मल आहे आचरण ज्याचें असा. ७. विंध्यगुहेंत स्थित जो जटायुबंधु संपाति त्याच्या कर्णीं. ८. खिन्नांतःकरण. ९. स्वनाम. १०. मरणवर्तमानयुक्त. ११. संपातीतें. १२. वानर. १३. मुला. १४. अपांजलि म्ह० उदकांजलि तिचें दान. (एथें 'अ' चा लोप व्याकरणशुद्ध नव्हे.) १५. मानी. १६. सूर्यें. १७. स्वपक्षाखालीं. १८. अग्नितुल्य सूर्यकिरणें.

सानुज **ज** सा तसा मग खालीं उतरूनि फार तळमळलों; ।
धूळींत लोळतां मी, बहु आलिंगूनि भूमितळ, मळलों. ॥ १२५
तों, सद **य** स्वांतें त्या, [1]**नि**शाकरें मुनिवरें, क्षणामाजी; ।
[2]करुणानिशाकरानें निवारिली दाहवेदना माझी. ॥ १२६
त्यानें म **ज** ला पूर्वी भविष्य सारें निवेदिलें होतें ।
तें पाहिलें; स्ववृत्तहि आतां सांगोनियां दिलें हो ! तें. ॥ १२७
[3]मैत्तन **य** [4]**सु**पार्श्वाभिध भक्षाचा शोध काननीं करितां ।
पाहे महेंद्रगिरिच्या निकट [5]**द**शास्यें बळें वधू हरितां. ॥ १२८
स्व कुमा **रा** नें मातें हें कथिलें; तेच [6]**दा**शरथिजाया ।
आहे **अ**शोकवनिकास्थानीं; करितां विलंब कां जाया ?'॥ १२९
हें [7]गृध्र **म** णी सांगुनि गेला, होऊनि [8]पक्षबलपूर्ण, ।
जाती **म**हेंद्रगिरिला सिंधुतटीं ते प्लवंगही [9]तूर्ण. ॥ १३०
कपि ते **श्री सी**तेचा यापरि ऐकोनियां समाचार, ।
झाले मुदित मनीं, परि त्यांसि गमे सिंधु [10]रिपुसमाचार. ॥ १३१
'या साग **रा** सि कैसें तरणें? याच्या पलीकडे **लं**का; ।
यातें विलंघिल्यावरि, दिसेल **सी**ता सती [11]गतकलंका. ॥ १३२
कैसें सा **म** र्थ्य असे कोणातें ? कोण लंघितो यातें; ।
[12]मार्गप्रत्यूहातें, [13]नदीपतीतें, [14]अगाधतोयातें.' ॥ १३३
[15]**स**रसि **ज** भवजृंभोद्भव, ऋक्षपती **जां**बवान् वदे त्यांस; ।
'**मा**रुति नौका असतां, चिंतासिंधूंत जीवदेल्यांस; ॥ १३४
हा तन **य** [16]**मा**रुताचा, याच्या ऐका अपारवीर्याला; ।
भक्षित होता [17]परिणतफलमतिनें उपजतांचि **सू**र्याला. ॥ १३५
[18]हेमध **रा** लाही हा सलील झेलील [19]तूलकंदुकसा; ।
याचेपुढें धरीना [20]गोष्पदसमतेसि आज सिंधु कसा ? ॥ १३६
व्यर्थचि **म** नांत धरितां चिंता, पावोनि सेतुला याला; ।
[21]ओजस्तेजें यासम कोणी प्राणी नसे [22]तुलायाला. ॥ १३७

---

१. चंद्रें. ('मुनिवरें' या शब्दाचें विशेषण.) २. दयाचंद्रें. ३. माझा पुत्र. ४. सुपार्श्वनामक ५. रावणें. ६. सीता. ७. गृध्रश्रेष्ठ. ८. पक्षबलानें पूर्ण. ९. शीघ्र. १०. शत्रूसारखा. ११. निर्दोषा. १२. मार्गविघ्नभूतातें. १३. समुद्रातें. १४. अगाध आहे उदक ज्याचें. १५. ब्रह्मदेवाच्या जांभईपासून उत्पन्न झालेला. १६. वायूचा. १७. पक्वफलबुद्धीनें. १८. मेरुपर्वतालाही. १९. कापसाचे चेंडूसारखा. २०. गाईच्या पावलाची तुल्यता तीस. २१. बलादिकें. २२. उपमा देण्यास.

याचे भु **ज** दंड महाप्रचंड **य**मदंड दंडदक्ष महा; ।
हा वज्रदेह केवळ सुरशत्रुपराजयप्रद[1] क्षेम[2] हा. ॥ १३८
हा विज **य** वीर्यशाली, दुर्धर, दुर्धर्ष, सर्ववीरमणी; ।
लंघुनि नदीपतीतें, शोधील नृपालसूनुची रमणी.' ॥ १३९
ऐसें **कं**[3] **ज** भवात्मज वदतां तो **मा**रुती महाकाय ।
वाढे **म**हेंद्रशिखरीं, **वा**मन **ब**लिराज्यकाम हा काय? ॥ १४०
कपिना **य** कप्रमोदासह **मा**रुति वाटला स्वजयकामें; ।
तद्गौरवें **म**हेंद्रासह लवले ते प्लवंग एकामें. ॥ १४१
तो मक **रा** लयलंघन, लीलारंभीं म्हणे प्लवंगातें; ।
'अचलापरि अचल असा, करुनि **म**हेंद्राद्रिशृंगसंगातें; ॥ १४२
मी जातों, **म** करालय लंघुनि, देखावयास त्या सतिला; ।
जैसा **म**यूरपक्षी सामोरा जाय मेघसंहतिला[4].' ॥ १४३

---

## सुंदरकांड.

मतिवीर्य[5] **श्री** भाजन **मा**रुति जेव्हां उडे, तदा शिखरी[6] ।
स्वशिरोभंगें भावी[7]**द**शमुखगति दाखवी तयाशि खरी. ॥ १
तों सलिल[8] **रा** शिवाक्यें प्रगटे **शि**वदारबंधु[9] तो, यातें ।
विश्राम द्यावयाला, पक्षें भेदूनि सिंधुतोयातें. ॥ २
वक्षःस्थळें **म** रुत्सुत पाडी मानूनि विघ्नशंकेला; ।
**मै**नाकासि गमे कीं, **इं**द्रें वज्रप्रहार हा केला. ॥ ३
'घेऊनि **आं ज** नेया! विश्राम, पुनः प्रयाण योजावें; ।
अब्धिप्रेषित[10]**हि**मवत्सुत आप्त असें मनांत समजावें.' ॥ ४
हें **आं**जने **य** ऐकुनि, सन्मानुनि, तोषवूनि **मै**नाका, ।
गेला तसाचि चापच्युतशरसा; तुष्टि होय तें नाका[11]. ॥ ५
परम त्व **रा** करुनियां, जाय महाकाय दीर्घलांगूल[12]; ।
दशयोजनतनु कपि तो स्वजवेंचि करी पित्यासि पांगूळ. ॥ ६

---

१. राक्षसास पराभव देणारा. २. समर्थ. ३. जांबवान्. ४. मेघसमूहाला. ५. बुद्धि, पराक्रम व संपत्तीचें पात्र. ६. पर्वत. ७. होणारी रावणगति. ८. समुद्रवाक्यें. ९. मैनाक. १०. समुद्रानें पाठविलेला हिमालयपुत्र. (मैनाक.) ११. स्वर्गाला. १२. दीर्घपुच्छ.

धृतपक्ष **म**[1]हीध्र तसा **गरुडा**निलवेगवान्, महाकाय, ।
जातो काल [2]दशानननगरग्रासैककाम हा काय. ॥ ७

तों नागांची **ज**ननी **सु**रसा, [3]सुरसाध्यसिद्धगणलपितें, ।
वीर्यपरीक्षेसाठीं, विघ्न करी सागरीं महाकपितें. ॥ ८

आनन [4]आ **य**त केलें; तत्संख्या वीस योजनें [5]अंशिती; ।
[6]असितीक्ष्णदंतदंष्ट्रा **सु**रसा व्यापी नभोंतरा अशि ती. ॥ ९

रोधूनि **अं ज**नीच्या तनयाचा सर्व मार्ग ते, [7]अतुला ।
'**वि**धिवरदान असे मज, भक्षीन' म्हणे 'बळेंचि आज तुला.' १०

**मा**रुति न **य**निपुण तिला स्वकथा सांगे; म्हणे, '[8]**ध**रादुहिता ।
**द**शवदनानें नेली, केली दुष्टें [9]मनःप्रियें रहिता. ॥ ११

**द**शरथ **रा**जसुतातें, केलें संतप्त बहु वियोगानें; ।
**शो**धावया सतीतें जातों तद्दूत [10]तन्नियोगानें. ॥ १२

करुनि न **म**स्कार तिला, जाउनि सांगेन **रा**घवाला हें; ।
मग येईन, तदा तूं मज भक्षुनि काम [11]आघवा [12]लाहें.' ॥ १३

यापरि तो **श्री मा**रुति बहु विनवी, परि नये दया [13]तीस; ।
म्हणुनि दशकक्रमें मग वपु गुरु करि, होय योजनें तीस.॥ १४

**मा**रुति तो **रा**गानें वाढे दशकेंचि योजनें [14]नवती; ।
[15]शतगावें **सु**रसा करि मुख, तैं दोवांसि देव मानवती. ॥ १५

अंगुष्ठस **म**तनूतें करुनि, शिरे **मा**रुती तिच्या वदनीं; ।
जाय निमेषार्धानें उडोनि गगनिं [16]ग्रहर्क्षगणसदनीं. ॥ १६

तेव्हां [17]**प्र**भं **ज**नात्मज देवांहीं वर्णिला [18]**म**हासुरसा; ।
आशीर्वादासह दे मार्गातें तोषवूनियां **सु**रसा. ॥ १७

तो [19]**वै**नते **य**सा कपि जातां, [20]छांयाग्रहें गृहीतगती ।
केलाचि [21]**सिं**हिकेनें, जीपासुनियां न वि[22]ग्रही तगती. ॥ १८

---

१. पर्वत. २. रावणनगरी गिळण्याची आहे इच्छा ज्याला. ३. देवादिकांचें भाषण. ४. विस्तीर्ण, दीर्घ. ५. ऐशीं. ६. तरवारीसारख्या तीक्ष्ण आहेत दांत व दाढा जीच्या. ७. निरुपमा. ८. पृथ्वीची कन्या. (सीता.) ९. रामें. १०. त्याच्या आज्ञेनें. ११. सर्व. १२. पावें. १३. तिला. १४. नव्वद. १५. शंभर योजनें. १६. ग्रहनक्षत्रस्थानीं. १७. मारुति. १८. महादेवसा. १९. गरुडसा. २०. सावली धरल्याच्या योगानें. २१. राहूराक्षसाची माता. २२. प्राणी, किंवा विरोधी.

वदनद्वा **रा** वाटे तीच्या देहांतरीं शिरोन, [1]खरें ।
नखरें[2] मर्मैं छेदुनि मारी; हें मृत्युचें [3]निदान खरें. ॥ १९

तेथुनियां **म** ग **मा**रुति उडोनि गेला समुद्रतीराशी; ।
ध्याया [4]शत्रुयशोब्धि, प्रभुप्रतापाग्निचीच ती राशी. ॥ २०

**दि**[5]ग्यक्रा **ज** धानीसमीप जातांचि, सूर्य तो यातें ।
शत्रुप्रतापगतिला सुचवी, [6]जाऊनि सिंधुतोयातें. ॥ २१

[7]दशमुख **य** शोब्धिवाडव **मा**रुति जातां पुरीं शिरायास, ।
**लं**काधिदेवता तों आली याशीं [8]कली करायास. ॥ २२

दैवें परा **ज** य दिला तीजकडे, कीं कपी न मारु तिला; ।
ते आज्ञा दे, [9]भाविस्वविनाशातें वदोन, **मा**रुतिला. ॥ २३

[10]शुभ्रांशूद **य** होतां, जाउनियां शत्रुच्या पुरीमाजी; ।
'**मां**[11] जी **रघु**वंशाची, कोठें ते स्वामिनी' म्हणे 'माझी?'॥ २४

तद्रूपरि **रां**[12] क्षसराजप्रासादीं तो शिरे, जसा नरकीं; ।
नरकिंनरकिंपुरुषाद्यमरार्थ प्राप्तकाल वानर कीं. ॥ २५

राक्षस र **म** णीयतनू [13]रमणीगणसुप्त देखिला, [14]परें ते ।
**सी**ता न पाहिली, मग [15]तोषाध्याक्रांतचित्त तो परते. ॥ २६

तो हृदयीं **श्री** म**द्र**घुनाथपदातें नमूनि, **लं**केला ।
पाहे; लघुदेहातें घेउनि, सर्वत्र शोध बहु केला. ॥ २७

तेथुनि, नि **रा** श. होउनि, **मा**रुति गेला **अ**शोकवनिकेला; ।
एथें असेल **सी**ता, ऐसा निश्चय [16]मनोभवनिं केला. ॥ २८

[17]कुरबक, **म** रुबक, वंजुल, तिलकामलक, प्रियाल, हिंताल, ।
माकंद, कुंद, तिंदुक, चंपक, चांपेय, केतकी, ताल, ॥ २९

वट, कुट **ज**, लकुच, पाटल, पनसाश्वत्थद्रु, सरल, पुंनाग, ।
बकुल, तमालोदुंबर, चंदनक, लवंग, बिल्वतरु, नाग. ॥ ३०

ऐसे संच **य** तरुंचे अवलोकुनि, [18]हेमशिंशिपा पाहे; ।
तीवर चढोनि देखे, तों [19]रक्षःस्त्रीगणीं [20]अपापा हे[21]. ॥ ३१

---

१. तीक्ष्णें. २. नखें. ३. आदिकारण. ४. शत्रुयशःसमुद्र. ५. दशमुखनगरीजवळ. ६. अस्तास जाऊन. ७. रावणयशःसमुद्रास वडवाग्नि. ८. कलह. ९. होणाऱ्या आपल्या नाशातें. १०. चंद्रोदय. ११. लक्ष्मी. २१. रावणमंदिरीं. १३. सुस्त्रीगणीं निद्रित. १४. परंतु. १५. संतोष आणि मनोव्यथा यांहीं व्यापिलें चित्त ज्याचें असा. १६. मनोगृहीं. १७. या व पुढील अशा दोन आर्यांत वृक्षजातीवर्णन आहे. १८. सुवर्णाची सिताफळी. १९. राक्षसींत. २०. निष्पापा. २१. सीता.

मलिनांत[1] **रा** सुरींच्या मध्यें **सी**तेसि देखतां, कपिला[2] ।
केवळ अनुचित भासे, जैशी कीं गर्दभीगणीं[3] कपिला[4]. ॥ ३२

चित्तीं म्हणे **म** रुत्सुत, 'दैवें तूं राक्षसीसवें[5] तुलसी; ।
अनुचित केवळ झालें, मसणीं भांगेमधें जशी तुलसी. ॥ ३३

**शिव! शिव! ज** गन्निवासा! कैशी गति **जा**नकीस या घडली; ।
श्री**शा**लिग्रामशिला यवनाच्या शून्यमंदिरीं पडली.' ॥ ३४

हें **आं**जने **य** चिंतुनि, झाला संतप्त जेंवि शिखिकुंड[6]; ।
तों रात्रिचरमभागीं[7] आला तेथें सकाम **द**शतुंड[8]. ॥ ३५

तो पापपुं[9] **ज** निस्त्रप[10], निर्मर्याद, स्मरार्त[11] बडबडला; ।
तें अश्राव्य[12], अवाच्य[13], श्रवण करुनि, **मा**रुतीहि गडबडला. ॥ ३६

**सी**ता तें आ **य** कतां, स्थापुनियां अंतरीं तृणासि करें; ।
खलदर्शनकंपिततनु यापरि बोले पराङ्मुखी[14] निकरें. ॥ ३७

'कां पापाचा **रा** नें जासी नरकीं सुहृज्जनासहित? ।
अमृतरसातें टाकुनि, म्हणसी कां क्ष्वेडसेवनास[15] हित? ॥ ३८

लोकपिता **म** ह तूझा कुलगुरु **पौ**लस्त्य, बंधु **वै**श्रवण[16]; ।
श्रवण करुनि हे तूझे, गुण होतिल तप्त पूर्वजश्रवण[17]. ॥ ३९

दुष्प्राप्या हे **श्री** निजदैवें संप्राप्त जाहली अतुला[18]; ।
क्षीर जशी भषणाला[19], तैशी न जिरे अमंगलास तुला. ॥ ४०

कां परदा **रा** संगति निजचित्तामाजि मानिसी सारा[20]? ।
सासवा न वृथा तूं पुण्यायुर्द्रव्यकोश[21] हा सारा. ॥ ४१

**रा**मकरीं **म** ज देउनि, मस्तक ठेवीं तयाचिया पादीं; ।
सुखकारिणी, समुचिता, लोकहिता तत्कृपाचि संपादीं. ॥ ४२

न तमःपुं[22] **ज** कदापिहि जिंकील रणांगणीं महा**र**विसी; ।
बलवद्वैरें केवल वृथाचि निजजीवनासि हारविसी. ॥ ४३

---

१. दुष्टांतःकरण राक्षसी त्यांच्या. २. मारुतिला. ३. गाढवींत. ४. कामधेनु. ५. बरोबरी पावसी. ६. अग्निकुंड. ७. रात्रीच्या शेवटच्या भागीं म्ह० पहांटेस. ८. रावण. ९. पापसमूह. १०. निर्लज्ज. ११. कामयुक्त. १२. ऐकण्यास अयोग्य. १३. बोलण्यास अयोग्य. १४. मागें मुख करणारी. १५. विषपानास. १६. कुबेर. १७. पूर्वजांचे कर्ण. १८. निरुपम. १९. कुत्र्याला. २०. श्रेष्ठ. २१. पुण्य, आयुष्य, द्रव्य यांचें भांडार. २२. अंधकारसमूह.

**का**[1]कुत्स्थसा**य** कांची जरि तव हृच्छोणितांबुधारांहीं[2] ।
होणार पारणा तरि, वारिल तुज कोण? किंबुधा[3]! राहीं.'॥ ४४
ऐसें असु **रा** धिप तो ऐकुनि, कोपोनि, निस्त्रपाचारी ।
निर्दयकृत्या, क्रूत्या[4], दुर्वृत्ता राक्षसींस पाचारी. ॥ ४५
त्यांस म्हणे, '**म** ज होतां वश, न्यावी केलिमंदिरीं[5] धाया; ।
किंवा महानसातें[6] न्यावी हे प्रातराश[7] साधाया.' ॥ ४६
कल्मषभा **ज** न **रा**वण ऐसें बोलोनियां, निशांतातें[8] ।
गेला अकृतार्थमनें, संनिध जाणोनियां निशांतातें[9]. ॥ ४७
त्या राक्षसी **य** माच्या बहिणी झाल्या; 'धरा, चिरा, भाजा, ।
चावा, खा' म्हणती तों, कांपे ते भूपसूनुची भांजा[10]. ॥ ४८
तेव्हां सह **ज** सुशीला त्रिजटा[11] ते राक्षसींस त्या वारी; ।
स्वप्न कथी रामयश:शुभ्राब्ज[12] रिपुप्रतापशिखिवारी[13]. ॥ ४९
वरटा[14] वा **य** ससंघीं, तैशी ते राक्षसीगणीं **सी**ता; ।
तेथें त्रिजटा झाली, मधुरोक्तें कोकिलाचि सुविनीता[15]. ॥ ५०
'**जा**नकि! धी**रा** सि घरीं; अविलंबें हा त्वदीयकांत[16] रणीं ।
तरणी[17] शत्रुध्वांतीं[18] होइल, चिंतानदींत ही तरणी[19].' ॥ ५१
ऐसें ते स **म** जावी; तेणें तो दु:खघन उभे वारें[20]; ।
परि दुष्टभाषणें त्या **सी**तेला सूटलें उभें वारें[21]. ॥ ५२
**क्षि**तिकन्या**श्री**रघुवरयुवति करी तेथ फार आकांत; ।
निश्चितमरणा **सी**ता म्हणे, '**प्र**भो! **राम**चंद्र! हो[22] कांत!'॥ ५३
**मा**रुति ध**रा**[23] रुहावर बैसुनि, उपजावयासि विश्वास, ।
**रा**घवगुणासि वर्णी, जे देती नित्य तोष विश्वास[24]. ॥ ५४
तों **सी**ता द्रु**म** शिखरीं **मा**रुतिला देखतां म्हणे, 'मातें ।
घडला कीं दु:स्वप्न, क्षेम असो बंधुयुक्त**रा**मातें. ॥ ५५
चिंतेनें नी **ज** नसे, स्वप्न नव्हे, हा नैखाक्ष[25] मायावी ।
कपिरूपें आलासे पीडाया, यास कां क्षमा यावी?' ॥ ५६

---

१. रामबाणांची. २. हृदयसंबंधी रक्तरूप उदकधारांहीं करून. ३. मूर्खा. ४. दुष्ट. ५. क्रीडा स्थानीं. ६. स्वयंपाकगृहातें. ७. सकाळचा फराळ. ८. गृहातें. ९. प्रात:कालातें. १०. स्त्री. ११. एक राक्षसी. १२. रामयशोरूप निष्कलंक चंद्र. १३. शत्रुप्रतापाग्नीस उदक. १४. हंसी. १५. नम्रा. १६. तुझा पति. १७. सूर्य. १८. शत्रुरूपी अंधकारीं. १९. नौका. २०. वायूनें. २१. कंपादि. २२. हे. (संबोधनार्थी.) २३. वृक्षावर. २४. जगास. २५. राक्षस.

ऐशी ते भ **य** मानुनि, **सी**ता पडली धरूनि मोहातें; ।
तेव्हां **मा**रुति तीतें, सावध होतां, करी [1]नमो हातें. ॥ ५७

**मा**रुति क **रा** सि जोडुनि, **सी**तेसि म्हणे, 'धरूं नको शंका; ।
मी **राम**दूत **ह**नुमान्, तुजसाठीं सर्व शोधिली **लं**का. ॥ ५८

माते ! **दि**[2]न **म** णिवंशप्रभवें वीरें **स**लक्ष्मणें **रा**में ।
कुशल तुला पुशिलेंसे, [3]त्वद्विश्लेषज्वराचिया धामें. ॥ ५९

[4]**रा**मांघ्र्यंबु **ज** भृंगें, **सु**ग्रीवें, वानरेश्वरें, प्रणतें ।
कुशल तुला पुशिलेंसे, ज्याचें मन धिक् स्वशक्तिला म्हणतें. ॥ ६०

घे अं[5]गुली **य** कातें, **रा**मानें धाडिली तुला [6]मुद्रा; ।
मजशीं [7]स्वकिंकराशीं वद कांहीं गोड, सोड हे [8]मुद्रा.' ॥ ६१

[9]एवं [10]**प्र**भं **ज** नात्मज वदतां, सोडूनि दीर्घ नि[11]श्वास ।
वि[12]श्वास मान्य ऐसें बोले **सी**ता धरूनि वि[13]श्वास. ॥ ६२

'मत्प्राणप्रि **य** राजा कैसा आहे वनांत वीरमणी ? ।
ज्याची [14]**द**शकंठहृता क्षणक्षणीं दुःख आठवी [15]रमणी. ॥ ६३

**ल**क्ष्मण ब **रा** असे कीं ? जो मातें मानितो [16]**सु**मित्रासी; ।
ज्याचा [17]सज्जनतोषद सद्गुण रिपुला करि [18]श्रमी, [19]त्रासी. ॥ ६४

झालें सं[20]गं **म** न कसें **सु**ग्रीवाशीं [21]मनुष्यरायाचें ?' ।
ऐसें पुसतां, **मा**रुति सांगे तिस वृत्त सर्वही याचें. ॥ ६५

वि[22]कचाब्ज **श्री** वदनी **सी**ता तेव्हां म्हणे 'मनामाजी ।
ऐशी आहे **मा**रुततनया ! अत्यंत कामना माझी. ॥ ६६

**रा**मानें मा **रा** वें, येथें येऊनि, [23]राक्षसापसदा; ।
हा [24]उद्वेग करितसे, लोकांसि जसा घरांत साप सदा. ॥ ६७

हा [25]रक्षोध **म** मी निजपातिव्रत्यानलांत होमीन[26]; ।
परि इच्छा आहे कीं, जन [27]**रा**मयशोर्णवांत हो मीन[28]. ॥ ६८

---

१. नमस्कार. २. सूर्यवंशोत्पन्नें. ३. तुझ्या वियोगरूप संतापाच्या. ४. रामपदकमलभ्रमरें. ५. आंगठीतें. ६. खूण. ७. स्वदासाशीं. ८. लज्जादि चिन्ह. ९. या प्रकारें करून. १०. मारुति. ११. श्वास. १२. जगास. १३. भरंवसा. १४. रावणानें नेलेली. १५. स्त्री. १६. सुमित्रेसारखी. १७. साधूंस आनंददायक. १८. श्रमयुक्त. १९. त्रासयुक्त. २०. भेट. २१. रामाचें. २२. प्रफुल्ल कमलशोभा मुखीं जीच्या अशी. २३. राक्षसनीचा. (रावणास.) २४. दुःख. २५. रावण. २६. भस्म करीन. २७. रामयशःसमुद्रीं. २८. मत्स्य.

तनुजातु **ज** मित्रांसह, रक्षःपतिचा [1]गुडासम ग्रास ।
**का**लानें केल्यावर, पावेन सुखास मी समग्रास. ॥ ६९

हा **रघुना य** कहस्तें मरेल रिपु जेधवां, [2]धवासहित ।
जाइन पुरीस तेव्हां, होइल [3]**सा**केतसौधवास हित.' ॥ ७०

वाक्य असें **रा** ज्ञीचें ऐकुनियां, **मा**रुती म्हणे, 'साधू; ।
[4]साधू काम तुझा **प्र**भु; यशःसमुद्रीं [5]चरित्रवासा धू. ॥ ७१

परमोत्त **म** हें माते! [6]कुलशीलानुगुण सन्मताचरण; ।
हें [7]मज न मानतें तरि, **द**शमुखनाशार्थ जन्मताच रण. ॥ ७२

हा [8]पलभो **ज** न, [9]गूथीं जसा कृमि, [10]अघीं तसा रमे; यातें ।
मी पलमात्रें वधितों, जैसा [11]मृगकांत [12]सारमेयातें. ॥ ७३

परि **राम य** शश्चंद्र [13]प्रम्लानद्युति नसो, म्हणून मनीं ।
धरिलाचि धीर **सी**ते! दुष्कर **द**शकंठनाश हें [13]न मनीं. ॥ ७४

चिंता [14]बाहु **ज** मणिला भ्रमवी, जैसा [15]कुलाल चाक बलें; ।
ऐकावें [16]सप्राणा तूं हें **रा**में [17]**स्म**राग्निच्या [18]कवलें. ॥ ७५

विश्वास हो **य** ऐसें, पूर्व [19]अभिज्ञान दे [20]उपायनसें; ।
अर्पीन **रा**मचरणीं; तत्तोषातें दुजा उपाय **न**से.' ॥ ७६

**वायुकुमा रा** चि अशी वाणी ऐकूनियां, कथा यातें ।
विदित कराया, **सी**ता आरंभ करि स्वयें कथायातें. ॥ ७७

'बा! एकदा [21]**मं** दंकीं मस्तक ठेवूनि **चि**त्रकूटवनीं ।
**रा**घव निजला असतां [22]असतांचा शासिता [23]लताभवनीं; ॥ ७८

**राममुख श्री** सक्ता मी होत्यें, तों [24]शरासमान खरें, ।
मद्धृदयीं [25]धाराधर, [26]**वा**सवविायस, करी क्षतें [27]नखरें. ॥ ७९

**तेव्हां रघु रा** ज, [28]जवें [29]कुशरूप **कु**शेशयासनास्त्रातें ।
सोडुनि, हरिता झाला निमिषमात्रें [30]तदेकनेत्रातें. ॥ ८०

---

१. गुळासारखा. २. पतिसहित. ३. अयोध्येंतील राजवाड्यांत राहणें. ४. सिद्ध करो. ५. चरित्ररूप वस्त्रास. ६. कुलशीलास योग्य. ७. राक्षस. ८. विष्ठेंत. ९. पापांत. १०. सिंह. ११. कुत्र्यातें. १२. निस्तेज. १३. मानूं नको. १४. क्षत्रियश्रेष्ठाला. १५. कुंभार. १६. जीवंत. १७. कामाग्नीच्या. १८. ग्रासें. १९. खुण. २०. नजराण्यासारखें. २१. माझ्या मांडीवर. २२. दुष्टांचा. २३. लतागृहीं. २४. बाणसम तीक्ष्णें. २५. मेघरूप. २६. ऐंद्रकाक. २७. नखें. २८. वेगें. २९. दर्भरूप ब्रह्मास्त्रातें. ३०. त्याच्या एका डोळ्यातें.

ध्यावा [1]चूडा **म** णिही; हीं दोन तुला दिलीं [2]अभिज्ञानें; ।
आतां श्री**राम**ातें आणावें शीघ्र तूं [3]अभिज्ञानें.' ॥ ८१

ऐसें बद्धां **ज** लि तो **मा**रुति ऐकोनियां, करी [4]नतिला; ।
चूडामणिसह आज्ञा घेऊनि, निघे स्वयें [5]पुसोन तिला. ॥ ८२

**सी**तांघ्रिद्व **य** वंदुनि जातां, करुनी मनीं विचारासी, ।
मोडी अशोकवनिका **मा**रुति बलशौर्यदीप्तिचा राशी. ॥ ८३

करितां प **रा** क्रमानें [6]अशोकवनिकातरुप्रभंज, न तो ।
**मा**रुति असुरांशि गमे क्षयकर्ता देहवान् [7]प्रभंजन तो. ॥ ८४

कथिति [8]प्र **म** दवनक्षय तद्रक्षक **रा**क्षस [9]क्षमापतितें; ।
म्हणती, 'अशोकवनिका विनाशिली वानरें [10]महांपतितें'. ॥ ८५

[11]राक्षसकुं **ज** र **रा**वण तेव्हां [12]नक्तंचरांसि पाचारी; ।
येती **ब**लि**प्र**हस्तप्रधानपुत्रादिक [13]क्षपाचारी. ॥ ८६

**'कैंचा निर्भय** वानर आला; त्याला स्वयें निवारा जा;' ।
ऐशी करूनि आज्ञा, प्रेषी असुरांसि तेधवां राजा. ॥ ८७

**पु**त्रें प्रभं **ज** नाच्या मारुनि बलयुक्त **जं**बुमालीला, ।
केली [14]कक्षाग्निसमा [15]**अं**तकचेतःसुखक्षमा लीला. ॥ ८८

असुरक्ष **य** करितां तो झाला सर्वामरांसि सुख काल; ।
**लं**काद्वारीं **मा**रुति जातां भासे [16]पलाशजनकाल. ॥ ८९

तेव्हांकोपें **रा** वण पंच [17]**प्र**घसाद्यमात्य तो [18]धाडी; ।
'जीवंत धरा वानर; घाला जाऊनियां' म्हणे '[19]धाडी.' ॥ ९०

ते सचिव [20]**मं** न्युतप्त स्वायुधनिकरें परासुहानिकरें ।
वर्षति, [21]धराधरावर [22]धाराधरसे, **म**रुत्सुतीं निकरें. ॥ ९१

[23]बलशाली **श्री** **मा**रुति तो रणरंगांत [24]यातुधानांतें ।
[25]तोरणपरिघें मारी **द**शवदनाच्या निजप्रधानातें. ॥ ९२

---

१. शिरोभूषणही. २. खुणा. ३. सुज्ञें. ४. नमना. ५. विचारून. ६. अशोकवनवृक्षनाश. ७. वायु. ८. स्त्रीयोग्यक्रीडावनाचा नाश. ९. रावणानें. १०. अतिदुष्टें. ११. राक्षसश्रेष्ठ. १२. राक्षसांसि. १३. राक्षस. १४. गवत आणि अग्नि यांच्यासारखी. १५. मृत्युचित्तास सुख देणारी. १६. राक्षसांचा काळ. १७. प्रघसादिप्रधान. १८. पाठवी. १९. घाला. २०. क्रुद्ध. २१. पर्वतावर. २२. मेघसे. २३. बलवान्. २४. राक्षसांतें. २५. दाराचा अडसर.

रणतृट्प[1] **रा** जयास्तव, रा[2]वणसचिवस्वजीवनोदक पी,।
हांसे, उडे प्रहर्षें, धांवे; ऐसे करी विनोद कपी. ॥ ९३

स्वसचिव **म** थनश्रवणें आली सक्रोध अक्षमा राया; ।
धाडी, बलाबलाचा विचार न करूनि, अ[3]क्ष माराया. ॥ ९४

मुरुदात्म **ज** प्रतापें झाला तो सबल अ[4]क्षम रणातें, ।
ज्वलनीं पतंग तैसा, पावे जाऊनि **अक्ष** मरणातें. ॥ ९५

अ[5]क्षासुक्ष **य** दक्षप्लवंगवक्षें पडे पुरीव[6]रण, ।
व[7]रण करी तद्रेणु द्यु[8]नदीचें, करुनि भा[9]नुभावरण. ॥ ९६

दशकंध **रा** स **अक्ष**क्षयवार्ता जाहली, जसा अ[10]शनी; ।
मग **इं**द्रजितासि म्हणे, 'शै[11]घ्र्य करीं वानराचिया अ[12]शनीं. ॥ ९७

तूं अप्रति **म** पराक्रम **इं**द्रजिता! हो, करूनियां आ[13]जी ।
प्रायः प्ल[14]वंगाधम तो जीवंत धरूनि आणिजे आजी.' ॥ ९८

ऐशी निज **ज** नकाज्ञा होतां, वंदूनि **मे**घ[15]नादानें ।
केलें प्रयाण, तेव्हां भरलें नभ वीरसंघनादानें. ॥ ९९

**वा**युतन **य** आनंदे रणांगणामाजि **मे**घ[15]नादानें; ।
जैसा मयूरपक्षी हर्षे विपिनांत मेघ[16]नादानें. ॥ १००

पं[17]चास्य ग **ज** समूहीं, **प**वनात्मज तेंवि या[18]तुधानगणीं; ।
पर्वत जलधरधारा, तद्वत् रिपु शस्त्रवृष्टिला न गणी. ॥ १०१

शूलासिसा **य** कादिक शस्त्रें पडती अनेकलक्ष तदा; ।
आयुधवृष्टि न झाली परि **प**वनसुतासि ए[19]कलक्षतदा. ॥ १०२

**ब्रह्मास्त्रानें रा** वणसुत **मा**रुतिला करी निबद्ध रणीं; ।
**वि**ध्यस्त्राचा महिमा रक्षी, सामर्थ्य जरि तें[20]दुद्धरणीं. ॥ १०३

होतां **पिता म** हास्त्रें बलसागर **मा**रुती निबद्ध रणीं; ।
धरणीतलीं पडे, परि योजी यत्नासि सु[21]रविपद्धरणीं. ॥ १०४

---

१. युद्धतृषाहरणार्थ. २. रावणप्रधानप्राणरूप उदक. ३. रावणाच्या पुत्राचें नांव. ४. असमर्थ ५. अक्षप्राणनाशकुशल अशा मारुतीच्या हृदयें. ६. नगरीचा तट. ७. आवरण. ८. गंगेचें. ९. सूर्यकांतीचें आच्छादन. १०. वज्र. ११. त्वरा. १२. भक्षणीं. १३. युद्ध. १४. वानराधम. १५. इंद्रजितें. १६. मेघशब्दें. १७. सिंह. १८. राक्षससमूहीं. १९. एकही क्षत देणारी. २०. त्या ब्रह्मास्त्रापासून बाहेर पडण्याविषयीं. २१. देवांची विपत्ति दूर करण्याविषयीं.

निष्क्रिय तो श्री मारुति होतां, आत्यंतिकप्रमोदानें; ।
शणरज्जू करुनि बळें बांधविला शीघ्र मेघनादानें. ॥ १०५

मग नग रा मध्यें तो नेला, जैसा स्वकाल, चालविला; ।
लूतातंतुनिबद्धस्तंबेरमसा धरूनि चाळविला. ॥ १०६

रावणस म क्ष नेला वातात्मज जेधवां बलनदीप; ।
त्याच्या पुढें दिसे तो दशकंधर दीन, जेंवि दिनदीप. ॥ १०७

तिमिरीं[7] अं ज न पर्वत दशशिखर जसा, तसा महाकाय; ।
केवळ पातकसंचय,[9] सर्वतमस्तोमधाम[10] हा काय. ॥ १०८

मशकप्रा य दशानन पवमानसुतें[11] विलोकितां गणिला; ।
कपिमिष[12] काल असा तो मारुति भासे पलाशजनमणिला.[13] ॥

मारुतिला रा[14] त्रिंचरपतिप्रधान प्रहस्त सुविचारी; ।
'तूं कोण ? कोठचा ? कां वन मथिलें ?' हें समस्तहि विचारी. ११०

तेव्हां म्हणे म रुत्सुत, 'दशकंठा! मी तनूज पवनाचा; ।
सेवक सुग्रीवाचा, वाल्यनुजाचा,[15] प्रतापभवनाचा;[16] ॥ १११

रविवंश ज दशरथनृपसंतानक्षीरसिंधुचंद्राचा; ।
गाधिजमुनिमखनाशकराक्षसमथनक्रियावितंद्राचा;[17][18] ॥ ११२

श्रीकंठसा[19] य कासनभंगकुपितभार्गवस्मयहराचा;[20] ।
गौतमभार्याशापक्लेशसुमहदंधकारमिहिराचा;[21] ॥ ११३

सत्यव्रत ज नकाज्ञात्राणार्थत्यक्तराज्यकामाचा;[22] ।
त्वद्भगिनीवैरूप्यक्रुद्धखराद्यसुरबळविरामाचा.[23] ॥ ११४

कांचनका य मृगच्छलहृतकांताविरहतप्तदेहाचा;[24] ।
निजभार्याचोरासुक्षयप्रतिज्ञाविलासगेहाचा. ॥ ११५

तावकप रा क्रमार्यमराहुप्रभवालिवीरकाळाचा;[25] ।
अभिमतवितरणहर्षितसुग्रीवादिप्लवंगपाळाचा.[26][27] ॥ ११६

---

१. स्तब्ध. २. अंबाड्याच्या दोरांनीं बद्ध. ३. कोळ्याच्या सुतांनीं बांधलेला गजसा. ४. छळला. ५. बलसमुद्र. ६. दिवसाचा दिवा. ७. अंधकारीं. ८. काजळाचा पर्वत. ९. पापसमूहें. १०. सर्व-अंधकारसमूहस्थान. ११. वायुपुत्रें. १२. वानररूपी. १३. राक्षसश्रेष्ठा. (रावणाला.) १४. रावणप्रधान. १५. वालीचा बंधु जो सुग्रीव त्याचा. १६. प्रतापाचें स्थान जो वालिबंधु त्याचा. १७. यज्ञ. १८. आळसरहित. १९. शिवधनुष्य. २०. गर्व. २१. गौतमऋषिपत्नी जी अहल्या तिच्या शापरूप मोठ्या अंधकाराचा सूर्य जो राम त्याचा. २२. रक्षण. २३. नाश. २४. कपट. २५. सूर्य. २६. देणें. २७. वानर.

वरविक्र **म** मंडितभुजदंडनिहितचंडचापदंडाचा; ।
मी दूत **रा**घवाचा, त्वद्विधदुष्टैककालदंडाचा.[1] ॥ ११७

**वा**ल्यनुजें[2] **श्री सी**ता शोधायाला प्लवंगयूथपती ।
पाठविले, ते गेले जेथवर अंशुपाद[3] हे तपती. ॥ ११८

मी पारावा[4] **रा** तें आलों लंघूनि एक त्यामाजी; ।
**सी**तेला अवलोकुनि, झाली हे दृष्टि निर्मला माझी. ॥ ११९

**द**शकंठा! **म** द्वाक्यें, **र**घुपतिला **जा**नकी समर्पावी; ।
रामशरक्षतवक्षःक्षतजें[5] क्षिति राक्षसां न तर्पावी. ॥ १२०

वाताश[6] भुं[7] **ज** ग परि तो, गरुडश्वासानिलीं[8] न धरि कामा[9]; ।
परदाररता[10]! मरसी, धरूनि रामांगनारुचि[11] रिकामा. ॥ १२१

रामेषुच[12] **य** ज्वलनीं निजवंशाच्या करीं न होमासी; ।
सच्चरितामृतपानीं तुझी कथा हे जनीं न हो माशी[13]. ॥ १२२

ठेवीं स्वशि **रा** सह तूं, **सी**तेला **रा**घवाचिये चरणीं; ।
न करीं पापाचारें वंशक्षय आघवाचि याच रणीं. ॥ १२३

**प्र**भुला न **म** न करीं, जरि केला दंडार्ह मंतु[14], तो विसर; ।
विसर पडेल नृपाला, तन्मानस **मा**नसाख्य जेंवि सरें[15]. ॥ १२४

माझ्यावाक्यें **ज** रि तूं न देशि नृपसिंहनिजकलत्रास[16]; ।
तरि घडतो तुज पापा! **का**लापासूनि अविकलत्रास[17]. ॥ १२५

न करुनि **य** त्न विमूढा! मीच तुला मारितों पलामाजी; ।
**रा**माज्ञा परि नाहीं; वेदस्मृति तेच केवळा माझी. ॥ १२६

मी निजभु **ज** बललेशें क्रीडा केली वनीं पलाशगणीं[18]; ।
आलोंसें कळवाया अंतीं हे वक्रता जशी श्वगणीं[19]. ॥ १२७

भावि प्रल **य** कथा या, वांचायाचा उपाय दावाया, ।
आलों; परि तूं कांहीं न वदसि कां? सांग दुर्मदा! वायां[22].॥ १२८

---

१. तुझ्यासारख्या दुष्टांचा हननकर्ता. २. सुग्रीवें. ३. सूर्यकिरण. ४. समुद्रातें. ५. रामबाणविद्धहृदयाचे रक्तें. ६. वायुभक्षक. ७. सर्प. ८. गरुडश्वासवायूच्या ठायीं. ९. इच्छेला. १०. हे परस्त्रीरता. ११. सीतेची इच्छा. १२. रामबाणसमूहाग्नींत. १३. मक्षिका. १४. अपराध. १५. सरोवर. १६. रामस्त्रीला. १७. महादुःख. १८. राक्षससमूहीं. १९. कुत्र्यांच्या समूहीं. २२. व्यर्थ.

खहितक रा ला बंधन केलें [1]तागुणासमान गुणें; ।
यमपाशबद्ध हो तूं; वाढो [2]सत्पात्रदान [3]भूरिगुणें. ॥ १२९
सेवीं पर म सुखावह रामाचे पाद [4]दासमुरतरुचे; ।
परदाररता! तुजला निज कांतेशींच कां न [5]सुरत रुचे? ॥ १३०
आयुःकीर्तिश्री क्षय कां करिशी? निजगुणेंचि विपरीतें; ।
इच्छिशि [6]चिंता निजाया, मूढा! कंटाळलासि [7]उंपरीतें.' ॥ १३१
हें ऐकुनि रा गें तो सांगे दासांसि [8]देवरिपु राजा; ।
'कपि मारा, भाजा, खा, किंवा हा द्या सुळावरि; पुरा जा.' ॥ १३२
हें ऐकतां म हात्मा बिभीषण प्राज्ञ तो म्हणे, 'राया! ।
दूत अवध्य; नयज्ञा! योग्य नसे हा प्लवंग माराया.' ॥ १३३
[9]मानी अनु ज वचन; मग [10]मानी दशकंठ तो म्हणे, 'धांवा; ।
घृततैलसिक्तवस्त्रें मर्कटपुच्छाग्रभाग बांधावा. ॥ १३४
लावा अग्नि य थेष्ट, प्रहार दंडादिकें करा, करवा; ।
लंकापुरींत मारा, मार करित हा घरोघरीं फिरवा.' ॥ १३५
आज्ञा होतां, रा क्षस पेटविती [11]आंजनेयलांगूल; ।
वेष्टिति जसे पिपी[12]लिका, [13]खदिरांगारासि मानुनी गूळ. ॥ १३६
हें ऐकोनि [14]मैं हीजा, [15]दासस्वस्त्यर्थ, [16]वन्हिला विनवी; ।
चित्तीं म्हणे, 'मला कां चिंता प्रतिकूल दैव लावि नवी?' ॥ १३७
[17]नंदनें नि[18]ज मित्राचा, सीतेचा भक्त, देवकार्यकर; ।
पुच्छाग्रकेशशिखरीं, म्हणुनि वसे वन्हि जेंवि शीत[19]कर. ॥ १३८
[20]पुंच्छाग्राल य पावक, [21]मणिदीप तसा, करी न तापातें; ।
असुरांपासुनि [22]हरि तो उडता झाला, न हालतां [23]पातें. ॥ १३९
[24]परिघें, भु ज दंडानें, निर्मुनि [25]नक्तंचरप्रमथनातें; ।
[26]अनलें प्रदीप्त लंका केली, जैशीं [27]पुरें [28]प्रमथनाथें. ॥ १४०

---

१. कोळीकीटाच्या सुतासारख्या दोरानें. २. उत्तमपात्रीं दान. ३. अनंतगुणें. ४. भक्तकल्पद्रुमाचे. ५. क्रीडा. ६. प्रेतशय्या. ७. माडीतें. ८. रावण. ९. मान्य करी. १०. अभिमानी. ११. मारुतीचें पुच्छ. १२. मुंग्या. १३. खैराच्या इंगळाला. १४. सीता. १५. मारुतिकल्याणार्थ. १६. अग्नीला. १७. पुत्र. १८. अग्निमित्र (वायु) त्याचा. १९. चंद्र. २०. पुच्छाग्रीं राहणारा. २१. रत्नदीप. २२. वानर. २३. नेत्रांचें पातें. २४. स्तंभें. २५. राक्षसनाशातें. २६. अग्नीनें. २७. त्रिपुरें. २८. शिवें.

'हा तात!मा **य**! पुत्रा! मित्रा!' म्हणती कितीक 'हा **सीते**!' ।
अनलग्रस्ता **लं**का झाली, जैसें स्मशान, तैशी ते. ॥ १४१
आत्मकुमा[1] **रा** भिलषित पुरवाया भेटला शिखीस गडी[2]; ।
अंगारपूर्णनगरी **का**लाची काय कांचनी[3] सगडी? ॥ १४२
अग्निमुखा[4] **म** र सुखवुनि, घेउनियां **जा**नकीनिदेशाला[5], ।
सागर लंघुनि, गेला **वा**लिसुताधिष्ठितप्रदेशाला[6]. ॥ १४३
दिव्य मुख **श्री** पाहुनि, त्यांला कळलें कृतार्थ आला हें; ।
**जां**बवदंगदमुख कपि **मा**रुतिला भेटताति लवलाहें[7]. ॥ १४४
भेटुनि **ता**[8] **रा** पुत्रप्रभृतिप्लवगांसि, **आं**जनेय कवी ।
जलराशि[9]लंघनाद्यरिनगरीदाहान्त सर्व आयकवी. ॥ १४५
मग हर्ष[10] **म** ग्नचित्तें, प्रियवार्ता **रा**घवासि कळवाया, ।
निघती कपिपंचानन[11], रघुवर[12]शोकद्विपासि पळवाया. ॥ १४६
रामाघ्र्यंबु[13] **ज** सद्रस सेवूं जातां, प्लवंगमधुपानीं[14] ।
मुखधावन[15] केलें कीं, त्या मार्गीं मधुवन[16]स्थमधुपानीं. ॥ १४७
मधुनिल[17] **य** मधुवनातें मर्दुनि, मनुवंश[18]मानवेशाला ।
**मा**रुतिमुख मर्कटमणि[19] नमिती मुनिच्या समानवेशाला.॥ १४८
**मा**रुति क **रा** सि जोडुनि, 'आहे जीवंत **जा**नकी देवी;' ।
ऐसें वदोनि, चूडामणिसह शिर **रा**घवांघ्रिवर ठेवी. ॥ १४९
'देवा! चूडा **म** णि हा **सी**तेचा घे, मदीयकर्ण[20]पथा ।
आली ब्रह्मास्त्र[21]च्युतिनष्टैकदृग्**ज**यंतकाककथा. ॥ १५०
मी बहुयो **ज** न सागर लंघुनियां, सर्व शोधिली **लं**का; ।
**सी**ता विलोकिली मग अशोक[22]वनिकांतरांत अकलंका. ॥ १५१
गरुडाल[23] **य** गा नागी, तैशी **सी**ता असे अशोकवनीं; ।
**रा**वणवाक्शरभग्ना, मग्ना आहे अपार[24]शोकवनीं. ॥ १५२

---

१. आपल्या पुत्राची इच्छा. २. सोबती, सखा. (वायु.) ३. सुवर्णाची. ४. अग्न्यादिदेव. ५. सीतेच्या निरोपाला, आज्ञेला. ६. समुद्राच्या आलीकडे. ७. शीघ्र. ८. अंगदादिवानरांस. ९. समुद्रलंघनादिलंकादहनान्त. १०. आनंदितमनें. ११. वानरसिंह. १२. रामशोकगजासि. १३. रामचरणकमलसंबंधीं उत्तम रस. १४. वानरभ्रमरांनीं. १५. तोंडधुणें. १६. मधुवनांतील मद्यपानांनीं. १७. मद्यस्थान जें मधुवन त्यातें. १८. रामाला. १९. वानरश्रेष्ठ. २०. माझ्या कानीं. २१. ब्रह्मास्त्रतेजें नष्टनेत्रकाककथा. २२. अशोकवनांत. २३. गरुडगृहस्थिता. २४. अपारशोकोदकीं.

त्वत्पदर **ज** मी देवा! देता झालों नमूनि तिस मुद्रा; ।
झाली ते तरि तीच्या हृदयास तरावया [1]मृतिसमुद्रा. ॥ १९३

सीतेचें प्रि **य** हें कीं, त्वां स्वशरांहीं दशाननासि रणीं ।
मारूनियां, भरावी रात्रिचराहीं [3]परेतराट्सरणी. ॥ १९४

दशकंध **रा** सि सत्वर मारीं, किंवा मला तरीं स्वकरें; ।
ऐसा निरोप तुजला सीतेनें धाडिला असे निकरें. ॥ १९५

[4]भवदाग **म** नविलंबें दुर्वह अत्यंत दे[5]हभर तीतें; ।
नाहीं उतार कांहीं तीच्या चिंतासमुद्रभरतीतें.' ॥ १९६

---

## युद्धकांड.

मुदितमना **श्री** राघव **सी**ताकौशल्य ऐकता झाला; ।
अर्पी दुर्लभ सुखकर आलिंगन गं[6]धवाहतनुजाला. ॥ १

[7]उपकृतिपा **रा** वारीं नौका नाहीं, म्हणोनियां काय ।
आलिंगिला नृपालें [8]सिंधुतरणदक्ष कपि महाकाय? ॥ २

राम म्हणे, 'भे **म** दुःख[9]ध्वांतीं झालासि मारुते! त[10]रणी; ।
सीतेसि तारिलें त्वां, होउनियां शोकसागरीं त[11]रणी. ॥ ३

सखीकाला **म** **ज** ला वांचविलें [12]शत्रुकीर्तिविधुराहो! ।
तुझिया पराक्रमानें लंका [13]रक्षोवियोगविधुरा हो. ॥ ४

त[14]वबलप **य** स्विनीच्या पूरें खललोक [15]वृक्षविध वाहो; ।
असुरेंद्रराजधानी, तुझ्या प्रतापेंकरूनि विधवा हो.' ॥ ५

इत्यादि तो न **रा** धिप मारुतिचें [16]स्वाननें करी स्तवन; ।
मुदित [17]कपिकुलध्वानें गमलें तें सिंधुचें समस्त व[18]न. ॥ ६

'कशि नगरी **म** द्रिपुची? मार्ग कसा? वीर किति? कशी सेना? ।
मजला नदीपतीतें उतरायालागिं युक्ति गवसेना.' ॥ ७

मारुति म्हणे, '**ज** नेंद्रा! शतयोजन [19]वारिधी असे पहिला; ।
ज्याला चुंबिति स[20]रसा स्वयंवरा गोत्र[21]कन्यका [22]महिला. ॥ ८

---

१. नौका. २. मरणसमुद्रा. ३. यममार्ग. ४. तुमच्या येण्याच्या विलंबानें. ५. देहाचा भार. ६. वायुपुत्राला. (मारुतीला.) ७. उपकारसमुद्रीं. ८. समुद्रोल्लंघनसमर्थ. ९. माझ्या दुःखांधकारीं. १०. सूर्य. ११. नौका. १२. हे शत्रुयशश्चंद्राहो. १३. राक्षसवियोगें दुःखिता. १४. तुझ्या बलनदीच्या. १५. वृक्षांसारखा. १६. स्वमुखें. १७. वानरशब्दें. १८. उदक. १९. समुद्र. २०. जल किंवा प्रीति इनें युक्त. २१. पर्वतकन्या. २२. स्त्रिया. (नद्या.)

त्याहुनि पुढें **य** मालयतुल्या लंका, सुवर्णप्राकारा[1]; ।
गंभीरनीरपरिखा[2], गुप्तद्वारा[3], सुरांगनाकारा[4]. ॥ ९

पूर्वद्वारीं वि **ज** यी रक्षक शस्त्रास्त्रवित् बली अयुत[5]; ।
तितुकेच असुर पश्चिमदिग्द्वारीं वसति शौर्यशक्तियुत. ॥ १०

असिशूलसा[6] **य** कासनशरकर संख्येकरूनियां नियुत[7]; ।
यमयक्षपदिग्द्वारें[8] रक्षिति निंद्रेकरूनि जे वियुत[9]. ॥ ११

पादातकुंज[10] **रा** श्वस्यंदनपूर्णा, प्रदोषचरसेना[11]; ।
वीर्योदीर्णा, यमसमवर्णा, स्थल जीस तेथें[12] गवसेना. ॥ १२

दुर्गम दुर्ग **म** हादृढतर परमक्रूर परि परीतमती[13] ।
मज ते तवप्रतापज्वलनाची स्वर्णवेदिका[14] गमती. ॥ १३

त्रिपुर जसें **श्री** कंठें स्वशरें केलें क्षणांत भस्म रणीं; ।
तशि तव दासें लंका जाळुनि केली क्षमा[15] पुरस्मरणी[16]. ॥ १४

प्रभु! तव प **रा** क्रमाग्निस तृणसंहति[17] इंद्रजिज्जनकलंका[18]; ।
वधिशिल रणांगणीं त्या दशानना सर्वसज्जनकलंका.' ॥ १५

ऐसें ऐकुनि **म** ग तो राम म्हणे, 'मारुते! महाबाहो! ।
रावण मारिन ऐसा आहे तो सत्य काम[19] हा बा! हो. ॥ १६

कशि ते धनं[20] **ज** यमुखीं वीरा! त्वां होमिली स्वयें लंका? ।
जनकर्णामृतधारा[21] राहो तव कीर्ति नित्य अकलंका. ॥ १७

हा मकराल **य** दुस्तर, याहुनिही जानकी. वियोग मतें[22]; ।
गमतें संकट सारें; तुमचीं कैशीं अहो! प्लवंग! मतें?' ॥ १८

वानरकुल[23] **रा** ज म्हणे, 'सिद्धि असे धैर्यबलनयोत्साहें[24]; ।
साहें वियोगदुःख, क्षयिष्णु[25] आहे जगन्निवासा! हें. ॥ १९

तव सेवक **म** र्यादा विलंघनीं मात्र हो न हे सकती; ।
प्लवग, तवांघ्रिप्लवगत[26], तरले भवसिंधु, हा समुद्र किती?' २०

---

१. सुवर्णाचा कोट जिला अशी. २. खोल पाणी आहे ज्यांत असे खंदक जीस. ३. रक्षितद्वारा. ४. देवांगनाची बंदिशाळा. ५. दहाहजार. ६. खड्गशूलधनुर्बाणहस्त. ७. लक्ष. ८. दक्षिण आणि उत्तर दिशा यांचीं द्वारें. ९. हीन. १०. पायदळ हत्ती घोडे रथ यांहीं पूर्ण. ११. राक्षससेना. १२. लंकेंत. १३. बुद्धिहीन. १४. सुवर्णकुंड. १५. पृथ्वी. १६. नगरांचें स्मरण जीच्या ठायीं अशी, किंवा त्रिपुराचें स्मरण जीच्या ठायीं अशी. १७. तृणसमूह. १८. रावणाची लंका. १९. इच्छा. २०. अग्निमुखीं. २१. लोकांच्या कानास अमृतधारारूप. २२. मातें. २३. सुग्रीव. २४. धैर्य, बल, नीति, व उत्साह यांहींकरून. २५. नश्वर. २६. त्वत्पदनौकाश्रित.

राम म्हणे, 'वि[1]जय याभिध मुहूर्त आहे बरा प्लवंगपते[2] ! ।
आज निघावें, जय मज घडतो, मरतील दुष्ट कौणप[3] ते.॥ २१

जे गज[4] गवय गवाक्ष प्लवंग चालोत ते पुढें सबल; ।
उत्तरदक्षिणपार्श्वी[5] ऋषभ, दुजा गंधमादन प्रबल. ॥ २२

कपिराया ! तूं[6] जघनीं राहुनियां सावधान संरक्षीं; ।
पाळूत वेगदर्शी सुषेणसह जांबुवंत हे कक्षीं[7]. ॥ २३

कपिकुलनायक नील सबलें रक्षू समस्तसेनेला; ।
सावध वर्ता, अतिबल रिपु, तो अंतासि पाहिजे नेला. ॥ २४

मी वायुकुमाराच्या स्कंधीं बैसोनि चालतों कटकीं; ।
वालिसुतस्कंधीं तूं अनुजा[8] ! चढ, जेंवि अद्रिच्या कटकीं[9]. २५

अल्पपराक्रम दुर्बल जर असतील प्लवंग, तर त्यांतें ।
किष्किंधानगरीं तूं स्थापुनि, घे शत्रुसिंधुतरल्यांतें[10].' ॥ २६

वचन असें श्रीरघुकुलतिलकाचें ऐकतांचि, यूथवर[11]. ।
जयशब्द करिति, तो ध्वनि जाता झाला, दिगंत जेथवर. ॥ २७

वंदुनि रघुरा यातें, उठती धरुनी करीं शिला विटपी[12]; ।
शतबलि, शरभ, दरीमुख, पनस, गजार्क, प्रजंघ, दंभ, कपी. २८

गरुडस्कंधीं म[13]धुरिपु, जेंवि मयूरद्विजावरि[14] स्कंद[15], ।
तैसे अधिष्ठिती ते दाशरथी वायुजांगदस्कंध[16]. ॥ २९

बहुकोटि ध्वज तैसे, कपि करिती पुच्छसंघ ते वरते; ।
तेव्हां गमती जाणों जाती यमदंड राक्षसांवर ते. ॥ ३०

गोरे, नीळे तो[17]यदवृंद तसे, रक्त किति कपी, बाळे, ।
पिंवळे, प्रवाल[18]संनिभ, किति धूमाक्ष, प्लवंग किति काळे. ॥ ३१

ते चलितधरा[19]धरसे पीन[20], प्लवगप्रवीर, बहुसंख्य. ।
गर्जति घनसे, म्हणती, 'शीघ्र घडो रावणासवें संख्य[21].' ॥ ३२

परिघप्रतिम[22] भुजांतें, ताडिति हसती कपी किती उडती; ।
धावति कांपविति क्षिति, पाडिति तरु पर्वतावरी चढती. ॥ ३३

१. विजयनामक. २. हे सुग्रीवा. ३. राक्षस. ४. गजादिनामक वानर. ५. उत्तरदक्षिणभागीं. ६. सेनामध्यभागीं. ७. मध्यभागीं. ८. हे लक्ष्मणा. ९. कड्यावर. १०. शत्रुसमुद्रतरणाऱ्यांतें. ११. समूहपति. १२. वृक्ष. १३. विष्णु. १४. मयूरपक्ष्यावर. १५. कार्तिकस्वामी. १६. मारुति व अंगद, यांचा खांदा. १७. मेघसमूहसे. १८. पोंवळ्यासारखे. १९. चालणाऱ्या पर्वतासारखे. २०. पुष्ट. २१. युद्ध. २२. स्तंभतुल्य बाहूंतें.

जैसा प्रलयीं **ज** लनिधि, कपिबल तैसें सुरासुरासह्य[1]; ।
गेलें **रा**मासह तें सागरतीरासि, उतरुनी सह्य[2]. ॥ ३४
तो उत्तरतो[3] **य** निधि, प्लवगचमूचें करूनियां छद्म, ।
गेला दक्षिणसागरविजिगीषु[4], क्रोधवन्हिचा सद्म[5]. ॥ ३५
रघुपति नि **ज** सेनेसह जाउनियां पावला समुद्रासी; ।
**सु**ग्रीवातें सांगुनि, कपिबल उतरी स्वदासमुद्राशी[6]. ॥ ३६
कपि तेथें आ **य** कतां, **द**शरथनृपसूनुच्या विलापाला; ।
फलजलसेवन कैंचें? एकानेंही न चाविला पाला. ॥ ३७
'हा **सी**ते! रुचि**रा**क्षी, तुजविण झाली सदा तनू कारा[7]; ।
कां राक्षसें मलाही नेउनि, संपादिलें न उपकारा? ॥ ३८
तुजसह क **म** लाक्षी! मज झालें होतेंच केलिगेह[8] वन; ।
**स्म**र[9] करितो मत्तनुचें तुझिया विश्लेषपावकीं[10] हवन. ॥ ३९
विद्रुमबिंब[11] **श्री** हरतवाधरामृतरसैकतृप्तानें. ।
मधुदुग्धेक्षुरसादिक[12] गणिलें नाहींच मी सुदृप्तानें[13].' ॥ ४०
जलनिधितीरा[14] **रा** वासी **रा**घव राजा असे विलाप करी; ।
जैसा कर्दमनिपतित[15], कुलच्युत[16], ग्राम्यहृतकरेणु[17], करी[18]. ॥ ४१
तेव्हां सुमंगल[19] **म** रुत्सुतलक्ष्मण**ता**रासुतादि वीरमणी ।
म्हणति, '**वि**भो! भेटेल क्षितिजेसह[20] कीर्तिही नवी रमणी[21].'॥ ४२
ऐसे ते सांत्व **ज** लें शमविति तापासि वारिवाह[22] तसे; ।
त्यांच्याहि नयनरंध्रें प्रवृद्धदुःखाब्धिवारि[23] वाहतसे. ॥ ४३
पापरत, प्रि **य** साहस, **रा**वणही काळवन्हिचा कवळ, ।
नगरीं पुसे विचार प्रधानसुतबंधुसैनिकांजवळ. ॥ ४४
'सर्वांचाहि प **रा** जय करुनी, न धरूनि मृत्युभयशंका, ।
एकाच मर्कटानें, सागर लंघूनि, जाळिली **लं**का. ॥ ४५

---

१. देवदैत्यांस असह. २. सह्यपर्वत. ३. उत्तरसमुद्र. ४. दक्षिणसमुद्राचा जयेच्छु. ५. स्थान. ६. आपल्या भक्तांस आनंदराशि. (राम.) ७. बंदिशाला. ८. क्रीडागृह. ९. मदन. १०. वियोगाग्नींत. ११. पोंवळें व तोंडलें यांची शोभा हारक जो तुझा ओष्ठ तत्संबंधी अमृतरसाच्या प्राशनेंकरून तृप्त अशा म्यां. १२. मध, दूध, उंसाचा रस, इत्यादिक. १३. अतिगर्विष्ठानें. १४. समुद्रतीरीं राहणारा. १५. चिखलांत पडलेला. १६. कळपांतून भ्रष्ट. १७. ग्रामवासी मनुष्यांनीं हरिली हत्तीण ज्याची असा. १८. हत्ती. १९. सुग्रीव, मारुति, लक्ष्मण अंगदादि वीरश्रेष्ठ. २०. सीतेसह. २१. स्त्री. २२. मेघसे. २३. वाढलेल्या दुःखसमुद्राचें उदक.

आतां निर्भय **म**[1] नुज, प्लवंगबल घेउनि, प्रियेकरितां ।
येईल, सिंधु लंघुनि; कैसा याचा विचार हो करितां?' ॥ ४६

हें ऐकुनि, र **ज** नीचर म्हणती, 'राया! सलील[2]जितलेखा ! ।
लेखा[3] न धरीं त्यांचा, ते मर्त्य महानसींच[4] शिजले खा. ॥ ४७

मर्कटसहा **य**, दुर्बल, रक्षोभक्ष[5], स्वलोकसंत्यक्त[6]; ।
भक्तजनास अनुज्ञा दे, वधितों सबल मूढ तो व्यक्त.' ॥ ४८

**रावणतनु** **ज** महाबळ घननाद[7]हि तो म्हणे, 'अहो तात! ।
आज्ञा द्यावी, ते नर, कपिसह यमलोकपांथ[8] होतात.' ॥ ४९

ऐके निद्राप्रि[9] **य** तो, सचिवमुखें, **कुं**भकर्ण हे वार्ता; ।
येउनि निजाग्रजाला, म्हणे, 'धरीं धीर **मा**नस[10]भवार्ता ! ॥ ५०

अनुचित हें **रा** क्षसपति! केलें, जे आणिलीस पर[11]महिला; ।
**मं**दोदरीस टाकुनि, बापा! भुललासि काय परम हिला? ॥ ५१

नव्हे हें उत्त **म** तुज लोकीं **र**घुवीरकामिनीहरण; ।
हरिन परंतु तयाचे प्राण रणीं, मी 'हरीच[12], तो हरिण.' ॥ ५२

हें ऐकुनियां **श्री** मान् **बि**भीषण प्राज्ञ मंद हास्य करी; ।
प्रोत्साहन करुनि म्हणे, 'नेतां हरिच्या पुढें **द**शास्यकरी[13]. ॥ ५३

ज्याच्या खर[14]ना **रा** चज्वलनीं खर[15] करुनि संगर[16] जळाला; ।
त्या बाणानलशमनीं[17] सामर्थ्य न सप्तसागरजळाला[18]. ॥ ५४

जे दुःसह **य** **म** दंड प्रचंड शर वज्रगर्व हरणार; ।
कालाग्निज्वालसखे, व्यालप्रभ[19] त्यांत काय मरणार? ॥ ५५

शाखामृगरा[20] **ज** महाप्रताप विख्यात जो अनेकबल; ।
त्या **वा**लिचाहि केला क्षणमात्रें राममार्गणें[21] कवल. ॥ ५६

हा मकराल **य** दुस्तर शतयोजन गोष्पद[22] क्षणें केला; ।
एकाच वानरानें, वन्हिमुखीं होमिलेंचि **लं**केला. ॥ ५७

---

१. मनुष्य. २. सहज जिंकिले देव जेणें अशा हे रावणा. ३. गणना. ४. पाकशाळेंतच. ५. राक्षसांचा भक्ष. ६. स्वजनत्यक्त. ७. इंद्रजितहि. ८. यमपुरीस जाणारे वाटसरू. ९. निद्राळू. १०. कामपीडिता. ११. परस्त्री. १२. सिंहच. १३. रावणरूप हत्ती. १४. तीक्ष्ण बाणाग्नींत. १५. राक्षसविशेष. १६. युद्ध. १७. बाणाग्निशांतिविषयीं. १८. सप्तसमुद्रोदकाला. १९. सर्पतुल्य. २०. वानरराज. २१. रामबाणें. २२. गाईच्या पावलासारखा.

ऐसेच वान **रा** धिप अगणित एकापरीस एक बळी; ।
येतिल उघडायाला [1]बहुकालजिघत्सुमृत्युची [2]कवळी. ॥ ५८

रघुनाथातें **मै**[3] हिषी द्यावी, आतां करूं नको अनय; ।
धन यश जीवन रक्षीं, शरणागत जा, धरूनियां [4]विनय.॥५९

गरुडस्त्री [5]भुं **ज** गानें, तैशी हरिली बलें [6]नरेशस्त्री; ।
**द**शवदना! तूं हृदयीं भरिशी मरणार्थ कांचनी [7]शस्त्री. ॥ ६०

[8]दुस्तरनिर **य** प्रद हा [9]कुलवृक्षकुठार, '[10]कीर्तिशशिराहू; ।
[11]परदारकाम सोडीं; **पु**लस्त्यमुनिचा सुवंश चिर राहू.' ॥ ६१

एसें नि[12]जानु **ज** न्मा वदतां विहित, स्वलोककीर्तिहित; ।
अहित गणुनि, '[13]अहितैसा फिरला बंधूवरि क्षमारहित. ॥६२

[14]अंगारसंच **य** प्रभदृक् **द**शमुख तो शुभस्वभावास ।
भावास म्हणे, 'करिशी इतरांच्या आज [15]अस्वभावास. ॥ ६३

बहु बहु प **रा** सि वर्णिसि, मज निंदिसि, [16]यातुधानजननीचा ! ।
कां तुज घडलें नाहीं गर्भापासूनि पतन जननीच्या? ॥ ६४

राक्षसभक्ष **म** नुष्य, स्वजनत्यक्त, प्लवंगसख, यास ।
स्तविसी, निंदिसि बंधुस, राजास, प्रभुस, गुरुस, सखयास.॥६५

[17]हरिवरुण **श्री** दयमज्वलनश्वसनग्रहेश**सो**मातें ।
मीं जिंकिलें; अशातें उपदेष्टा काय तूं [18]शिशो! मातें? ॥ ६६

मी त्रिभुवन **रा** जा, मी शास्ता, मी वंद्य, रत्नभोक्ता मी; ।
मी ज्ञानी, मी मानी, मी प्रभु, मी स्तुत्य, मी तुझा स्वामी.॥६७

तूं दुर्बल, पा **म** र, खल, पंडितमानी, [19]भयाज्ञतागार; ।
क्लीबा! तेजस्विकुळीं अयोग्य, [20]रत्नाकरीं जशी गार. ॥ ६८

तूं रिपु [21]अनु **ज** च्छद्म, ज्ञातीचा कोण धरिल विश्वास? ।
[22]दायाद व्यसनातें इच्छिति, हें ठावकेंचि [23]विश्वास. ॥ ६९

---

१. बहुत दिवस क्षुधित अशा मृत्यूची. २. दंतपंक्ति. ३. स्त्री. ४. नम्रता. ५. सर्पें. ६. राणी. (सीता.) ७. कटार, सुरी. ८. दुस्तर नरक देणारा. ९. कुलवृक्षाचा कुठार. (कुऱ्हाड.) १०. कीर्तिचंद्रग्रास करणारा. ११. परस्त्रीची इच्छा. १२. धाकटा भाऊ बिभीषण. १३. सर्पसा. १४. इंगळासारखे डोळे ज्याचे असा. १५. शत्रुभावास. १६. राक्षसनीचा. १७. इंद्र, वरुण, कुबेर, यम, अग्नि, वायु, सूर्य, चंद्र, यांतें. १८. हे बालका. १९. भय आणि मूर्खत्व यांचें घर. २०. समुद्रीं. २१. बंधुत्वाचें कपट करणारा. २२. बंधु. २३. जगास.

मच्छत्रुविज **य** इच्छिसि, दुष्टा! बंधुत्व हें तुझें जळलें; ।
बहु सांत्वन केलें तरि, असती स्त्री टाकिती, मला कळलें. ७०
त्या **रा**मपाम **रा** ला तरवेल विशाल सिंधुपाल कसा? ।
दुसरा मद्बलसागर, मज हरिला[1] तो कुरंगबालकसा[2]. ॥ ७१
ज्या मस्तकक **म** लातें धरिता झाला शिरीं स्वयें **शि**व, तें ।
मनुजाधमचरणातें कैसें रे! मृत्युच्या भयें शिवतें? ॥ ७२
जिंकुनियां भु **ज** वीर्यें सुर, त्रिलोकी क्षणांत वश केली; ।
रामा[3] वनेचरी जरि हरिली, हे तो समस्त नृपकेली[4].' ॥ ७३
यापरि अन्या **य** प्रिय **रा**वण कोपें[5]**स्म**रज्वरें बरळे; ।
सरळेचि वक्र दिसती, कालानें दृष्टि जेधवां तरळे. ॥ ७४
केवल अग्र **ज** वाक्यें अवमान सभेंत जेधवां झाला; ।
तो मानधन[6] **बि**भीषण जाय शरण शीघ्र **रा**मराजाला. ॥ ७५
शिखिंदीपाल[7] **य** जैसें त्यजिती प्राणार्थि[8] लोक, हाहि[9] तसा; ।
सचिवचतुष्टय[10] घेउनि, जाय पुरींतूनि वन्हिदाहितसा[11]. ॥ ७६
सिंधूत्तरती **रा** तें, जाउनियां तो नभीं उभा राहे; ।
तों अवलोकुनि, वानर म्हणती, 'आले अमित्र[12], मारा हे.' ॥ ७७
तेव्हां महाद्रु **म**, शिला घेउनि, उडती अनेक हरि[13] वरते; ।
क्षितिजाहरणकुपितहिमधरणीध्रतनूज[14] काय गिरिवर ते? ॥ ७८
त्यांस म्हणे तो **श्री** मद्भास्करकुलदुग्धसिंधुचंद्रातें[15]; ।
'शरणार्थी मी, ऐसें सांगा जा शीघ्र **रा**मचंद्रातें. ॥ ७९
नरवरदा[16] **रा** चोरत्यक्त, दुरितकृद्वियोगसंतुष्ट[17], ।
दास, **बि**भीषण **रा**घवपददेवांचाचि होय संपुष्ट. ॥ ८०
दे रघुपति[18] **म** हिषी, हें हित कथितां, त्यास भासलें अहित; ।
निंदुनि मज अनुजाला त्यजिलें, 'झाला नयक्षमारहित[19].' ॥ ८१

---

१. सिंहास. २. हरिणबालकासारखा. ३. स्त्री. ४. राजक्रीडा. ५. क्रोध व काम यांचे पीडेनें. ६. मान आहे धन ज्याचें असा. ७. अग्नीनें पेटलेलें गृह. ८. वांचण्यास इच्छिणारें. ९. बिभीषणहि. १०. चार प्रधान. ११. अग्निदग्धसा. १२. शत्रु. १३. वानर. १४. सीताहरणानें क्रुद्ध झालेले हिमाचलाचे पुत्र. १५. सूर्यकुलरूप क्षीरसमुद्रास चंद्र असा राम त्यातें. १६. राजस्त्रीहारकरावणानें टाकिलेला. १७. पापिवियोगें संतुष्ट. १८. रामस्त्री सीता. १९. नीतिक्षमाहीन.

हें जाउनि अ **ज** पौत्र **प्र**[1]भुला प्लवगप्रवीर जाणविती; ।
करुणाब्धी **दा**शरथी, **सु**ग्रीवमतेंकरूनि, आणविती. ॥ ८२
नय बल, ज **य** जीवन, यश, ते, कीं **लं**कादिदेवता प्राण, ।
आले शरण **प्र**भुला; सहाय कीं धाडिले **य**में बाण. ॥ ८३
नेति[2] मज्जन[3] **रा**[4] मकृपान्हदिं करुनि शिरींहि घेति पादरज; ।
**सी**ता[5]हरणदुरितशिखिकवलित **लं**काटवी पलाश गज. ॥ ८४
रजनीचर[6] **म**[7] धुकर भवकाश[8]कुसुमसंगवंचित भ्रमले, ।
भ्रमले, मग गुण[9]गंधाकृष्ट प्रभु[10]पादनीरजीं रमले. ॥ ८५
वंदुनि बद्धां **ज** लि तो **बि**भीषण **क्षो**णिजावरास[11] वदे; ।
'भक्तभ्रमरासि मला स्वपदाब्ज[12]युगार्हणावरासव दे. ॥ ८६
सदयहृद **य** हो देवा ! माझ्याठायीं धरूं नको शंका; ।
रंकास मला तूझे चरण अलंकार हेच ते **लं**का. ॥ ८७
शरणागत **ज** नपाला! पापहरा! दुःखनाशना! चतुरा! ।
धार्मिकसदययशस्विप्राज्ञकवींचा अनर्घ्य[13] तूंच तुरा. ॥ ८८
केवल विष **य** रसिक तो **द**शमुख झाला अमार्गवाटसुर; ।
केले फार उपप्लुत[14] धरणीसुरसंघ, यज्ञवाट[15], सुर. ॥ ८९
त्वद्रत्नतस्करा[16] **रा** ला केला मी बोध फार, आरडलों; ।
अंध[17]भसितबधिरीं तें दीपहवनगीत, कीं वनीं रडलों. ॥ ९०
हित कथितां, **म** ज त्यानें सभेंत अवमानिलें त्रपारहितें[18]; ।
मग तवपदोडुपें[19] हीं झालीं दुःखाब्धि[20]पात्रपारहितें. ॥ ९१
इक्ष्वाकुकुल **श्री** च्या, करुणेच्या पूतकीर्ति[21]च्या सद्मा! ।
रक्षावें मज' ऐसें प्रार्थुनि, वंदी नृपालपदपद्मा. ॥ ९२
**लं**कानगरी **रा** ज्यप्रदानसंकल्प जो तयास हित; ।
हृदयीं धरिला **रा**में **बि**भीषण प्राज्ञ मान्यतासहित. ॥ ९३

---

१. रामाला. २. नमस्कार. ३. स्नान. ४. रामकृपाडोहीं. ५. सीताहरणपापाग्निवेष्टित. ६. राक्षसरूपी. ७. भ्रमर. ८. संसारदर्भपुष्पसंगें फसले असे. ९. गुणसुगंधें ओढिले. १०. रामपदकमलीं. ११. सीतापतीस. १२. स्वपदकमलद्वयपूजारूप सुमकरंद. १३. अमोल. १४. उपद्रवयुक्त. (दुःखित.) १५. यज्ञमंडप. १६. तुझ्या सीतारूपरत्नाचा चोर जो रावण त्याला. १७. आंधळा, भस्म, बहिरा, यांच्या ठायीं. १८. निर्लज्जें. १९. तुझ्या पदनौका. २०. दुःखसमुद्रपात्र तरण्यास हितकर. २१. पवित्रयशाच्या.

सत्वर मग **म**[1] करालयजल आणवुनि, [2]स्वदासनंदिकरें, ।
शरणागतासि केला **लं**काराज्याभिषेक बंधुकरें. ॥ ९४

निजपदभ **ज** नसुकृतफल दाखविलें [3]भक्तकामसंतानें, ।
[4]रविसंतानेंद्रानें, **रा**मानें, [5]साधुवनवसंतानें. ॥ ९५

पुसतां उपा **य** सागरतरणाचा, [6]कैकसीतनूज म्हणे; ।
'नि[7]जपूर्वजकृत सागर विनवीं, देईल मार्ग वीरमणे!' ॥ ९६

कैसें काय क **रा** वें? चिंतित होता असें धरावर जें; ।
तें संकट हरिलेंसें केलें त्या **पं**क्तिकंधरावरजें. ॥ ९७

**सुगला** दिसे **म** तें तो त्यक्ताहार स्वयें [9]कुशास्तरणीं ।
तरणीकुलमणि बैसे, संकल्प करूनि सिंधुसंतरणीं. ॥ ९८

तो निशिचर **ज** नपतिला सांगे जाऊनि दूत शार्दूल; ।
'कपिबल घेउनि आला सिंधुतटीं **राम** [10]भूपशार्दूल. ॥ ९९

काय शिलो[11]च्च **य** आले सहाय **रा**मासि सागर भराया? ।
कीं जलधिशोषणक्षम घन ते झाले [12]प्लवंगनिभ राया.!॥ १००

बल दशयो **ज** नपरिमित सिंधुतटीं उतरलें असे बहुत; ।
जाणों त्याच्या [13]जठरज्वलनीं होतील सर्वलोक [14]हुत. ॥ १०१

झाला कपिना **य** क तो सहाय पूर्णाभिमानसह यातें; ।
गिरिशिखरतरुशिलायुध कपि नाचविती [15]स्वमानसहयातें ॥ १०२

ऐसें ऐकुनि **रा** वण **रा**घवसेनेंत भेद योजाया, ।
**शु**कराक्षसासि सांगे, **सु**ग्रीवाच्या समीप तो जाया. ॥ १०३

त्यास म्हणावें, '**म** जशीं व्यर्थचि करिशी कशास कलहातें? ।
जा मागें, नाहीं तर, मरतां कां माझिया सकल हातें?॥ १०४

**स्वभुजबलें** **श्री** हरिली देवांची, शत्रु जिंकिले सारे; ।
त्यांचा यत्न न चाले प्लवगा! करिशील युद्ध कैसा? रे! ॥ १०५

मी **रा**माची दा**रा** हरिली, तरि काय हे तुझी हानी? ।
[16]हा! निर्बल दुर्मति हो! [17]क्रव्यादें तर्पितां स्वदेहानीं.' ॥ १०६

---

१. समुद्रोदक. २. भक्तानंदकरें. ३. भक्तेच्छाकल्पवृक्षें. ४. सूर्यकुलश्रेष्ठें. ५. साधुवनास वसंतऋतूनें. ६. बिभीषण. ७. आपले पूर्वज जे सगरपुत्र व भगीरथ यांणीं केलेला. ८. रावणबंधु (बिभीषण) त्याणें. ९. दर्भासनीं. १०. राजश्रेष्ठ. ११. पर्वत. १२. वानरतुल्य. १३. जठराग्नींत. १४. दग्ध, भस्मीभूत. १५. स्वमनोरूप घोड्यांतें. १६. हाय. १७. मांसभक्षकें.

**नि**शिंचरर[1] **म** णें ऐसा **सु**ग्रीवातें निरोप सांगाया ।
पाठवितां, **शु**क गेला, तों ओळखिती कपी विहंगा[2] या.॥ १०७

शत्रु शुकादि[3] **ज** रूपी धरूनि, म्हणती, 'खलासि या चिरडा; ।
सत्पीडक राक्षस हो! कृतापराधें मरा, असेचि रडा.' ॥ १०८

तो शुक सदय[4] **य** त्नातें **रा**मानें, दूत म्हणुनि, वांचविला; ।
घेता झाला हाही **र**घुनाथगुणामृताचिया चविला[5]. ॥ १०९

होतां विमुक्त, **रा** क्षस **द**शकंठाच्या कथी निरोपाला; ।
तें ऐकुनियां कपिवर **सु**ग्रीव वदे धरूनि कोपाला. ॥ ११०

'मद्व्यसनश[6] **म** नपटुतें छळिलें दीनाचिया सहायातें; ।
त्या पापविपाकातें[7] युद्धीं सारेचि या सहायातें[8].' ॥ १११

हें बोलुनि, र[9] **ज** नीचर बांधविला, धाडिला न **लं**केला; ।
रात्रित्रयोपवासि**प्र**भुकाम[10] न मूढसागरें केला. ॥ ११२

मग **र**घुना **य** क सोडी प्रखरशरप्रकर[11] सागरामाजी; ।
'शुष्क तुला करितों मी' म्हणे 'अनुज्ञा[12] न मानिली माझी. ११३

त्या बाणगणें **ज** लचर झाले संतप्त ते महाकाय; ।
म्हणती, 'सर्वांबुधिला[13] प्राशितसे वाडवाग्नि[14] हा काय?'॥ ११४

पुनरपि सा[15] **य** क **रा**में चतुर्मुखास्त्राभिमंत्रित[16] प्रखर[17] ।
चापीं नियोजिला, तो वमे मुखें वन्हिचे कणप्रकर[18]. ॥ ११५

ब्रह्मास्त्र साग **रा** च्या करील अर्धक्षणांत आचमना; ।
हें जाणुनि सुर म्हणती, '**रा**मा! येऊ दया तुझ्याच मना.' ११६

ते मुनिजना **म** खव्रज **रा**मातें वर्णिती, जसे बंदी[19]; ।
तों यादोवृंदासह[20] सागर येऊनि नृपतिला वंदी. ॥ ११७

जलधि म्हणे, '**श्री**रामा ! मी ब्रह्मास्त्रापुढें जसा बिंदू; ।
बंधु तुझा सागर, हें जाणुनि, रक्षीं मला दयासिंधू !॥ ११८

---

१. रावणें. २. पक्ष्या. ३. पोपटपक्ष्याचें रूप धरणारा. ४. दयायुक्त मन ज्याचें अशा (रामानें.) ५. गोडीला. ६. माझ्या दुःखनाशाविषयीं कुशल अशा रामातें. ७. पापाच्या परिणामातें. ८. सहन करण्यास. ९. शुक राक्षस. १०. त्रिरात्रोपवासी राम त्याची इच्छा. ११. तीक्ष्णबाणसमूह. १२. आज्ञा. १३. सर्वसमुद्राला. १४. वडवानल. १५. बाण. १६. ब्रह्मास्त्रमंत्रित. १७ तीक्ष्ण. १८. ठिणग्यांचे समूह. १९. भाट. २०. जलचरसमूहासह.

त्वां मिथ्या न क **रा** वी मर्यादा जे विनिर्मिली **वि**धिनें[1]; ।
तरशील सबल[2] मातें हर्षानें, मी वदेन त्या विधिनें.' ॥ ११९

**राम** म्हणे, 'हा **म**[3] च्छर अमोघ[4] सोडावयासि दे जागा[5]; ।
जा गा ! शोषित नाहीं, समयीं झालासि तूं बरा जागा[6].' १२०

सिंधु म्हणे, 'म **ज** शिवती द्रुमकुल्यस्थानवासि[7] चोर सदा; ।
असदाचारकरांतें[8], त्यांतें, तूं मार साध्वसाध्वसदा[9] !' ॥ १२१

**रा**मानें, तो सा **य** क सोडुनि, वधिले सतंस्कराभीर[10]; ।
**व्र**णकूप त्यास म्हणती, जें बाणें छिद्र होय गंभीर. ॥ १२२

तें **म**रुकांता **रा** ल्य, द्रुमकुल्यस्थान जाहलें अवन[11]; ।
त्या देशाचें केलें परि, वर देऊनि, **रा**घवें अवेन[12]. ॥ १२३

जलधि म्हणे, '**र**[13] घुनाथा ! **न**लवानर ठावुका असे तूतें; ।
हा **वि**श्वकर्मनंदन[14] करील माझ्या जलांत सेतू[15] तें. ॥ १२४

त्या **न**लकरें **ज** लांतीं पडेल वृक्षोपलादि[16] जें कांहीं; ।
तें म्यां धरिजेल शिरीं, त्वत्पदरज जेंवि भक्तलोकांहीं. ॥ १२५

निजशत्रुक्ष **य** करिशिल, मज तरशिल, तारिशील लोकास; ।
सज्जनसह मज्जन[17] तुज होइल सुखसागरीं विशोकास[18].' ॥ १२६

**र**घुपतिला **ज** लधीनें सांगुनि उतरावया उपाय नतें[19], ।
चरणीं समर्पिलें, जें होतें सद्रत्नमय, उपायन[20] तें. ॥ १२७

**रा**मपदद्व **य** वंदुनि, सिंधु म्हणे, 'तूं करून सेतु जला, ।
उतरुनि जा **लं**केला, दुर्घट कांहींच हें नसे तुजला.' ॥ १२८

जलनिधिला **रा** घव तो आज्ञा देऊनियां, **न**लाकरवीं ।
करवी सेतु समुद्रीं **भा**स्करसंतानपंकजैकरवी[21]. ॥ १२९

सर्वनृपोत्त **म** वाक्यें, द्विनव[22] महापद्म ऋक्ष[23] वानर ते ।
सेतु कराया जाती, अशनीं[24] कोणीहि तेधवां न रते. ॥ १३०

---

१. ब्रह्मदेवानें. २. ससैन्य. ३. माझा बाण. ४. निष्फल न होणारा. ५. स्थान. ६. जागृत. ७. वृक्षयुक्त लहान जी नदी तेथें रहाणारे. ८. वाईट आचरण करणारे. ९. साधूंस अभय देणारा. १०. चोरांसह कोळी. ११. निर्जल. १२. रक्षण. १३. रामा. १४. विश्वकर्म्याचा पुत्र. १५. पुलातें. १६. वृक्षपाषाणादि. १७. स्नान. १८. शोकरहितास. १९. नम्रें. २०. नजराणा. २१. सूर्यकुलरूप कमलाचा सूर्य. २२. अठरा. २३. आस्वल. २४. भक्षणीं.

ताल, तमाल, **श्री** फल, वट, सरलाश्वत्थ, नारिकेर [1]नग; ।
　　　　वानरकरें समुद्रीं पडले, शिखरें, शिला, कितेक [2]नग.॥ १३१

[3]तृणतरुध　**रा** धरांतें वाहति [4]पवनात्मजादि कपि सारे; ।
　　　　ते **न**लपाणिस्पर्शें तरति समुद्रोदकांत [5]तरिसा रे. ॥　१३२

तो सेतु प्रथ **म** दिनीं चवदा [6]गांवें, दिनांतरीं वीस; ।
　　　　मग एकवीस, बेविस, पंचम दिवशीं समाप्त तेवीस. ॥ १३३

एवं शतयो **ज** न तो [7]आयत, वि[8]स्तीर्णही दहा गांवें; ।
　　　　गावें चरित्र विभुचें, अद्भुत हें कर्म काय सांगावें? ॥ १३४

[9]शतयोजना　**य** ताद्भुत सेतू दशयोजनेंहि विस्तीर्ण, ।
　　　　[10]द्विनव महापद्म कपी झाले त्रिदिनें [11]समुद्रनिस्तीर्ण. ॥　१३५

सेतुपथें पा **रा** ला उतरुनियां पावले [12]सुवेला [13]ते; ।
　　　　वि[14]भुनुतिपरसुरमुनिजनहृदयाला हर्षवी [15]सुवेला ते. ॥　१३६

सर्वप्लवंग　**म** बलें वेष्टुनि बसती [16]**सु**वेलनगराजा; ।
　　　　[17]**रा**मनिदेशें सोडुनि **सु**ग्रीव म्हणे **शु**कास, 'नगरा जा.' १३७

तो **शुक**, मनु **ज** पतीतें वंदुनि, गेला **द**शाननापाशीं; ।
　　　　नमुनि म्हणे, 'मी जाउनि सांपडलों वानरांचिया [18]पाशीं.॥ १३८

हा [19]वरुणाल **य** दुस्तर, परि निर्मुनि सेतुला [20]शिलांतरुनीं, ।
　　　　अगणित कपिबल घेउनि, आला **र**घुवीर, सिंधुला तरुनी. १३९

कपि, रुक्ष ते, **ज** से गिरि तेंवि महाकाय, फार बळकट कीं; ।
　　　　[21]भूरुहपर्वतशिखरें ऐशीं हीं आयुधें प्रबळ [22]कटकीं. ॥　१४०

सकल [23]प्रल **य** ज्वलनप्रतिम [24]प्लवंगप्रवीर बहुसंख्य; ।
　　　　त्या **अं**तकतुल्यांसह न घडे देवासुरांसही [25]संख्य. ॥　१४१

**दा**शरथी वी[26]**रा** धिप, त्यासम कोणी नसे तुलायाला; ।
　　　　[27]यांलागिं **रा**क्षसेंद्रा! युद्धेच्छा हे नसो तुला [28]यांला. ॥ १४२

---

१. वृक्ष. २. पर्वत. ३. तृण, वृक्ष व पर्वत यातें. ४. मारुती आदिकरून. ५. नौकेसारखे. ६. योजनें. ७. लांब. ८. रुंद. ९. शंभर योजनें लांब व अद्भुत. १०. अठरा. ११. समुद्रपार. १२. पर्वतविशेष. १३. रामासह वानर. १४. रामस्तुतिपर जे देव व ऋषि त्यांच्या मनाला. १५. उत्तम वेला. १६. सुवेल पर्वतराजा. १७. रामाज्ञेनें. १८. पाशांत. १९. समुद्र. २०. पाषाण-वृक्षांहीं. २१. वृक्ष व पर्वतशिखरें. २२. सैन्यांत. २३. काळाग्नितुल्य. २४. वानरश्रेष्ठ. २५. युद्ध. २६. वीरश्रेष्ठ. २७. वास्तव. २८. रामाला.

रघुनाथाची **म** हिषी सोडावी, हेंच मूल कलहाला; ।
हा लाभ मुख्य **रा**मप्रीतिसुधा पी, त्यजीं विषयहाला[1].'॥ १४३

वरसामर्थ्य **श्री** मदमत्त **द**शानन म्हणे, '**शु**का! मातें ।
दे **सी**ता हें कथितां त्रिदिवेश[2] न पावतील कामातें[3].॥ १४४

वानरसख **रा** घव नरसगररचितनीरकुंड[4] तरला हो! ।
अप्रतिम मद्बलार्णव जरि लंघिल तो, जयास तर लाहो[5]. १४५

मूर्ख सकळ **म** र्कट ते झाले बहुमत्त सेवितां पाला; ।
आले मरावयाला, नेणुनि माझ्या महाप्रतापाला.' ॥ १४६

यापरि तो र **ज** नीचर वदोनि, शुकसारणांसि[6] लवलाहें ।
आणुनि, म्हणे, 'पहा जा कपिवंश फलें करूनि लवला हें.'॥

निजहस्तद्व **य** जोडुनि, **शु**क**सा**रणनाम ते सचिव राया ।
वंदुनि, वानररूपें गेले कीं बंधनासचि वराया. ॥ १४८

वानररूपें **रा** क्षस शिरले कपिसैन्यसागरीं कपटी; ।
श्रोत्रियसभेंत[7] जैसे यवन, मुनिव्याज[8] धरुनि, वल्कपटी[9].॥ १४९

राक्षस कृत्रि **म** फिरती वानरकटकीं जसे प्लवंगपती; ।
त्यांस **बि**भीषण बांधी; श्वान कसे सिंहमंडळीं लपती?॥ १५०

**द**शकंठानु **ज** वाक्यें, बांधुनियां, ताडिती कपी सारे; ।
म्हणती, 'तुम्हीं अमंगल हरिवेष[10] विटाळिलात कैसा? रे!' १५१

त्याहीं स्वाभिप्रा[11] **य** **प्र**मुखा कथितां, करूनि नमनातें; ।
रक्षी त्यांसि दयार्णव **रा**घव, ज्याच्या विकार न मनातें.॥ १५२

तेव्हां रघुरा **ज** म्हणे, '**बि**भीषणा! यांसि हिंडवा कटकीं[12]; ।
मग सोडा, दूतांला वधितां अत्यंत धर्मसंकट कीं.' ॥ १५३

ग्रामांत लुला[13] **य** जसे, देवि[illegible]र्थ फिरविती लोक; ।
सैन्यांत हिंडवुनि ते विसर्जिले दूर, ज्यापरी ओक[14]. ॥ १५४

कटकीं **र**घु **रा** ज सदा सुखी, यशस्वी असो महाकाय; ।
दृग्दोष[15] न हो, म्हणउनि, ओंवाळुनि सांडिले पशू काय? १५५

---

१. विषयरूपी विष. २. देव. ३. इच्छेतें. ४. मनुष्य जे सगर त्यांनीं केलेल्या उदककुंडास (समुद्रास.) ५. पावो. ६. प्रधानविशेष त्यांतें. ७. ब्राह्मणसभेंत. ८. ऋषिवेष. ९. वल्कलवस्त्रधारी. १०. वानररूप. ११. स्वमत. १२. सैन्यांत. १३. रेडे. १४. वमन. १५. दृष्टिरूप दोष

शुकसारण **म** ग जाउनि, करिति [1]स्वस्वामिला नमस्कार; ।
कथिती वानरकटकीं जो झाला आपणासि [2]संस्कार. ॥ १५६
म्हणती, 'सिं[3]धु **श्री** मदतस्कर कपिसैन्य तें असंख्यात; ।
ज्यांत **र**घूत्तमलक्ष्मण**सु**ग्रीव**बि**भीषणादि विख्यात.' ॥ १५७
ऐसें ऐकुनि, **रा** वण तो [4]प्राकारीं चढोनियां पाहे; ।
तों दाविली तयानें वानरसेना समुद्ररूपा हे. ॥ १५८
आले रणार्थ **म** जशीं, सिंहाशीं आज [5]वाजिचे रिपुसे; ।
त्यांचीं नांवें संख्या, सांगा हें त्यांसि तो [6]सुरारि पुसे. १५९
तेव्हां सचिव **ज** से जे विलोकिले आणि ऐकिले होते; ।
जवळ उभे ठाकुनियां, **द**शवदनाला निवेदिती हो! ते. ॥ १६०
'[7]कपिकोटित्र **य** नायक **ग**जनामा पातला असे वीर; ।
दुसरा **श**तबलि वानर आलासे [8]अयुतकोटिबल धीर. ॥ १६१
आला आहे [9]**ता रा** जनक **सु**षेणाख्य **वा**लिचा [10]श्वशुर; ।
बल तीन कोटि ज्याचें, निर्बल ज्याच्या पुढें रणांत सुर. १६२
जो दुर्मुखना **म** कपी, त्याचीही दोन कोटि कीं सेना; ।
**द**धिमुख दशकोटिपती, दुःसह कांहीं तयास भासेना. ॥ १६३
[11][12]पवनतनु **ज** तो आला [12]सहस्रकोटिप्लवंगबलपाल; ।
अकरासहस्र सेना **रं**भाची, जो समस्तरिपुकाल, ॥ १६४
देवासुरभ **य** दायक **न**ल कपि, बलही सहस्रशतकोटी; ।
जेणें सेतु विनिर्मुनि, सेना संतारिली अशी मोठी. ॥ १६५
[13]शाखामृगकुं **ज** र तो **नी**लहि शतकोटिसंख्यसैन्यपती; ।
चाळीस लक्ष सेना **श**रभाची, जीपुढें गिरी लपती. ॥ १६६
**कु**मुद **ग**व **य** **व**न्हि असे, तीन असंख्यातसैन्यपति वीर; ।
[14]दशकोटिऋक्षनायक, आला **जां**बवान् महाधीर. ॥ १६७
कपिवर [15]**तों** **रा** भिधही आलासे [16]पंचकोटिबलशाली; ।
**अं**गदसेना दशशत पद्में, आणीक [17]शंकुशत आली. ॥ १६८

१. आपला यजमान रावण याला. २. बंधनताडनादि. ३. समुद्राचा गर्व हरण करणारें. ४. कोटावर. ५. घोड्याचे शत्रु जे रेडे त्यांसारखे. ६. देवशत्रु. (रावण). ७. तीन कोटी वानरांचा स्वामी. ८. दहाहजार कोटि सैन्य ज्याचें असा. ९. तारेचा पिता. १०. सासरा. ११. वायुपुत्र. (मारुति). १२. सहस्रकोटिवानरसेनेचा पति. १३. वानरश्रेष्ठ. १४. दहाकोटि आस्वलांचा पति. १५. वानरविशेष. १६. पांच कोटि सैन्यें करून शोभणारा. १७. शंभरशंकु.

जो [1]पनसाख्य **म**हाबल, त्याचेंही तीनकोटि कपिसैन्य; ।
[2]ऋक्षसहस्रयुगाधिप **धू**म्र, सुरांलाहि ज्यापुढें [3]दैन्य. ।। १६९
कोटिसहस्रें **श्री**मान् वीर **ह**नूमत्पिता स्वयें आला; ।
[4]कपिकेसरी महात्मा, नाम असे **के**सरी असें ज्याला. ।। १७०
बहुबल **ता** **रा**भिध तो, **सु**ग्रीवश्वशुरही [5]रुमातात; ।
त्याचे कोटि[6]त्रियमित कपि गमनें भूमिकंप करितात. ।। १७१
शौर्य[7]बलोद्दा **म** महा धीर **ग**वाक्ष प्रतापमय शूर; ।
कोटिसहस्र तयाचे आले आहेत **इं**द्रसम शूर. ।। १७२
कोटिसहस्र **ज** याची सेना, नामें **द**रीमुख ख्यात; ।
**मैं**द **द्वि**विदहि बंधू आले, ज्यांची चमू असंख्यात. ।। १७३
**रा**घवसहा **य** आला, घेउनियां प्लवगसैन्य शत कोटी; ।
वीर [8]**म**रुण्वान बली, जयापुढें [9]ईक्षुतुल्य [10]शतकोटी. ।। १७४
जो वीर वान **रा**धिप नामानें **गं**धमादन प्रबल, ।
द्वादशसहस्रकोटी त्याचें आलें असे प्लवंगबल. ।। १७५
[11]शाखामृगर **म**ण बली, नामें जो **इं**द्रभानु तो राया ! ।
एकादशकोटीपति आलासे राक्षसांसि माराया. ।। १७६
**श्वे**त महाभु **ज** आला, सहस्रकोटि प्लवंगबल याचें; ।
कपि आठलक्ष आणिक, मर्दन करितील भूमिवलयाचें. १७७
**क्रो**धन नामा **य** तें आला, नृपकार्यसिद्धिचा [12]घटक; ।
त्याचें [13]पर्वतशिखरप्रहरणधरसाठलक्ष कीं कटक. ।। १७८
**र**घुपतिवि **ज** यासाठीं, सहस्रलक्षप्लवंगबल राजा ! ।
आला असे **प्र**माथी **रा**माची सोडवावया [14]भाजा. ।। १७९
विक्रमनिल **य** महात्मा **स**न्नादन आणि दूसरा **चं**ड; ।
या दोघांचें आलें, प्रचंड सैन्य प्रसिद्ध ऊदंड. ।। १८०
**विं**ध्यगिरिव **रा** वासी यूथपती फार वीर आहेत; ।
हे तरुनि सिंधु आले, युद्धाचा धरुनि मानसीं हेत. ।। १८१

---

१. पनसनामक. २. दोन हजार अस्वलांचा पति. ३. दीनता. ४. वानरश्रेष्ठ. ५. सुग्रीवस्त्री रुमा इचा पिता. ६. तीनकोटिपरिमित. ७. शूरत्वबलेंकरून उन्मत्त. ८. नामविशेष. ९. उंसासारखें. १०. इंद्रवज्र. ११. वानरपति. १२. घडविणारा. १३. पर्वतशिखररूप आयुधधारी. १४. स्त्री.

**सुग्रीवाचा सु म** ति प्रधान संख्ये करूनि शतवृंदें[1]; ।
शंकुसहस्र अणीकहि, सहस्रकोटिप्लवंगजनवृंदें. ॥ १८२

बलनिलय[2], **श्री** मंत, प्रवीर सारे सहाय रामाचे; ।
राया ! हे देवांश, प्लवंग मात्र प्रसिद्ध नामाचे. ॥ १८३

राक्षससेना **रा** जा ! सहस्रशत[3] लक्ष, तेहि शत कोटी; ।
दशशतकोटिशतातें[4] संज्ञा शंकू अशी असे मोटी. ॥ १८४

गणकजन[5] **म** तें ऐसें परिगणितां[6] उत्तरोत्तर प्राज्ञा ! ।
संज्ञा होती नव[7], त्या कथितों स्वामी! असेल जरि आज्ञा. १८५

रजनीचर[8] **ज** ननाथा ! एक महाशंकु[9] बोलती सर्व; ।
वृंदें[10], महावृंद[11], तसे पद्म[12], महापद्म[13], खर्व[14], अतिखर्व[15]. ॥ १८६

पहिलाच नि **य** म धरुनी, समुद्र[16], अणखी महौघ[17] हीं नामें; ।
कोटीपासुनि सारीं अकरा[18] होताति गणकविश्रामें[19]. ॥ १८७

**मंदोदरीव रा** ! तूं यावरुनि प्लवगवाहिनीसंख्या ।
ध्यानामध्यें धरणें, मग करणें तरि सुखें करीं संख्यां[20].॥ १८८

आले असती **म** र्कट सहस्रकोटी सहस्रशंकु तसे; ।
पंक्ति[21]शत महाशंकू, शतवृंदेंही महागिरींद्र जसे. ॥ १८९

---

१. संख्या. २. बलस्थान. ३. संख्येविषयीं मूळ वाल्मीकिरामायणांत असे श्लोक आहेत—'शतं शतसहस्राणां कोटिमाहुर्मनीषिणः । शतं कोटिसहस्राणां शंकुरित्यभिधीयते ॥ शतं शंकुसहस्राणां महाशंकुरिति स्मृतः । महाशंकुसहस्राणां शतं वृंदमिहोच्यते ॥ शतं वृंदसहस्राणां महावृंदमिति स्मृतम् । महावृंदसहस्राणां शतं पद्ममिहोच्यते ॥ शतं पद्मसहस्राणां महापद्ममिति स्मृतम् । महापद्मसहस्राणां शतं खर्वमिहोच्यते ॥ शतं खर्वसहस्राणां अतिखर्वमिति स्मृतम् । अतिखर्वसहस्राणां शतं समुद्रमुच्यते ॥ शतं समुद्रसाहस्रं महौघमिति विश्रुतम्॥' (स०२८ श्लो०३३-३७). रामायणाच्या छापी पुस्तकांत अतिखर्व संज्ञा नाहीं. परंतु मोरोपंतांचे वेळीं ती त्या पोथींत असावी असें दिसतें. कारण ती सोडली तर कोटीपासून महौघापर्यंत अकरा संज्ञा होत नाहींत. एकापासून महौघ हें अठ्ठावन्नावें स्थान येतें. ४. एकलक्ष कोटि म्ह० शंकु. ५. ज्योतिष्यांचे मतें. ६. गणने-करितां. ७. नऊ स्थानें. ८. राक्षसांच्या राजा रावणा. ९. एकलक्ष शंकु म्ह० महाशंकु. १०. एक-लक्ष महाशंकु म्ह० वृंद. ११. एकलक्ष वृंद म्ह० महावृंद. १२. एकलक्ष महावृंद म्ह० पद्म. १३. एकलक्ष पद्म म्ह० महापद्म. १४. एकलक्ष महापद्म म्ह० खर्व. १५. एकलक्ष खर्व म्ह० अतिखर्व. १६. एकलक्ष अतिखर्व म्ह० समुद्र. १७. एकलक्ष समुद्र म्ह० महौघ. १८. कोटि, शंकु, महाशंकु, वृंद, महावृंद, पद्म, महापद्म, खर्व, अतिखर्व, समुद्र, व महौघ हीं अकरा स्थानें. १९. ज्योतिष्यांच्या विश्रांतीचीं स्थानें. २०. युद्धा. २१. दहा.

आणिकही तु **ज** कथितों, सहस्र आलीं प्रभो महावृंदें;।
शतपद्मेंही दिक्[1]शत, गणित महापद्मसंख्य कपिवृंदें. ॥ १९०

शतखर्वें ज **य** शाली सहस्र तैशींच कीं महाखर्वें;।
कोटि, समुद्र, महौघहि, कोटि अशीं पातलीं बलें गर्वें.॥ १९१

[2]रवितनया **ज** न्हुसुता**सिंधुवि**पाशादि**फल्गुपर्णा**शा;।
ऐशा सरिता त्यजिल्या कपिंनीं, जैशी [3]फलांबुपर्णाशा.॥ १९२

[4]सह्यहिमाल **य मंदरकनका**चल**पा**रियात्र**कै**लास;।
इत्यादि गिरिस्थानें सोडुनि, आले **त्रि**[5]कूटशैलास. ॥ १९३

[6]दंतरश **रा** सनासिप्रखरेषुधरप्रचंडदोर्दंड;।
कोदंड[7]वेदपंडित, ते **दा**शरथी [8]प्रतापमार्तंड. ॥ १९४

तूझा अनुज **म** हात्मा, शरणागत, सुज्ञ, म्हणुनि **रा**मानें,।
लक्ष्मण **सु**ग्रीवासम मानुनि, सत्कारिला वरा मानें. ॥ १९५

क्षीरसमुद्रें **श्री** तें अर्पुनि केला **मु**कुंद [9]जामाता;।
[10]भूमिपते ! **रा**माला **सी**ता दे हेंहि [11]भूमिजा माता. ॥ १९६

हा कलह ब **रा** नाहीं, ज्याची स्त्री, त्यास दे समाधानें;।
निर्भय राज्य करावें **लं**केचें [12]राघवानुसंधानें.' ॥ १९७

हें ऐकुनी, [13]अ **म** र्षें तो **रा**वण पातकी दुरभिमानी।
मानी सचिवासि रिपू, स्वहितकरालाहि फार अवमानी.॥ १९८

'दाखवितां म **ज** ला भय, नरवानर [14]वर्णितां, जसे बंदी;।
घालीन मी, न धरितां परवा, परवाहिनीस त्या [15]बंदी.' १९९

ऐसा [16]रक्षोना **य** क वदोनि, वर्जी निजप्रधानातें;।
कपिसेना शोधाया, धाडी [17]शार्दूलयातुधानातें. ॥ २००

**शा**र्दूल नाम **रा** क्षस **रा**वणवाक्यैंकरूनियां, [18]चार।
चार सर्वे घेउनियां, करी कपींच्या बलांत संचार.॥ २०१

---

१. दहा. २. यमुना, भागीरथी, सिंधु, विपाशा, फल्गु, पर्णाशा, इत्यादि. ३. फल, उदक व पाला यांची आशा. ४. सह्याद्रिपर्वत. ५. त्रिकूटपर्वतास. ६. बळकट धनुष्य, खड्ग, व तीक्ष्ण बाण यांस धारण करणारे भयंकर आहेत भुजदंड ज्यांचे असे. ७. धनुर्वेदज्ञ. ८. प्रतापसूर्य. ९. जांवई. १०. हे·राजा रावणा. ११. पृथ्विकन्या. १२. रामानुमतें. १३. क्रोधें. १४. वर्णितां. १५. बंधांत. १६. राक्षसराजा, (रावण). १७. शार्दूलनामक राक्षसातें. १८. दूत.

सैन्यसमुद्रा **म** ध्यें शिरला **शार्दूल** तो विशंक बली; ।
तें जाणुनियां त्यांतें **बि**[1]भीषणग्राह तेधवां कवळी. ॥ २०२
सोडवितां **अ**[2] **ज** पौत्रें, सांगे **द**शकंधरासि बोभाट; ।
[3]वानरऋक्षपतीतें, वर्णी **शार्दूल**, जेंवि तो भाट. ॥ २०३
[4]तरणितन **य** **सु**ग्रीव प्लवंगराजा स्वयें प्रतापरवी; ।
[5]परवीर्यनाशनक्षम, सैन्योद्योग स्वयेंचि जो करवी. ॥ २०४
[6]अनलतनु **ज** [7]**नी**लाभिध, [8]**गी**ष्पतिसुत **तार** वीर **म**तिमंत; ।
**प**र्जन्यपुत्र **शरभ**, **प्र**[9]भंजनाचा [10]तनूज **ह**नुमंत. ॥ २०५
कपि [11]**आश्विने** **य** नंदन **मैं**दाभिध एक, दूसरा **द्वि**विद; ।
**न**ल **वि**श्वकर्मसुत तो, जाणतसे शिल्पकौशलें विविध.॥२०६
**ज्यो**तिर्मुख [12]**सू** **रा** चा सुत, दुसरा **श्वे**तनाम रणदक्ष; ।
[13]**वै**वस्वतज **गवय**, **गज**, **गवाक्ष**, यांचीं बलें बहुतलक्ष.॥२०७
**द**धिमुख [14]**सो** **म** स्वात्मज, **सु**षेण अणि **हे**मकूट **व**रुणाचे; ।
**वि**धि[15]पुत्र **जां**बवंत [16]प्रवया, परि संघ वधिल तरुणांचे.॥२०८
प्लवगवर [17]**श्री** दात्मज, बलशाली **गं**धमादन ख्यात; ।
**अं**गद [18]महेंद्रनप्ता, आणिक [19]यूथेंद्र कपि असंख्यात.॥ २०९
आले, युद्ध क **रा** या राया ! ऐसे कितेक कपिवीर; ।
[20]नीरधिला गो[21]तर्णकपद गणिलें; उतरले महाधीर. ॥ २१०
**य**मसम स **म** रसमर्थ, [22]प्लवंगबल उतरलें, असे नि[23]कट; ।
प्रकट वि[24]कट [25]कटक गमे, प्राशिल सिंधूसि या पुरीसकट.' २११
ऐसें **शार्दूल** **ज** सा वदला तें ऐकतांचि [26]**द**शतुंड, ।
[27]कुंडप्रतिमाक्ष धरी मति **सी**तावंचनार्थ [28]उदंड ॥ २१२
तो **द**शमुख **य** त्वानें **वि**[29]द्युज्जिव्हासि शिकउनी माया, ।
आज्ञा करी त्वरेनें [30]राघवकोदंडतुंड निर्माया. ॥ २१३

१. बिभीषणनक्र. २. अजराजाचा नातु राम यानें. ३. वानर व आस्वल यांच्या पतीला. ४. सूर्यपुत्र. ५. शत्रुप्रतापनाशास समर्थ. ६. अग्निपुत्र. ७. नीलनामा. ८. बृहस्पतिपुत्र. ९. वायूचा. १०. पुत्र. ११. अश्विनीकुमारांचा पुत्र. १२. सूर्याचा. १३. यमपुत्र. १४. चंद्रपुत्र. १५. ब्रह्मपुत्र. १६. स्थविर, वृद्ध. १७. कुबेरपुत्र. १८. इंद्राचा नातु. १९. कळपाचे स्वामी. २०. समुद्राला. २१. गोवत्सपद. २२. वानरसैन्य. २३. समीप. २४. भयंकर. २५. सैन्य. २६. रावण. २७. अग्निकुंडतुल्यनेत्र. २८. बहु. २९. रावणाचा प्रधान साला. ३०. रामाचें धनु आणि मुख.

विद्युज्जिह्वक **रा** नें करउनि विभुचापवदन मायावी[1] ।
गेला **सी**तेपाशीं, कीं स्ववशाला वधूत्तमा[2] यावी. ॥ २१४

**सी**तेसि म्हणे, '**म** जला आतां तरि **जा**नकी ! स्वयें वर हो[3]!; ।
वैर[4] होता, तो वधिला. मत्संगें धन्य तूं महीवर हो. ॥ २१५

माझ्या सचिवें **ज** लनिधितीरीं वधुनी प्लवंगसेनेला, ।
**मा**रुतिसुग्रीवासह, **रा**घव तूझा यमक्षया[5] नेला. ॥ २१६

बहु कीशक्षय[6] **य** केला, रात्रीं जाऊनियां प्रहस्तानें[7]; ।
**ल**क्ष्मण पळोनि गेला; **रा**म तुझा मारिला स्वहस्तानें.'॥२१७

यक्षवरानु **ज** ऐसें सांगुनि, विकला करी धैरा[8], बा! हे; ।
बाहेर असुर होता, त्याला धाडूनि राक्षसी बांहे[10]. ॥ २१८

**वि**द्युज्जिह्व शें[11] **य** पुटीं घेउनि ये **रा**मवदनचापाशीं. ।
दशकंठाज्ञेनें[12] स्थापी **र**घुवीर युवतिच्या[13] पाशीं. ॥ २१९

**सी**तेसि म्हणे **रा** वण, 'पहा पुढें तन्वि[14]! सुभ्रु[15]! मृगनयने! ।
नय[16] नेणसि आतां तरि, नाशाला आपुलाचि अविनय[17] ने. ॥

**सी**ते! त्वत्पति **म** स्तक हें, कार्मुक हें; पहा खरें लटकें; ।
हठ केंवि करिशि मुग्धे[18]! भज मज, मर्दीन पंचशरकटकें[19].' ॥

ऐसें ऐकोनि, **श्री सी**ता पाहे स्वकांततुंडातें[20]; ।
तों उद्दीपन झालें, बहु तीच्या शोकवन्हिकुंडातें[21]. ॥ २२२

'हा! **र**घुवर! **रा** जमणे! हा! प्रिय! हा! प्राणनाथ! हा! कांत! ।
**कै**केइ! हो सकामा,' ऐसा करि भूम्यपत्य[22] आक्रांत. ॥ २२३

तों विपरीत **म** ती खल, मंत्रार्थ[23] निमंत्रिलें[24] प्रधानाहीं; ।
'हित अमृत पाजितां', निज सचिवांस म्हणे, 'तृषा क्षुधा नाहीं.'

**द**शकंधर **ज** ननी जे, नामानें **कै**कसी[25] तिणेंहि तदा; ।
केला बोध सुताला; परि त्याला भासली न ते हितदा[26].॥२२५

---

१. कपटी. (रावण.) २. स्त्रियांत उत्तम सीता. ३. अहो. ४. पति. ५. यमसदनाला. ६. वानरनाश. ७. रावणाचा मुख्य प्रधान. ८. कुबेरबंधु. (रावण.) ९. पृथ्वी. १०. बोलावी. ११. हस्ततलीं. १२. रावणाज्ञेनें. १३. रामस्त्रीच्या. १४. हे सुकुमारी. १५. सुंदर भ्रुकुटी जीच्या असी. १६. नीति. १७. उद्धतपणा. १८. हे सुंदरि. १९. मदनसैन्यें. २०. स्वपतिमुखातें. २१. शोकाग्निकुंडातें. २२. भूमिकन्या. २३. मसलतीकरितां. २४. बोलाविला. २५. विश्रवामुनीची स्त्री. २६. हित करणारी.

वृद्धामात्य[1] न **य** ज्ञ प्राज्ञ यशस्वी अविद्ध[2] जें बोधी[3]; ।
तो धीमंद[4] दशानन, तें मानीनाचि सज्जनविरोधी[5]. ॥ २२६

हितकर ब **रा** प्रहस्तप्रधान कल्याणहेतु जें बोले; ।
तो लेशही न मानी; नीरनिमग्नोपलासवें[6] तोले[7]. ॥ २२७

रावणमाता[8] **म** ह बहु हितकारी माल्यवंत उपदेशी; ।
'दे सीतेशि' म्हणे, परि, न गणी तो मूढ मृत्युविपदेशी[9]. ॥

रावण जातां **जं**[10] गतीसुतेजवळि ये निशाचरी सरमा[11]; ।
सरें[12] मार्गी तृषिताला, तशि झाली कीं अकिंचनास[13] रमा[14].२२९

'रामांगने[15]! प्रि **य** सखि! स्वस्था हो, शोक हा विसर, माते! ।
आहे सुखी रघूत्तम,' ऐसें सांगे यथार्थ सरमा ते. ॥ २३०

'रामशिरोंबु[16] **ज** आहे, सौमित्र्यूरुसंगपीठतलनिष्ट[17]; ।
यमुनानदीप्रवाहीं इंदीवरसें[18] तयासि न अनिष्ट. ॥ २३१

कोदंड हि[19] अ **य** थार्थचि गेलें, सखि! तेथवांच विलयातें[20]; ।
ऐशीच रावणाची गति होत्ये; कोण वांचविल यातें? ॥२३२

सौमित्रिसर्प[21] **रा** जत्रातदयानंदबलनिधानातें, ।
नज्ञातांजनमंत्रक[22] पावेल कसाचि सन्निधानातें[23]? ॥ २३३

रघुकुलर[24] **म** णभुजगभुजवेष्टितकोदंडचंदनास कसा? ।
क्षुद्र अमंत्रज्ञ[25] करें शिवतां न मरेल असुर[26] वेडुकसा. ॥ २३४

मुदित असे **श्री** रघुपति; चिंता कांहीं करूं नको, पांहीं; ।
दशकंठ भस्म होतो, तुमच्या या अभ्यनूनकोपांहीं[27]. ॥ २३५

आज्ञा मला क**रा** वी, रामाच्या आणितें समाचारा; ।
अप्रतिहतगति[28] आहें तूझ्या ठायीं सखीसमाचारा[29].' ॥ २३६

---

१. वृद्धप्रधान. २. प्रधानविशेष. ३. उपदेशी. ४. बुद्धिमंद. ५. साधुशत्रु. ६. उदकांत बुडलेल्या दगडाशीं. ७. साम्यता पावे. ८. आईचा बाप. ९. मृत्युविपत्तीस. १०. सीतेजवळ. ११. बिभीषणस्त्री. १२. सरोवर. १३. दरिद्र्यास. १४. लक्ष्मी. १५. सीते. १६. शिरकमल. १७. लक्ष्मणाच्या मांडीरूप आसनावर बसलेलें. १८. कमलसें. १९. धनुष्यहि. २०. नाशातें. २१. लक्ष्मणशेषरक्षित जो दया आनंद व बल यांचा ठेवा (राम) त्यातें. २२. न जाणिला आहे अंजनमंत्र जेणें असा. २३. उत्तम ठेव्यातें. २४. रामाचे सर्पतुल्य भुजें वेष्टित धनुचंदनास. २५. मंत्र न जाणणारा. २६. राक्षस. २७. अग्निपेक्षां उणें नव्हे जे कोप त्यांनीं. २८. अकुंठगति. २९. सखीसारखा आचार जीचा अशी.

ऐसें ऐकोनि **म**[1] हीसुता, म्हणे धरुनि धीर **स**रमेला; ।
जा शोधीं, काय बरें करित असे? तो खलाग्रसर[2] मेला.' ॥
ते **स**रमा रां[3] **ज** सुतावाक्यें जाऊनि, सचिव लोकांनीं ।
बोध विफळ केला तो, येउनि सांगे सखीचिया कानीं. २३८
'सरसिजन[4] **य** ने! तुजला, अर्पायालागिं **रा**मचंद्रकरीं, ।
सचिवाहीं कथिलें; परि, राक्षस म्हणतो, 'कदापि हें न करीं.'
समर चि क **रा** वयाला, दुर्गबला[5]सहित जाहला सज्ज; ।
सज्जनपीडक परि, तो 'मरेल' हा शब्द सुज्ञपरिषज्ज[6]. ॥ २४०
इच्छितसे स[7] **म** रगरल, हितवागमृतींहि[8] न रुचि, राक्षस हा; ।
रुचिराक्ष[9] सहाय तुझा, भय न धरीं, विरह मासपक्ष सहा[10]. ॥
जीवनदात्री[11] **ज**[12] लधरघटा, जसी भानुतापितक्षितिला[13]; ।
**स**रमा परमात्मा ते निवारुनी ताप तूर्ण[14], रक्षि तिला.॥२४२
**र**घुकुलना **य** क **रा**महि अर्पाया **द**शमुखासि संत्रास, ।
प्लवंगर्क्षयूथपांसह[15], करिता झाला जयार्थ मंत्रास. ॥ २४३
दशकंठानु[16] **ज** तेव्हां **रा**मातें वन्यविप्रवृत्तीतें[17], ।
सचिवांपासुनि ऐकुनि, **लं**केच्या जाणवी प्रवृत्तीतें[18]. ॥ २४४
'माझे अमात्य **य** तें **लं**केमध्यें प्रवेशले होते; ।
खगरूप[19] धरुनि, सारे अवलोकुनि कुशल, पातले, हो! ते. ॥
युद्ध कराया **रा** वण झालासे सज्ज सज्जनाराती[20]; ।
सर्वत्र गुप्ति[21] केली **लं**केची, रक्षितो दिसोराती[22]. ॥ २४६
पूर्वद्वारीं स **म** रप्रवीण सचिव **प्र**हस्त वर्ततसे; ।
दुर्लंघ्यवीर्य[23] त्यांचें, बहुतृणपिहितास्य[24] वन्यगर्त[25] तसे. ॥ २४७
वसत असे **श्री**[26] ददिशा द्वारीं **शु**कसा[27]रणासवें राजा; ।
पश्चिमदिग्द्वारीं तो प्रबल[28] भ्रातृव्य[29] जागतो माजा. ॥ २४८

---

१. सीता. २. खलश्रेष्ठ. ३. सीतावचनें. ४. हे कमलनयने. ५. कोट व सैन्य यांसह. ६. सुज्ञसभेमधें झालेला. ७. युद्धविष. ८. हितवचनामृतींहि. ९. राम. १०. सहन कर. ११. उदक देणारी. १२. मेघसमूह. १३. सूर्यतप्तपृथ्वीला. १४, शीघ्र. १५. वानर आणि आस्वल यांच्या यूथपतीसह. १६. बिभीषण. १७. तापसब्राह्मणवत् वर्तणारा. १८. वृत्तांतातें. १९. पक्षिरूप. २०.साधूंचा शत्रु. २१. रक्षण. २२. रात्रंदिवस. २३. अलंघ्यसामर्थ्य. २४. बहुत तृणेंकरून आच्छादित आहेत मुखें ज्यांचीं असे. २५. अरण्यांतील खळगे. २६. उत्तरदिशेचे द्वारीं. २७. शुकसारण राक्षसांसह. २८. अतिबलाढ्य. २९. भावाचा पुत्र इंद्रजित्.

[1]यमदिग्द्वारीं **रा** वणसचिव [2]महापार्श्व दुसराहि तसा; ।
हित साधिता [3]महोदर, अमात्य आहे, बली [4]महाहितसा.॥२४९

वसतो [5]मध्य **म** गुल्मीं वीर [6]विरूपाक्ष बहु[7]बलासहित; ।
[8]महितपराक्रम याचे, [9]भट जे गमताति **रा**वणास [10]हित.॥ २५०

[11]दशशतग **ज** योधी ते, रथीहि आहेत [12]अयुतसंख्यात; ।
[13]अयुतयुग [14]हयारोहहि, [15]सपाद कोटी [16]पदातिही ख्यात.॥२५१

निशि[17]चरना **य** कबल हें, [18]चतुरंग [19]सुरासुरांसि अनिवार; ।
यांत सहस्र सहस्रहि एकैकाचा स्वकीय [20]परिवार. ॥ २५२

[21]कर्पूरतूल **रा** शि [22]ज्वलनातें, असुर हे तसे तूतें; ।
रिपुबलसिंधु विलंघूं धरूनि तूझ्याचि बाहुसेतूतें.' ॥ २५३

**राम** म्हणे, '[23]अ **म** राधिपदिग्द्वारीं **नी**ल यूथवर जावा; ।
**मा**रुतिनें पश्चिमदिग्द्वारीं वधितां न शत्रु [24]वैरजावा. ॥ २५४

**वा**लीचा तनु **ज** बली **अं**गद रोधील दक्षिणद्वार; ।
उत्तरदिग्द्वारीं मी, सानुज मर्दीन ते द्विपें[25]द्वार. ॥ २५५

मध्यमगुल्मीं **य** त्वें **सु**ग्रीवासहित **जां**बुवंतातें ।
घेउनि **बि**भीषणा! तूं कर जाउनियां [26]क्षपाचरांतातें.॥२५६

प्रातःकाळीं नि**जें**[27] भुजबल खललोकासि वीर हो! [28]दावा; ।
दावाग्निसे रिपुवनीं शिरा, खरा हा करा बरा [29]दावा.'॥२५७

**कौ**सल्यातन **य** असें सांगुनि, **लं**कापुरी पहायास, ।
या सकलबलासह तो **सु**वेलशिखरीं चढे रहायास. ॥ २५८

**द**शवदन **रा** जधानी, प्रांशु[30]मणीसौधमंडिता **लं**का ।
मुकुट **त्रि**कूटगिरिचा, ऐसी धरिती कपी मनीं शंका.॥२५९

---

१. दक्षिणदिग्द्वारीं. २. हा रावणाचा सापत्न भ्राता असून अमात्य होता. ३. हा रावणाचा सापत्न भ्राता आणि सचिव. ४. मोठा सर्पसा. ५. मध्यसैन्यांत. ६. रावणाचा सेनापति. ७. सैन्य. ८. ख्यातपराक्रम. ९. वीर. १०. कल्याणकर. ११. सहस्रगजांहीं युद्ध करणारे. १२. दहाहजार. १३. वीसहजार. १४. स्वार. १५. सवादोन कोटि. १६. पायदळहि. १७. रावणसैन्य. १८. हत्ती, घोडे, रथ आणि पायदळ असें चार प्रकारचें सैन्य. १९. देवदैत्यांसि. २०. लवाजमा. २१. कापूर आणि कापूस यांच्या राशी (पुंज) ते. २२. अग्नीतें. २३. पूर्वद्वारीं. २४. सोडावा. २५. शत्रु-समूह. २६. राक्षसनाशातें. २७. स्वबाहुपराक्रम. २८. दाखवा. २९. वैर. ३०. उंच रत्नखचित राजवाडे इत्यादिकेंकरून शोभित.

[1]लेखेशवन म[2]हित, परि, [3]लंकोपवनासवें न तें लेखे[4]; ।
दे खेद काम [5]रामस्वांतातें, त्यासि जेथवां देखे. ॥ २६०

'[6]जयतितरां श्री रामः सुग्रीवो जयति लक्ष्मणो जयति', ।
ऐसें कपि गर्जति, तों लंका कांपे धरूनियां भय ती. ॥ २६१

रात्रि सुवेलीं रा हुनि, [7]योजनयुगुलोच्चशृंगप्रासादीं, ।
[8]संसादि [9]अश्व तैसे, चढले मारुति सुकंठ पनसादी. ॥ २६२

तेथें [10]प्लवंग म र्षभ, गर्जति [11]संवर्तनिर्मिते घनसे; ।
[12]घनसेना दुस्तर ते तैसा [13]कल्पांतसागरौघ नसे. ॥ २६३

दशकंठ स्व ज नासह चढे [14]कनकगोपुराचिया शृंगीं; ।
भासे हे[15]मांबुज तें, अधिष्ठिलें काय [16]मातल्या भृंगीं. ॥ २६४

[17]हरिनीलका य शोणि[18]तचंदनलिप्तांग तो दशग्रीव, ।
[19]संध्याभ्रसा दिसे, तें कोपे पाहूनि फार सुग्रीव. ॥ २६५

[20]खगकुलव रा समान क्षिप्र उडे तो कपी [21]महाप्राण; ।
रावण वधावयाला, रामानें काय सोडिला बाण. ॥ २६६

तो कपिनाथ म हाभुज गेला सक्रोध रावणाजवळ; ।
[22]कवळ कराया आला, यमसें मानी [23]पलाशलोकबल. ॥ २६७

[24]सुगल म्हणे, 'ज नकसुता दे दुष्टा! पामरा! मरायास ।
कां इच्छितोसि? आणुनि कोप प्रबलास रामरायास. ॥ २६८

मी [25]कीशांचा ना य क, रामाचा दास, वालिचा बंधू, ।
तूझ्या कालबलाचा सिंधु, द्विट्[26]सिंधुरास [27]अनबंधू.' ॥ २६९

ऐसा [28]वाल्यनु ज वचनवज्राहत [29]पंक्तिकंठ [30]पापनग ।
वनगज तसा उसळला, सुगलावरि मोडुनि [31]क्षमाख्यनग. ॥ २७०

---

१. इंद्राची बाग. २. पूज्य. ३. लंकेच्या बागेशी. ४. साम्य पावे. ५. रामचित्तातें. ६. अतिशय जय पावतो. ७. दोन योजनें उंच शिखररूप राजवाड्यावर. ८. उत्तम आहेत स्वार ज्यांचे. ९. घोडे. १०. वानरश्रेष्ठ. ११. जगत्प्रलय करणारे. १२. दाट. १३. कल्पांताचा समुद्रसमूह. १४. सुवर्णनगरद्वाराच्या. १५. सुवर्णकमल. १६. उन्मत्त भ्रमरांनीं. १७. पाचूसारिखा नीलदेह ज्याचा असा. १८. रक्तचंदनलिप्त अंग ज्याचें असा. १९. सायंकालच्या मेघासारिखा. २०. गरुडासमान. २१. महाबल. २२. ग्रास. २३. राक्षससैन्य. २४. सुग्रीव. २५. वानरांचा. २६. शत्रुरूप गजास. २७. अनप् अंधु, निरुदक विहीर. २८. सुग्रीववचनरूप वज्रानें ताडित. २९. रावण. ३०. पापपर्वत. ३१. दयारूप वृक्ष.

‘[1]आ: पाप! विन **य** हीना! वनेचरा! होय दूर, मर्कटका! ।
कटकासह भक्षिन तुज, मरावया धांवतोसि एकट [2]का?’ २७१

ऐसें वदोनि **रा** वण, धिक्कारी जों [3]प्लवंगराजाला, ।
तों **सु**ग्रीवें केला [4]प्रहार, रण तेधवां बरा [5]जाला. ॥ २७२

दोघेही [6]विक्र **म** पटुकटु [7]वचनक्रुद्ध [8]युद्धबद्धरस, ।
[9]धरसम [10]समर करिति तों, तनुपासुनि वाहती [11]असृग्द्रस. २७३

[12]कपिरमण **श्री** दानुज [13]**सु**कंठ**द**शकंठ शिष्टदुष्टपती, ।
[14]विष्टपतिलकस्त्र्यर्थें अन्योन्यातें वधावया टपती. ॥ २७४

निजबाहुप **रा** क्रम, तो वानरवर दाखवी [15]महाभाग; ।
[16]भा गर्व हरुनि रिपुचा म्हणे मनीं, ‘स्वामिचाचि हा [17]भाग.’ ॥

सांडुनियां [18]सं **म** रोत्तर [19]असुरास, धरी [20]नरेंद्रपादास; ।
[21]स्वादास [22]पद्ममधुच्या घेतो [23]अलि, कीं दिसे तसा दास. २७६

‘साहस हें तु **ज** अनुचित, एकाकी कां रणास गेलास?’ ।
ऐसें वदोनि **रा**मे हृदयीं आलिंगिला सखा दास. ॥ २७७

‘जरि तूझा [24]ल **य** होता, तरि मर्दुनियां **द**शाननास रणीं, ।
सर्वहि टाकुनि, सखया! धरितों मी सर्वथा तुझी [25]सरणी. २७८

ऐसें त्वां **न** क **रा** वें, यावरि तरि, घेउनि स्वयें कटका, ।
युद्धीं शुद्धयशातें साधीं, जाऊं नकोचि [26]एकटका.’ ॥ २७९

ऐसें वदोनि **म** ग, तो **रा**घव **लं**केसि जाउनी वेढी; ।
ते ढीग[27] वानरांचे अवलोकुनि, जाहली पुरी वेडी. ॥ २८०

त्या सेनेचें **र** **ज** तें दिवसासि करी [28]निशा असें [29]बहुल; ।
[30]सिंधुंचि या काय [31]कथा? [32]स्वर्गंगानीर जाहलें [33]डहुळ. ॥ २८१

---

१. क्रोधार्थी अव्यय. २. कां. ३. सुग्रीवाला. ४. ताडण. ५. झाला. ‘रण’ शब्द पुल्लिंगी ही संस्कृतांत आहे म्हणून ‘जाला’ असें पुल्लिंगी क्रियापद योजिलें आहे. ६. पराक्रमकुशल. ७. तीक्ष्णवाक्यकुपित. ८. युद्धीं धृतप्रीति. ९. पर्वततुल्य. १०. युद्ध. ११. रक्तरूप रस. १२. वानरेश व कुबेरबंधु. १३. सुग्रीव रावण. १४. रामस्त्रीकरितां. १५. भाग्यवान्. १६. तेज. १७. अंश. १८. युद्धानंतर. १९. रावणास. २०. रामचरणास. २१. गोडीस. २२. कमलमकरंदाच्या. २३. भ्रमर. २४. नाश. २५. मार्ग. २६. एकट्या. २७. समूह. २८. रात्रि. २९. पुष्कळ. ३०. समुद्राची. ३१. गोष्ट, गणना. ३२. स्वर्गंगोदक. ३३. गढूळ, खडूळ.

गाढे[1] ते निर्भ **य** कपि, असुरांचे भंगिती बळें वाडे[2]; ।
झालें[3] तें **लं**केचें कटक[4] कटक[5], कटकट[6] क्षणें वाढे. ॥ २८२

रघुवीर रा **ज** नीतिप्रवीण तो **अं**गदासि दूतत्वें, ।
सत्वेंकरूनि धाडी, निज रिपुपाशीं, कथूनियां तत्वें[7]. ॥ २८३

तो **अं**गद न **य** निपुण प्रभुला वंदूनि जाय **लं**केला; ।
केला प्रवेश **रा**वणसभेंत, सोडूनि भीतिशंकेला. ॥ २८४

सारे मदांध **रा** क्षस कुंजर[8], शिरला अशांत हरितोक[9]; ।
हरितो[10] कवण तयाला? झाला तो चित्रतुल्य रिपुलोक. ॥ २

**अं**गद म्हणे **म** नीं, ‘जरि न वदावें न पुसतां असें आहे; ।
बाहेर तें असो मत, कार्यार्थ[11] अधिष्ठिली[12] खलसभा हे. ॥ २८६

हा **द**शकंठ **श्री**[13] मदमत्त, न मद यासमान आसव[14] दे; ।
कार्यार्थ मी वदावें करूनि ऐसा विचार यास वदे. ॥ २८७

‘हे रात्रिंचर[15] **रा** जा! **रा**माचा दूत **अं**गदाभिध[16] मी; ।
कोणी मला पुसाना, कोण असें, काय बैसलों अधर्मी[17]. ॥ २८८

**वै**देहीच्या[18] **र**[19] **म** णें वीरें करुणाकरें जगद्गीतें, ।
पाठविलें मज, त्याच्या ऐकें कल्याणहेतु[20] सद्गीतें[21]. ॥ २८९

**च**तुरानन[22] **ज** गदीश्वर, त्याचा तूं पौत्र[23] **भू**तपतिदास[24], ।
श्रुतसंपन्न[25], नयज्ञ, ब्राह्मणसुत, पावलासि सुपदास. ॥ २९०

सुरभूसुर[26] **य** त्नानें पूजावे, धर्मसेतु[27] रक्षावे; ।
निर्मल यश जोडावें, व्यसनानाचार ते उपेक्षावे. ॥ २९१

या विहिताचा **रा** तें, सोडुनि धरिलीस वृत्ति जननीचा[28]; ।
अनुसरलासि **द**शास्या! पक्षाला तूं स्वकीयजननीच्या[29]. ॥ २९२

---

१. मजबूद, बलाढ्य. २. मंदिरें. ३. तें कटक (सैन्य) लंकेचें कटक (वलय) झालें. ४. सैन्य. ५. वलय (वेढा.) ६. कलह. ७. सार, मुख्यांश. ८. हत्ती. ९. सिंहबालक. १०. निवारितो. ११. स्वकार्यासाठीं. १२. आश्रयिली. १३. लक्ष्मीच्या मदानें माजलेला. १४. मद्य. १५. राक्षसाधिपा. १६. अंगदनामक. १७. नीचांत. १८. सीतेच्या. १९. पतीनें. २०. हितकारक. २१. उत्तम वाणीतें. २२. ब्रह्मा. २३. नातू. पुलस्त्यऋषीचा पौत्र आणि विश्रवाऋषीचा पुत्र. २४. शिवभक्त. २५. शास्त्रसंपन्न. २६. देव ब्राह्मण. २७. धर्ममर्यादा. २८. जनांत निंद्य असी. २९. स्वमातेच्या. याची माता कैकसी ही सुमाली नामक राक्षसाची कन्या.

विधिवरसा **म** र्थ्यानें, होउनि मदमत्त वैन्यकुंजरसा[1], ।
धर्मद्रु[2] मोडिले हे, केली ध्वस्ताचि वेदकुंज[3] रसा[4]. ॥ २९३

विप्रामरभ[5] **ज** नीय स्तुत्य, तयांशींच लाविलें वैर; ।
कैरवपतिनिभ[6] पूर्वजयश[7] मळवायासि वर्तसी स्वैर[8]. ॥ २९४

शम दम न **य** भय लज्जा सोडुनि, हरिशी परांगनावित्त[9]; ।
वित्तम[10] होउनि निरयप्रद[11] मार्गी काय ठेविलें चित्त ? ॥ २९५

स्वकुलाला अं **ज**[12] न जो लावी, तो पुत्र न, प्रसूविष्ठा[13]; ।
शिष्टाचरणीं यास्तव नित्य असावी यशःप्रदा निष्ठा. ॥ २९६

करिशी अन्या **य** बळें, हितोपदेष्टा तुला गमे द्वेष्टा; ।
स्वेष्टांसि[14] मंतुवांचुनि[15] धिक्कारिशि, हे बरी नव्हे चेष्टा[16]. ॥ २९७

जनकमहा **रा** जसुता रविकुलतिलकाजसूनुची[17] सून, ।
तूं न कळत नेली, तरि दे, हो सद्वृत्त[18] आजपासून. ॥ २९८

अपराध हा **म** हाजननिंद्य तशी हे जनाधमा ! केली[19]; ।
अद्यापि मी पुलस्त्यद्विजाकडे[20] पाहुनि क्षमा केली. ॥ २९९

रघुकुलज[21] **श्री** मंत प्राज्ञ प्रबल क्षमादयानिलय[22], ।
शरणागतवत्सल हे, ख्यात जनीं, शत्रुचा करूनि लय. ॥ ३००

रविवंशज **रा** जांची बहुसरला भ्रूलताहि[23] चापलता[24]; ।
ते वक्रा झाल्यावर, चालेना जिष्णुचीहि[25] चापलता[26]. ॥ ३०१

नाहीं तुजसीं **म** जसीं वैर, तथापि प्रियावियोग[27] मला, ।
दिधला, यावरुनि तुझा स्वभाव विपरीत सर्वथा गमला. ॥ ३०२

वैदेहीला[28] तूं **ज** रि आणुनि देशील आझुनी मजला; ।
मीही लंका जीवन अभय, समर्पीन तत्क्षणीं तुजला. ॥ ३०३

नाहीं तरि सा[29] **य** क हे, हे भुज, हा खड्ग, हें धनूरत्न, ।
मी सज्ज जयधनातें, तूं निधनातें[30], स्वयें करीं यत्न. ॥ ३०४

---

१. वनांतील हत्तीसा. २. धर्मवृक्ष. ३. वेदरूप झाडी आहे जीचे ठायीं असी. ४. पृथ्वी. ५. सेवनीय. ६. चंद्रतुल्य. ७. पूर्वजांचें यश. ८. यथेच्छ. ९. दुसऱ्याचें स्त्रीरूप धन. १०. ज्ञानिश्रेष्ठ. ११. नरकप्रद. १२. कज्जल. १३. मातेची विष्ठा. १४. स्वकीय आप्तास. १५. अपराधावांचून. १६. क्रिया. १७. सूर्यकुलभूषण दशरथ त्याची. १८. सदाचारसंपन्न. १९. क्रीडा. २०. रावण हा पुलस्त्याचा पौत्र. २१. राम इत्यादि. २२. क्षमादयास्थान. २३. भ्रुकुटीरूप लताहि. २४. धनुष्यरूप लता. २५. इंद्राची. २६. चपलत्व. २७. सीतावियोग. २८. सीतेला. २९. बाण. ३०. नाशातें.

यापरि तुज **रा** जेंद्रें कथिलें, आतां करूं नको उशिर; ।
[1]संतोपायन घेउनि, ठेवीं, ये [2]तत्पदांबुजीं स्वशिर. ॥ ३०५

तूं करुनि स **म** र, न मर; भ्रमरसम [3]रघूत्तमांघ्रिनवपद्मीं, ।
रम, रस घे, अमरचि हो, भ्रमरहित स्वस्थ नांद [4]निजसद्मीं. ॥

दे उत्तर, नि **ज** लासा, बहिरासा, मूकसा, नको राहूं; ।
याहुनि हित काय वदों? न वदसि कां आझुनीहि चोरा! हूं.॥

[5]अनल अनिल **य** म यक्षप वरुण विधु ब्रध्न सर्प गंधर्व; ।
सर्व पराजित केले, परि रामाशीं करूं नको गर्व. ॥ ३०८

राम [6]प्रणत **ज** नांचा त्राता, रिपुलोककाल यापाशीं, ।
चेष्टा करितां दुष्टा! भ्रष्टा! पडशील मृत्युच्या पाशीं.॥ ३०९

राम [7]धनंज **य,** तूं ही कापुर तृण तूल काष्ठ घृत तैल; ।
[9]शैलहि पिचंविल, हें तुज नुमजे, तूं मातला जसा बैल.॥ ३१०

यतिवेषें चो **रा** नें, बाटवुनी [11]रामचंद्रदलकुटिला, ।
[12]कुटिलानें [13]रत्नातें नेलें, तो शत्रु पाहिजे [14]कुटिला. ॥ ३११

[15]गिरिदलन **म** स्तकानें, [16]स्वशिरोभंगार्थ दुर्मते! करिशी; ।
[17]करिशील तूं मदांधा! नरकपुरी इच्छितोशि [18]लौकरिशी. ३१२

तूं मुकलासि **श्री** स्त्रीसौख्ययशःप्राणपुत्रमित्रातें; ।
[19]आत्मौर्ध्वदेहिकातें तरि कारं, तुज कोण या जनीं त्रातें?' ॥

ऐसें ऐकुनि **रा** गें, दशकंठ म्हणे, 'धरा धरा धांवा; ।
हा [20]धृष्ट पुष्ट मर्कट मारुनि हिरवाचि खा, न [21]रांधोवा.'॥ ३१४

ते सचिवाध **म** चौघे धरिती [22]तारातनूजदोर्दंड; ।
ते दंडिती गिरीतें, प्रहार करितात काय [23]वेतंडें?॥ ३१५

अंगद [24]अंडे **ज** वरसा, वरसामर्थ्यें उडोनि भुज झाडी; ।
पाडी [25]प्रासादासह सचिवांतें, मृत्युच्या घरा धाडी. ॥ ३१६

---

१. सीतारूप नजराणा. २. रामचरणकमलीं. ३. रामपदरूप नवीन कमलीं. ४. स्वगृहीं. ५. अग्नि, वायु, यम, कुबेर, वरुण, चंद्र, सूर्य, सर्प, गंधर्व. ६. शरणागताचा. ७. अग्नि. ८. कापूस. ९. पर्वतही. १०. जाळून रक्षा करील. ११. रामपर्णशालेला. १२. दुष्टें. १३. सीतारूप रत्नातें. १४. मारिला. १५. पर्वत फोडणें. १६. स्वमस्तकभंगार्थ. १७. हत्तीसारिखा स्वभाव ज्याचा असा. १८. सत्वर. १९. स्वकीय उत्तरकार्यातें. २०. दांडगा. २१. शिजवावा. २२. अंगदबाहु. २३. गज. २४. गरुडासारखा. २५. वाड्यासहवर्तमान.

जाउनियां पा **य** नमी स्वामीचे, सर्व वर्तमान वदे ।
मानवदेवा, रिपुचा आग्रह तिलमात्रही न तानव[1] दे. ॥३१७

मग तो **रघु रा** ज म्हणे, 'कथिले सामाद्युपाय[2] जे कांहीं; ।
तत्क्रममार्गातिक्रम न करावा, नीतिनिष्ठ[3] लोकांहीं. ॥ ३१८

यास्तव नीति **म** तानें नियोजिलें पंडितास तुज सामीं[4]; ।
कैसा वर्तो **गा**धिज**व**सिष्ठमुनिराजशिष्य[5] सहसा मी. ॥ ३१९

सामर्थ्यें दंडा[6], **ज** रि मानीना रक्षसापसद[7] साम; ।
ग्राम विमर्दा[8] सारा, मारा रिपुला, करूनि संग्राम[9].' ॥ ३२०

आज्ञा होतां,'ज **य** ति **श्रीराम**' असें म्हणूनि यूथपती[10], ।
स्वस्वबलें घेउनियां निघती, तेव्हां रविप्रभा लपती. ॥ ३२१

म्हणती, 'हा र **ज** नीचर आचारभ्रष्ट दुष्ट पापिष्ठ, ।
विष्टपकंटककष्टद[11] शिष्टद्वेष्टा, धरा करा पिष्ट[12].' ॥ ३२२

ते एकदाचि **य** मसे, प्राकारीं[13] वेंघले[14], तदा **लं**का ।
सालंकारा गिळितिल, अशि रात्रिचरांसि[15] जाहली शंका. ॥३२३

कल्पांतीं मर्क[16] **रा** लयनीर जसें एकदांचि खळबळतें, ।
भूमि ग्रासायास्तव तैसें मानी **द**शास्य खळ बळ तें. ॥३२४

**द**शमुखही **म**[17] त्तद्विपरथाश्वपादातबहुल सेनेला ।
धाडी रणास, तेव्हां कपिनीं बहु रक्षस[18] क्षया नेला. ॥३२५

त्रिपुर जसें **श्री**[19] **कं**ठध्वजिनीनें वेष्टिलें, तशी **लं**का ।
रणपटुमर्कटकटकें[20] निरोधितां, होय फार सातंका[21]. ॥ ३२६

वानरवर **रा** क्षसवरसेना एकत्र जाहल्या भारी; ।
अद्भुत रण होय, तसा करिते झाले म **वृत्रजं**भारी[22]. ॥ ३२७

---

१. सूक्ष्मत्व. २. साम आहे आदि (प्रथम) ज्यांत असे उपाय. (साम, दान, दंड आणि भेद हें उपायचतुष्टय आहे.) ३. नयवर्ती. ४. साम करण्यास. ५. विश्वामित्रवसिष्ठऋषिश्रेष्ठांचा शिष्य. ६. दंड करा. ७. राक्षसाधम. ८. मोडून टाका. ९. युद्ध. १०. वानरसैन्याचे नायक. ११. देवांस कंटक व दुःखदायक. १२. चूर्ण. १३. तट, शहरपन्हा. १४. चढले. १५. राक्षसांसि. १६. समुद्रजल. १७. उन्मत्त गज, रथ, घोडे, पायदळ, बहुत जींत अशी सेना तिला. १८. एथें अनेक व्यक्तींचा बोध होतो म्हणून 'राक्षस' हें जात्यैकवचन होय. १९. शिवसेनेनें. २०. युद्धकुशल वानरसैन्यें. २१. सभया. २२. वृत्रासुर व इंद्र.

झाला निरुप **म** समर, प्लवगगणीं आणि [1]यातुधानगणीं; ।
कोणी [2]कायक्षयभय [3]परप्रहार श्रम क्षुधा न गणी. ॥ ३२८

[4]क्षुरनाराचां **ज** लिक प्रास गदा कुंत शूल तरवारी ।
वर्षति निशिचर कपिवर; [5]जलधर जैसे [6]प्रभूततर [7]वारी. ३२९

[8]रक्षःसमुदा **य** शिरीं कपि वर्षति [9]भूरुहाद्रिशिखरांहीं; ।
मारिति [10]चपेट लत्ता, मुष्टि च्छेदूनि [11]दंतनखरांहीं. ॥ ३३०

**अं**गद कपि **रा** वणसुत, **नी**ल **नि**कुंभ **प्र**जंघ **सं**पाती, ।
**प्र**तपन **न**ल **सु**ग्रीव **प्र**घस, असे युद्ध करिति [12]अतिपाती. ३३१

**सौ**मित्रीनें स **म** रीं वधिला एका शरें **वि**रूपाक्ष; ।
[13]**सु**तघ्नाला **रा**घव, जलधाराला जसा **वि**[14]रूपाक्ष. ॥ ३३२

पवनतनू **ज** हनूमान् मारी युद्धांत **जं**[15]बुमालीला; ।
[13]**शं**शनिप्रभप्रमथनीं [16]**द्वि**विदहि दावी अनुत्तमा लीला. ॥ ३३३

**मैं**[17]दानें [18]प्रल **य** पळें केला त्या **व**[13]ज्रमुष्टिचा समरीं; ।
[19]अन्यनिशाचरजीवनरस नेला [20]**रा**ममार्गणभ्रमरीं. ॥ ३३४

**नी**लानें स्वभु **ज** बळें **नि**[13]कुंभ [21]दमिला, **क**पीश्वरें **प्र**[13]घस; ।
**न**लशमित **प्र**[13]तपन रणयज्ञीं झाला [22]शिवागणीं वि[23]घस. ॥ ३३५

**अं**गद विज **य** श्लाघी **इं**द्रजिताशीं करूनियां समर; ।
गुरुतरतरुप्रहारें विरथ करी, फार हर्षवी अमर. ॥ ३३६

मग **रा**त्रिच **रा** धिपसुत, [24]मायावी गुप्त होय तत्काल; ।
[25]व्यालमयाशुगपाशीं बद्ध करी [26]राघवेंद्र निजकाल. ॥ ३३७

**रा**घव [27]नाग **म** याशुगनिबद्ध केले **वि**रिंचि[28]वरदानें; ।
मर्मीं खरशर निकरें खिळिले अत्यंत **मे**[29]घनादानें. ॥ ३३८

---

१. राक्षससमूहीं. २. देहनाशभय. ३. शत्रुकृत ताडन. ४. तीक्ष्णबाणअंजलिकादि आयुधें. ५. मेघ. ६. अत्यंत पुष्कळ. ७. उदक. ८. राक्षससमूहमस्तकीं. ९. वृक्ष, पर्वतशिखरें यांहीं. १०. चापट. ११. दंतनखांनीं. १२. अडथळा करणारे. १३. रावणपक्षीय राक्षस. १४. शिव. १५. प्रहस्तराक्षसाचा पुत्र. १६. सुषेण वानराचा कनिष्ठ मुलगा. (वा० रा० यु० कां० स० ४३) १७. सुषेणाचा ज्येष्ठ पुत्र. १८. नाश. १९. अन्यराक्षसप्राणरूप रस. २०. रामबाणरूप भ्रमरीं. २१. मारिला. २२. कोल्ह्यांच्या समूहीं. २३. भक्ष्य. २४. इंद्रजालिक, गारुडी. २५. सर्पमय बाणपाशीं. २६. राम लक्ष्मण. २७. सर्पमय बाणबद्ध. २८. ब्रह्मवराचें दान ज्यास मिळालें त्यानें. २९. इंद्रजितानें.

पुष्पितपर्ण[1] **श्री** धर, ते दोघे रक्तसिक्ततनु[2] झाले; ।
आलेख्यचित्र[3] तैसे निष्क्रिय होतां, समस्त कपि आले. ॥ ३३९

अवलोकुनि **रा** घव ते, निश्चेष्टित[4] बाणतल्पतलसुप्त[5], ।
रिपुमथनातें धांवति, परि तो रात्रीस जाहला गुप्त. ॥ ३४०

सारे प्लवंग **म** रणीं **रा**मावस्थेसि पाहतां रडती, ।
पडती कितेक भूवरि, 'हा ! राम !' असें म्हणोनि आरडती. ॥

तों तो रिपु अं[6] **ज** लिकक्षुरप्रनिकरें करूनियां ताडी; ।
पाडी विविधायुधगण, घनकश्मलही[7] कपिव्रजीं[8] धाडी. ॥ ३४२

रावणतन **य** म्हणे; 'रे ! अशीच गति मी करीन सर्वांची; ।
नरमर्कटकटकांहीं कथा वदावी न वीर्यगर्वाची. ॥ ३४३

केला शक्रप[9] **रा** भव, सेवक झाले सदेवगंधर्व; ।
गर्व धरुनि मर्कट हो ! निष्कारण मृत्यु पावतां सर्व.' ॥ ३४४

ऐसें वदोनि **म** ग तो जाउनि सदनासि[10] वर्धमानयशा[11] ।
जयशाली तातातें कथि, तो मानी दिशा सुनिर्भयशा. ॥ ३४५

रावण तो **त्रि** **ज** टेला म्हणे, 'तिला[12] शीघ्र पुष्पकामाजी[13] ।
घालुनि मृतपति दावीं, म्हणजे होईल कामना[14] माजी[15].' ॥ ३४६

'आज्ञा'[16] म्हणोनि **य**[17] क्षपयानीं **सी**तेसि बैसवुनि तूर्ण[18], ।
त्रिजटा रणांगणातें नेउनि, दावी क्षणांत संपूर्ण. ॥ ३४७

खरतरभु[19] **ज** गशरांचितसर्वतनू पंजरांतरीं[20] शुकसे[21], ।
रक्तार्द्रदेह सद्यश्छिन्न[22] वसंतीं सपुष्प किंशुकसे[23]. ॥ ३४८

अथवा, प्रल[24] **य** ज्वलनज्वालाकवलीकृतेंदुभास्करसे, ।
वज्रच्छिन्न[25] कनकनगशृंग तसे, सिंहनिहत[26] कुंजरसे. ॥ ३४९

---

१. पुष्पयुक्त पळसाची शोभाधारक. २. रक्तानें भिजली आहे तनु (देह) ज्यांची ते. ३. लिखितचित्र. ४. निश्चेष्ट. ५. बाणशय्यानतलीं निद्रित. ६. अंजलिक, क्षुरप्र, इत्यादिबाणांच्या निकरेंकरून. ७. अत्यंतमूर्च्छा. ८. वानरसमूहीं. ९. इंद्रपराभव. १०. गृहासि. ११. वृद्धिंगत आहे यश ज्याचें असा. १२. सीतेला. १३. विमानांत. १४. इच्छा. १५. माझी. १६. आज्ञा मान्य आहे, हा भावार्थ. १७. पुष्पकविमानीं. १८. शीघ्र. १९. तीक्ष्णसर्परूप बाणवेष्टित सर्व देह. २० पिंजऱ्यांत. २१. पोपटसे. २२. तत्काळ तोडलेले. २३. पळसासारखे. २४. प्रलयाग्निज्वालाग्रस्त चंद्रसूर्यसे. २५. वज्रानें तोडलेल्या मेरुशिखरासारिखे. २६. सिंहांनीं मारिलेले हत्तीसे.

अवलोकुनि **रा**[1] घववर देवर, भूमीवरी रजोध्वस्त, ।
अस्तधृति[2] त्रस्तमना[3] **सी**ता ठेवी स्वमस्तकीं हस्त. ॥ ३५०
'हा!नाथ!हा!र**म** ण! हा! **ल**क्ष्मण! हा! तात! हांब[4]! हा! दिष्ट[5]! ।
विष्टपनायक[6] **का**ळें गिळिला, केलें मलाचि अवशिष्ट[7]. ॥ ३५१
निजला काय **श्री** मान् **व**सिष्ठ भगवान् भवत्कुलाचार्य? ।
आर्यसुता[8]! स्वर्गातें गेलाशि, कसा न होनि[9] कृतकार्य. ३५२
हा! दशरथ[10] **रा** जमहिषि! कैशी तूं साहशील सुतशोक? ।
**कै**केयि! तोक[11] गिळिला, म्हणेल तुज काय हा बरें लोक?॥
[12]**कौ**शिक**गौ**त**म** **क**श्यप**व**सिष्ठ**जा**बा**ल्य**गस्त्यविप्राशी ।
झाल्या विफला कैशा? मज्जीवन **का**ल केंवि न प्राशी? ३५४
हा! देवरा[13]! तु **ज** ला मी **पं**चवटीमाजि गांजिलें, बापा! ।
न वदावें तें वदल्यें, म्हणवुनि रुसलासि काय निष्पापा! ? ३५५
त्रिभुवनभ **य** हि न हरिलें, खरत्नहरदस्यु[14] मारिला नाहीं; ।
मज टाकुनियां स्वर्गा, गेलां कार्य न करोनियां कांहीं. ॥ ३५६
तातासि विचा **रा** या गेलां, दोघेंहि धर्मसंकट कीं; ।
सत्वर पुनरपि येतों, ऐसें कथिलें नसे कसें कटकीं[15]? ॥ ३५७
त्यजिलें जरि **म** ज, तरि हें राहो, तुज विषयरुचि नसे, शांता[16]! ।
त्यजिली कशि धर्मज्ञा! वृद्धा विधवैकनंदना[17] माता[18]?' ॥ ३५८
यापरि बाष्प[19] **ज** लाविलनेत्री धात्रीसुता[20] विलाप करी; ।
**त्रि**जटा तेव्हां तीतें समजावी, लोचनें पुसूनि करीं. ॥ ३५९
'निजशत्रुक्ष **य** करुनि, त्वद्दुःखातें हरील हा **रा**म; ।
हारामध्यें मणिशी[21] तुजला हृदयीं धरील, सुखधाम[22]. ॥ ३६०.
**रा**घव सानु **ज** सावध होउनि देईल शर्मसंदोह[23]; ।
जो हत[24], तन्मुख विद्युति[25], हा न तसा पावला असे मोह[26]. ३६१

---

१. रामलक्ष्मण. २. धैर्यहीन. ३. भीतमना. ४. हा अंब. ('हा' हें खेदार्थक अव्यय, अंब म्ह० आई.) ५. दैवा. ६. राम. ७. बाकी. ८. हे रामा. ९. होउनि. १०. हे कौसल्ये. ११. पुत्र. १२. विश्वामित्रादिब्राह्मणाशीर्वाद. १३. हे लक्ष्मणा. १४. स्वस्त्रीरूप रत्नहारक चोर. १५. सैन्यांत. १६. हे शांता. १७. पतिहीना एकपुत्रा. १८. कौसल्या. १९. बाष्पोदकें व्याप्त नेत्र जीचे असी. २०. सीता. २१. मणिसारखी. २२. सुखसदन. २३. सुखसमूह. २४. मृत. २५. निस्तेज. २६. मूर्च्छा.

शत्रुपराज **य** करितां, पडती ऐसेचि आयुधाघातें[१]; ।
पुनरपि सावध होउनि, संहारिति वीर दुष्टसंघातें.' ॥ ३६२

सर्वज्ञा चतु **रा** ते त्रिजटा बोधी यथार्थ वचनांहीं; ।
दुःखापासुनि देहत्राणीं, धृतिवांचुनी[२] कवच नाहीं. ॥ ३६३

भूमिसुता[३] प्रे[४] **म** दवनीं, नेवुनियां ठेविली तिणें मग ती; ।
जग तीस शून्य भासे, खरखदिरांगारपूरिता[५] जगती[६]. ॥ ३६४

कपिवरही **श्री**[७] रामव्यामोहें करुनि पावला ताप; ।
आपद्ग्रस्त[८] व्याकुल, झाला अत्यंत जेंवि कृतपाप[९]. ॥ ३६५

वानरवर[१०] **रा** जातें बिभीषणें नीति शिकविली हृद्या[११]; ।
विद्याभिमंत्रितांभें[१२], दृष्टिहि केली क्षणांत अनवद्या[१३]. ॥ ३६६

सद्विद्यापूता[१४] **म** ल जल राघव लोचनासही लावी; ।
मग विभु नेत्रें उघडुनि, बिभीषणाला समीप बोलावी.॥३६७

'मारुनियां र **ज** नीचर, करून तुझिया अधीन[१५] लंकेला; ।
तव मस्तकीं स्वहस्तें, नाहीं राज्याभिषेक मीं केला. ॥ ३६८

सुग्रीवें बहु **य** त्नहि केला, साधावयासि मत्कार्य; ।
आर्यमणे[१६]! तूं मजहुनि, रविवंशाला सदैव सत्कार्य[१७]. ॥ ३६९

मत्संकट वा **रा** या, सहाय झालासि तूं जरीं आर्य; ।
दुर्दैवमित्र कोणी होत नसे या जनांत कृतकार्य[१८]. ॥ ३७०

सारीं प्लवंग[१९] **म** बलें घेउनि जा स्वस्थलासि वेगानें; ।
माझ्या परि तूंही निजलोक नको तापवूं वियोगानें. ॥ ३७१

मी रविवंशीं **ज** न्मुनि, निजपूर्वजयश समस्त हारविलें; ।
सौमित्रे[२०]! बंधुपणें[२१] व्यर्थ तुला या रणांत मारविलें. ॥ ३७२

गुरुभक्ता! न **य** निपुणा! तुजसम कोणी नसे विशुद्ध मनीं; ।
धमनी[२२] दिसती तूझ्या, या माझ्या शोकवन्हिच्या धमनीं[२३].'३७३

---

१. शस्त्रताडनें. २. धैर्यावांचुनि. ३. सीता. ४. राजस्त्रियांचें क्रीडावन. (अशोकवनिका.) ५. तीक्ष्णखैराचे इंगळांहीं पूर्ण. ६. पृथ्वी. ७. राममूर्च्छेंकरून. ८. विपत्तिमग्न. ९. केलें पाप ज्याणें तो. १०. सुग्रीवातें. ११. गुह्य. १२. विद्येनें अभिमंत्रित अशा उदकें. १३. अनिंदिता. १४. चांगल्या विद्येनें पवित्र आणि स्वच्छ झालेलें. १५. स्वाधीन. १६. हे महत् श्रेष्ठा. १७. सत्कारास योग्य. १८. सफलकाम. १९. वानरसैन्यें. २०. हे लक्ष्मणा. २१. बंधुत्वें. २२. शिरा. २३. फुंकण्यांत.

तेव्हां **कपिरा ज** म्हणे, [1]श्वशुराला या **सुषेण**नामाला; ।
**किष्किंधेला नेउनि, रक्षीं सौमित्रियुक्त रामाला.** ॥ ३७४

**दशकंठक्ष य** करणें, किंवा मरणें वरूनि [2]शरतल्प; ।
कल्पक्षय होवू परि, माझा मिथ्या नसोचि संकल्प.' ॥ ३७५

तेव्हां [3]**रु**माव **रा** तें म्हणे **सुषेण**, 'प्रभो! धरीं धीर; ।
क्षीरसमुद्रतटातें धाडीं [4]पवनात्मजादि कपिवीर. ॥ ३७६

केलें अमृत **म** थन ज्या स्थानीं, तेथेंचि दोन [5]गिरिवर्य; ।
[6]अर्यमसम निशि दिसती औषधितेजें, असे महाश्चर्य. ॥ ३७७

[7]विधुतरणि **श्री** तस्कर, [8]**चंद्रद्रोण** प्रसिद्ध ते [9]शिखरी; ।
त्यांपासुनियां औषधि, आणुनि द्यावी **रघूत्तमा**शि खरी. ३७८

हरितिल सा **रा** ताप प्रभुचा, संरक्षितील कीं प्राणा; ।
[10]**सं**जीवनी **वि**[11]शल्या, ऐशा त्या दोन औषधी आणा. ३७९

दैत्यांसह स **म** र करुनि झाले होते [12]अमर्त्य निर्जीव; ।
[13]जीवन देता झाला, त्या औषधिच्या बळें तदा '[14]**जीव**.' ३८०

ऐसें वदतां, [15]**ज** वन [16]श्वसनाहुनि [17]**वै**नतेय तो आला; ।
[18]व्यालारिदर्शनानें नागाहीं सोडिलेंचि **रा**माला. ॥ ३८१

[19]अहिमयसा **य** क पळती, **गरुडागमनें**चि [20]भीत्यधीनमनें; ।
जैशीं भक्तजनाचीं पापें **रघुनायकांघ्रिच्या नमनें.** ॥ ३८२

झाले विमुक्त **रा** घव [21]अहिपाशांतूनि अर्धपलमात्रें; ।
[22]गात्रें स्पर्शोनि करें, केलीं बलसौख्यकांतिचीं पात्रें. ॥ ३८३

ज्याचें निजना **म** हरी, [23]वज्राच्छेद्यादिसिद्ध [24]भवबंध; ।
[25]तो, '[26]प्रत्युपकार मला न दिसे, झालों' म्हणे 'जसा अंध.' ॥

'तूं गमसी म **ज** **दशरथवसिष्ठमुनिकौशिकासमान** मनीं; ।
[27]श्रमनिर्दलन! भ्रमहर! हे स्तुति करितों असें कदां [28]न मनीं. ॥

---

१. सासऱ्याला. २. बाणांची शय्या. ३. सुग्रीवातें. (रुमा ही सुग्रीवाची भार्या.) ४. हनुमंतादि. ५. पर्वतश्रेष्ठ मंदर आणि द्रोणागिरी. ६. सूर्यासारखे. ७. चंद्रसूर्यशोभाहर. ८. चंद्रद्रोणनामक. ९. पर्वत. १०. मृतास जिवंत करणारी. ११. बाणशल्यांची (अस्रांची) पीडा निवारण करणारी. १२. देव. १३. प्राण. १४. बृहस्पति. १५. अतिवेगवान्. १६. वायूपेक्षां. १७. गरुड. १८. गरुडदर्शनें. १९. सर्पमय बाण. २०. भयाधीनचित्तें. २१. सर्पपाशांतून. २२. शरीरें. २३. वज्रानें तुटावयाचा नाहीं असा आदिसिद्ध. २४. संसाररूप पाश. २५. राम. २६. गरुडाचा प्रत्युपकार. २७. श्रमहारक. २८. मान नको.

सदयहृद **य** तूं कोण ? [1]स्वाख्या वद.' या परी पुसे **राम**; ।
हा मग म्हणे, 'तुझा मी सखा, **गरुड** हें प्रसिद्ध मन्नाम.' ॥
आलिंगुनि [2]**भुज** युगुलें, दोघांशि म्हणे, 'स्वशत्रु माराल; ।
[3]कारालयगत [4]निर्जर सोडवुनि [5]स्वाप्तलोक ताराल.' ॥ ३८७
ऐसें [6]खगना **य** क तो वदोनि घेऊनि **राघवा**ज्ञेला, ।
गेला; [7]जयशब्द तदा हर्षें कपिसैन्यसागरें केला. ॥ ३८८
पुनरपि ते **रा** गानें जाउनि, [8]गुडराशिला [9]पिपीलिकसे; ।
**लं**का व्यापुनि म्हणती, 'खल हो! अद्यापि वांचलेत कसे ?'॥
[10]पाषाणतृण **म** हीरुहधूलीनें भरुनियां [11]महापरिखा; ।
[12]हरि खाणिती पुरीतें नखदंतांहीं धरोनियां [13]हरिखा. ॥ ३९०
[14]कपिनिनदें [15]**श्री** दानुज पावे तात्काल मृत्युची शंका; ।
[16]आतंकाकुल झाला, [17]हरिसैन्यें वेष्टिली जशी **लं**का. ॥ ३९१
अतुलबली **रा** घव तो आला सेनेकरूनि संयुक्त; ।
[18]अहिपाशांपासुनियां **सौ**मित्रीसहित जाहला मुक्त. ॥ ३९२
**द**शमुख हें **म** हदप्रिय, ऐकुनियां, फार जाहला खिन्न; ।
[19]खिन्नतनू [20]नतकंधर [21]सस्रोत जसा [22]महीध्र [23]पविभिन्न. ॥ ३९३
**रा**घवपरा **ज** यास्तव धाडी **धू**म्राक्षनाम रणदक्ष; ।
[24]**द**क्षघ्नावरि [25]**अं**धक, तेंवि जयाचे प्रवीर बहुलक्ष. ॥ ३९४
जेंवि [26]**ध**नंज **य** विपिनीं[27], कपिसैन्यामाजि तो तसा गमला; ।
[28]गिरिशिखरकरकमारुतिघनाघनेंकरुनियां रणीं [29]शमला. ॥ ३९५
तदनंतर **रा** क्षसवरवचनानें **व**ज्रदंष्ट्रनाम रण ।
प्लवगासह करुनि बळें, **अं**गदहस्तेंचि पावला मरण. ॥ ३९६

---

१. स्वनाम. २. बाहुद्वयें. ३. बंदिशाळेंतील. ४. देव. ५. स्वजन. ६. गरुड. ७. जयध्वनि. ८. गुळाच्या राशीला. ९. मुंग्यांसारखे. १०. दगड, गवत, वृक्ष, धूळ, यांनीं. ११. मोठे खंदक. १२. वानर. १३. हर्षा. १४. वानरशब्दें. १५. रावण. १६. भयपीडित. १७. वानरसैन्यें. १८. सर्पपाशांपासून. १९. घर्मयुक्त देह. २०. अधोमुख. २१. प्रवाहयुक्त. २२. पर्वत. २३. वज्रभिन्न. २४. शिवावर. आपली बायको सती हिचा तिच्या बापानें (दक्षानें) अपमान केला म्हणून शिवानें त्याचें शिर वीरभद्राकरवीं तोडविलें, यास्तव शिवास 'दक्षघ्न' म्हटलें आहे. २५. दैत्यविशेष. याच्या रक्तापासून दुसरे अंधक उत्पन्न होत. या अंधकाचें महादेवाशीं अवंति देशांत मोठें घोर युद्ध झालें. २६. अग्नि. २७. वनीं. २८. पर्वतशिखरें, गारा, मारुति, वृष्टि करणारा मेघ, यांच्या योगें. २९. विझला. (मेला.)

[1]तदुपरि स **म** र कराया **अ**कंपनाला **द**शानन प्रेषी[2]; ।
**मा**रुतितरुप्रहारें पावे मरणासि तो [3]सुरद्वेषी. ॥ ३९७

**द**शमुख नि **ज** प्रधान **प्र**हस्त जो, त्यासही रणा धाडी; ।
त्याचें [4]जीवनधन, तो **नी**ल [5]हरी, घालुनि स्वयें [6]धाडी. ॥ ३९८

सचिवाचा क्ष **य** होतां, झाला **द**शकंठ शोकभयमग्न; ।
भग्नमनोरथ ज्याचे, मानस [7]चिंताख्यपीठसंलग्न. ॥ ३९९

मग [8]रक्षःकुं **ज** र तो, घेउनि सेनेसह स्वपुत्रास; ।
वानरबलासि येउनि, देता झाला [9]जगद्रिपु त्रास. ॥ ४००

ते दुंदुभि तो[10] **य** दरव, [11]दरवर वीणा मृदंग वाजविती; ।
[12]गजहयरथचक्रध्वनि [13]भटसिंहध्वान भुवन गाजविती. ॥ ४०१

कांपे [14]धरा थ **रा** रा, गिरि चळती, [15]अब्धि होय संक्षुब्ध; ।
[16]पांसु [17]प्रांशूष्णांशुद्युति चोरुनि, होय [18]सुरनदीलुब्ध. ॥ ४०२

[19]प्रांशु ध्वज हे **म** मय, [20]द्विप गिरिसे, रथ [21]विमानसंकाश; ।
[22]खगपतिगति [23]हय ऐसें, सैन्य करी निरवकाश आकाश. ॥ ४०३

[24]वासवनील **श्री** तो, [25]कवची [26]खड्गी [27]गदी शरी चापी; ।
[28]प्रासी शूली कुंती, मुसली **द**शकंठ पातला पापी. ॥ ४०४

[29]कपिबलपा **रा** वारीं **द**शमुख शिरला जसा [30]महामकर; ।
‘[31]मामकरक्षोवृंदीं,’ म्हणे ‘कसा शर धरील **रा**मकर.’ ॥ ४०५

तो समर लो[32] **म** हर्षण केला, त्याला तुला नसे कांहीं; ।
[33]केशाकेशि [34]नखानखि, [35]मुष्टामुष्टि प्लवंगलोकांहीं. ॥ ४०६

---

१. नंतर. २. पाठवी. ३. राक्षस. ४. प्राणद्रव्य. ५. हरण करी. ६. घाला. ७. चिंतानामक आसनावर स्थित. ८. राक्षसांमधील गज, राक्षसवर. ९. जगाचा शत्रु. १०. मेघवत् शब्द करणारे नगारे. ११. उत्तम शंख. १२. हत्ती, घोडे, रथचक्र, यांचे शब्द. १३. वीरसिंहनाद. १४. पृथ्वी. १५. समुद्र हालून गेला. १६. धूळ. १७. अतितीक्ष्ण सूर्यतेज. १८. गंगालुब्ध. १९. उंच. २०. हत्ती. २१. विमानतुल्य. २२. गरुडतुल्यगती. २३. घोडे. २४. पाचूसारिखी नील कांति ज्याची असा. २५. कवचधारी. २६. खड्गधारी. २७. गदाधारी. २८. प्रास (भाल्यासारखें शस्त्र) धरणारा. याला 'मांग' म्हणतात. २९. वानरसैन्यसमुद्रीं. ३०. मोठा मत्स्य. ३१. माझ्या राक्षससमूहीं. ३२. अंगावर कांटा उत्पन्न करणारा. ३३. परस्पर केश धरून युद्ध करणें. ३४. परस्पर नखप्रहार. ३५. परस्पर मुष्टिप्रहार.

नानायुधव्र[1] **ज** क्षत कपि कोपें पादपाद्रिशिखराहीं[2]; ।
रात्रिंचरसेनेला[3] मर्दिति पदमुष्टिदंतनखरांहीं[4]. ॥ ४०७
मृतगजह **य** देहातें हातें उचलोनि मारिती रिपुला; ।
क्षतरक्षःक्षतजांच्या[5] क्षितिपृष्ठीं वाहती नदी विपुला[6]. ॥ ४०८
दुर्बुद्धिमंदि[7] **रा** तें **द**शकंठाच्या कठोर हृदयातें; ।
मुष्टिद्रुमोपलांहीं[8] **मा**रुति ताडी रणांत अदयातें[9]. ॥ ४०९
मग निरुप **म** रणं[10] केला **नी**लानें **रा**क्षसेश्वरासहित; ।
अहितनय[11] तसा दंशेंहि[12], करिता झाला वधावया अहित[13]. ॥
दशमुखभु[14] **ज** भुजगाशुगदंष्ट्राविद्धांग **नी**ल मोहातें ।
पावे, तों करि **ल**क्ष्मण शैलेला[15]सम **पं**क्तितुंडदेहातें[16]. ॥ ४११
**द**शवदनें **यं**[17] मनियमें विधिच्या चरणीं धरूनि आसक्ती; ।
भक्तीनें मेळविली, ते **सौ**मित्रीसि अर्पिली शक्ती[18]. ॥ ४१२
**य**मदंष्ट्रा भु **ज** गी कीं, ते शक्ति प्रलयवन्हिची ज्वाला; ।
मूर्च्छेसह येउनियां सेवी **सौ**मित्रिवीरहृच्छाला[19]. ॥ ४१३
बंधुपराज **य** होतां, **रा**महि चित्तांत पावला कोप; ।
तो पवनसुतस्कंधीं[20] बैसे, उदयाचलीं जसा **गो**पें[21]. ॥ ४१४
तेंव्हां तो असु **रा** वर राव **र**घूंचा शरव्रजें[22] वर्षे; ।
स्पर्शे जो शर रिपुला, तो त्याच्या रक्तसेवनें हर्षे. ॥ ४१५
**रा**म गमे प्रं[23] **म** थपती, **रा**वण भासे रणांत अंधकसा[24]; ।
रघुवर म्हणे, '**द**शास्या! स्वार्थें झालासि मूढ अंध कसा ? ४१६
पापें विगतें[25] **श्री** तूं झालाशि, सदा जगद्विनाशरत[26]; ।
शरतल्पीं[27] तुज निजविन, परत खला! त्वरित हो रणापरत[28].' ॥

---

१. अनेक शस्त्रसमूहक्षतें ज्यांस असे. २. वृक्ष व पर्वतशिखरें यांनीं. ३. राक्षससैन्याला. ४. पायांनीं, मुठींनीं, दातांनीं आणि नखांनीं. ५. तोडलेल्या राक्षसांच्या रक्ताच्या. ६. पुष्कळ. ७. दुर्बुद्धीचें ग्रह असें. ('हृदय'शब्दाचें विशेषण.) ८. मुष्टि, वृक्ष, दगड यांनीं. ९. निर्दयास. १०. 'समर' आणि 'रण' हे शब्द पुल्लिंगी आहेत. ११. सर्प. १२. चावणें. १३. शत्रु. १४. रावणभुजसर्पाच्या बाणरूप दाढांनीं भिन्नांग. १५.साळिंदर नावाच्या पक्ष्यासारखें. (यांच्या आंगावर कांटे असतात, त्यांला 'सालपीस' म्हणतात. त्या कांट्यांप्रमाणें रावणाचें अंग कांट्यांनीं भरून टाकिलें असा भाव.) १६. दशमुखदेहातें. १७. यमादिसाधनांनीं. १८. शस्त्रविशेष. १९. हृदयशाला. २०. मारुतीच्या खांद्यावर. २१. सूर्य. २२. बाणसमूह. २३. प्रमथांचा शिवगणाचा स्वामी. (शिव.) २४. दैत्यविशेष त्यासारखा. २५. निस्तेज. २६. जगन्नाशतत्पर. २७. बाणशय्येच्या ठायीं. २८. युद्धनिवृत्त, रणाविषयीं अपरत म्ह० विश्रांत हो.

ऐसें वदतां **रा** गें **रावण** धांवे [1]प्रमत्तकासरसा; ।
गिरि[2]विपिनांसह कांपे, भिवूनि **लं**काविनायकास [3]रसा. ॥ ४१८

**रावण** पर **म** क्रोधें [4]विशिखें वर्षे जसा [5]महांबुधर; ।
[6]धरसा निश्चल भासे, **राघवराजा** [7]महेषुचापधर. ॥ ४१९

**राम**शरत्र **ज** विद्ध, [8]क्षणदाचर तो दिसे जसा [9]शैल्य; ।
[10]शैल्यव्याकुळ होउनि, विसरे संपूर्ण युद्धकौशल्य. ॥ ४२०

[11]रामहरिद्व **य** मार्गणकिरणांहीं [12]असुरघूक तो त्रास ।
पावे, कीं **रावण**गज साहेना [13]राघवेषुतोत्रास. ॥ ४२१

घेउनि धिःका **रा** तें, जय देउनि **राम**बाहुदंडातें; ।
[14]यातु गृहीं जाय, [15]गणी कोदं[16]डातेंचि **[17]का**लदंडातें. ॥ ४२२

हृदयीं म्हणे, '**[18]मं** हेंद्र प्रतापसूर्येंकरूनि तापविला; ।
[19]पविला गणिलें नाहीं, [20]शीतार्दितसा [21]सुरौघ कांपविला. ४२३

पूर्वी मी स्वभु **ज** बळें **कै**लासाख्य [22]क्ष्माध्र हालविला; ।
नि[23]श्वाससमारुतानें [24]सुरप्रतापप्रदीप मालविला. ॥ ४२४

नर कपि, भ **य** सोडुनियां, करिती सर्वत्र [25]पारणा, [26]मांजी; ।
सेना मारुनि, यास्तव मातें झाली [27]त्रपा रणामाजी. ॥ ४२५

**विधि[28]पांसुनी** **[29]ज** धीं मी, दुर्लभवर पावलों [30]तधीं चुकलों; ।
नर कपि गणिले नाहीं, [31]सर्वस्वाला म्हणोनियां मुकलों. ॥ ४२६

केला [32]अविन **य** पूर्वी, कपिमुख**नं**दीश्वरास मी हसलों; ।
कपिकृत [33]कुललय ऐसा, [34]शापहि पावोनियां उगा बसलों. ४२७

**रविवंशज** **रा** जयीं [35]अनरण्य प्राज्ञ बोलिला, 'तुजला; ।
मत्कुलज वीर मारिल' तें हें संप्राप्त जाहलें मजला. ॥ ४२८

---

१. उन्मत्तरेड्याप्रमाण. २. पर्वतवनांसह. ३. पृथ्वी. ४. बाणें. ५. मोठा मेघ. ६. पर्वतसा. ७. महाबाण धनुर्धारी. ८. राक्षस. ९. माळपक्षी. १०. बाणाग्रव्यथित. ११. राम हाच हरिद्व्य म्ह० सूर्य त्याच्या बाणरूप किरणांनीं. १२. रावणघुबड. १३. रामबाणरूप चाबुकास. १४. राक्षस. (रावण.) १५. मानी. १६. धनुष्यातेंचि. १७ यमदंडातें. १८. श्रेष्ठ, इंद्र. १९. वज्राला. २०. थंडीनें पीडितसा. २१. देवसमूह. २२. पर्वत. २३. श्वासवायूनें. २४. देवांचा पराक्रमरूप दिवा. २५. तृप्ति. २६. माझी. २७. लज्जा. २८. ब्रह्मदेवापासून. २९. जेव्हां. ३०. तेव्हां. ३१. स्वार्थाला. ३२. अन्याय. ३३. कुलनाश. ३४. रावण नंदीला पाहून उपहासपूर्वक हंसला, कारण नंदीचें मुख वानरासारिखें होतें. तेव्हां राग येऊन नंदीनें 'तुझा कुलक्षय वानरच करतील' असा रावणाला शाप दिला, या कथेचा एथें संबंध आहे. ३५. अनरण्य राजाशीं रावणाचें युद्ध झालें, तेव्हां त्यानें रावणाला शाप दिला कीं, 'राम तुझा सकुल नाश करील' (वा० रा० उ० कां० स० १९ श्लो० ३०).

रिपुपासूनि **म** हद्भय आलें, आतां सहाय धैर्य [1]मतें; ।
[2]अर्यमतेज [3]विपत्तमशमनीं चित्तस्थिरत्व [4]आर्यमतें.' ॥ ४२९

ऐसें तो नष्ट **श्री** चित्तीं चिंतूनि, [5]रात्रिचर [6]अयुत; ।
आणुनि म्हणे, 'करा जा [7]मदनुज निद्रेकरूनियां [8]वियुत.' ॥ ४३०

मग सत्वर **रा** त्रिचर गेले तों **कुं**भकर्ण उठवाया; ।
पाठविले **द**शवदनें, जे तन्निद्राघनासि लुटवाया. ॥ ४३१

त्याच्या [9]निकट **म** धुरुधिरघट शतसंख्याक ठेविती पूर्ण; ।
मत्स्यवराहमहिषमृगमांसांचे राशि निर्मिती [10]तूर्ण. ॥ ४३२

**विं**ध्य तसा, नि **ज** ला तो; [11]वदनदरीमाजि [12]निबिड आंधार ।
फार भयंकर भासे, पातालाचेंचि काय तें दार. ॥ ४३३

[13]श्वासानिल **य** पतित क्षणदाचर [14]तूलतुल्य ते भ्रमती; ।
[15]नासाप्रवेशनिर्गमगतागतें मशकसे किती श्रमती. ॥ ४३४

'हे **कुं**भकर्ण! **रा** जा बलाविती' मारिती अशा हाका; ।
हा कांहींच वदेना, निद्राप्रिय [16]इंद्रशत्रुचा काका. ॥ ४३५

[17]एकसहस्र **म** हारवदुंदुभिसहि ताडिले कितेकांहीं; ।
मुद्गरमुसलें करिती ताडन, परि लागती न ते कांहीं. ॥ ४३६

[18]शतसंख्याक **ज** लाचे कुंभहि आणूनि [19]रिचविले कानीं; ।
[20]केशोन्मूलन केलें, झाले निजकंठ शुष्क हाकांनीं. ॥ ४३७

चाउनियां [21]कां **य** बलें धांवति, अंगावरूनियां हसती; ।
[22]मृतवन्यगजास जसे, [23]वायसगण वेष्टिती तसे दिसती. ॥ ४३८

[24]दशशत **ग** **ज** देहावर चालविले, ताडिलीं शिलाशिखरें; ।
[25]निद्रापराजयास्तव केलें त्यांहीं प्रसिद्ध युद्ध खरें. ॥ ४३९

---

१. मतें. २. सूर्यतेज. ३. संकटांधकारनाशनीं. ४. श्रेष्ठमतेंकरून. ५ राक्षस. ६. दहाहजार. ७. माझा बंधु. ८. रहित. ९. जवळ. १०. शीघ्र. ११. मुखगुहेंत. १२. अतिशय. १३. श्वासाच्या वायुवेगें पडलेले. १४. कापसासारखे. १५. नाकांत जाण्यायेण्याच्या आयासानें. १६. इंद्रजिताचा. १७. एकहजार महाशब्द करणारे नगारे. १८. शंभर. १९. रिक्त केले, ओतले. २०. केश उपटणें. २१. देह. २२. मेलेल्या रानटी हत्तीस. २३ कावळ्याचे समूह. २४. हजार. २५. निद्रेचा पराभव करण्यासाठीं.

ऐसा बहुतां **य** त्नें जागा केला, जसा महा**काल**. ।
मधुलोहितघट[1] घटघट सेवी मांसासमेत[2] तत्काल. ॥ ४४०

क्षुत्तृट्परिहा[3] **रा** तें, करूनि निद्रालसस्वभावानें[4]; ।
क्रव्यादांसि[5] म्हणे, 'मज ऊठविलें किंनिमित्त[6] भावानें.' ४४१

ते म्हणती, 'स **म** रीं बहु **रा**मानें मारिलें पलाशबल[7]; ।
शवलक्षें[8] धरणीतल केलें शाखामृगव्रजें[9] शबल[10]. ॥ ४४२

यास्तव राजा **श्री** मान् वांछितसे आज तूज देखाया; ।
वीरमणे! रिपु मारुनि, मांस शिवावायसांसि[11] दे खाया.' ४४३

तो **कुं**भकर्ण **रा** क्षस ऐसें ऐकोनि करुनियां स्नान; ।
ध्यान धरुनि, शीघ्र करी विंशतिशतकुंभमित[12] सुरापान[13]. ४४४

कलशश्रुति[14] **म** दिरामदमत्त[15] महाकाय[16] वन्यकुंजरसा[17]; ।
**द**शकंठाप्रति जातां, पादन्यासें[18] करी सकंप रसा[19]. ॥ ४४५

हासति केश **ज** याचे, जलदव्यासाग्रपारियात्रास[20]; ।
यात्रा[21] सदैव ज्याची देवांसह दे शचिप्रिया[22] त्रास. ॥ ४४६

कपिसेनेला **य** मसा गमला, मग लागले पळायाला; ।
कारण झाले यूथप[23] **रा**माला वृत्त हें कळायाला. ॥ ४४७

**र**घुपति श[24] **रा** सनातें घेउनि, युद्धांगणीं उभा ठाके; ।
या केवळ विकटाला[25] अवलोकुनि, तत्क्षणीं मनीं धाके. ४४८

'प्रचलितहि[26] **म** गिरिसम हा कोण?' असें तो **बि**भीषणास पुसे; ।
रिपुसेनेवांचुनि कां हे कपि पळती भयश्लथवपुसे[27]?' ॥ ४४९

**द**शकंठानु **ज** तेव्हां म्हणे, 'विभो! हा अनंतबलसिंधू[28]; ।
सिंधुरगति[29] सुप्तोत्थित[30] निद्रालस **कुं**भकर्ण मद्बंधू. ॥ ४५०

---

१. मद्याच्या आणि रक्ताच्या घागरी. २. मांसासहित. ३. क्षुधा आणि तृषा यांच्या शमनातें. ४. निद्रेनें आळशी ज्याचा स्वभाव त्यानें. ५. राक्षसांस. ६. कोणत्या कारणास्तव. ७. राक्षससैन्य. ८. प्रेतांच्या लक्षानें. ९. वानरसमूहें. १०. चित्रवर्ण असें. ११. कोल्हे कावळे यांसि. १२. दोनहजार घागरी भरून. १३. मद्य. १४. कुंभकर्ण. १५. मद्यमदोन्मत्त. १६. बृहत्काय, स्थूलदेह. १७. वनगजासारखा. १८. पाय जमिनीवर ठेविल्यानें. १९. पृथ्वी. २०. मेघवेष्टितशिखर अशा पारियात्रपर्वतास. २१. गमन. २२. इंद्रास. २३ सेनामुख्य. (सरदार.) २४. धनुष्यानें. २५. भयंकराला. २६. चालणाऱ्या हिमाचलातुल्य. २७. भयेंकरून विकलदेहसे. २८. अमितबलाचा सागर. २९. गजगती. ३०. निद्रेंतून उठलेला.

बहुलोकक्ष **य** याणें उपजत केला, तधीं [1]शतक्रतुला ।
मुनिजन कथिती, तेव्हां क्रोध धरी कीं नसे जयास [2]तुला. ॥
**अमरपति** [3]**ज** यंतपिता यातें वज्रेंकरूनियां ताडी; ।
हा ही [4]शतकोटिकठिणमुष्ट्याघातेंचि **जिष्णु**ला पाडी. ४५२
आत्मपराज **य** **इंद्रें** कथितां, **ब्रह्मा** म्हणे, 'असा पापी; ।
हा पीडाकर राक्षस [5]मृतकल्प सदा निजो असें शापी.'॥४५३
त्या समयीं तो [6]**रा** वणधृतपद **वि**धि, 'हा निजोनि सा मास, ।
जागो एकदिवस' हें बोले, पुरवी [7]प्रपौत्रकामास. ॥ ४५४
हा तोचि **पि**[8]ता **म** हमुखलब्धमहाशापदग्ध [9]घटकर्ण; ।
अर्णव महाबलाचा, येतो [10]पांनीयमृद्धटावर्ण. ॥ ४५५
हा [9]घटकर्ण **श्री** मान् बलवान् रणदक्ष [11]युद्धकामानें; ।
**रा**मा ! नेणुनि तुजला, उठवीला **पं**क्ति[12]कंठनामानें. ॥ ४५६
**विधिशापप** **रा** जित हा येईल, बळें करावयास रण; ।
यास [13]रणत्पत्र तुझे शर नेतिल [14]**जा**नकीप्रिया ! [15]सरण.'॥४५७
अग्रजपादीं **म** स्तक ठेवी, जावूनि [16]तूर्ण **घ**टकर्ण; ।
पुसतां जागरकारण, त्यास म्हणे [17]**पं**क्तितुंड [18]आकर्ण.॥४५८
**'राघव सानु ज** आला, समुद्र तरला करूनि सेतूतें; ।
[19]रक्षःप्रवीर वधिले, हें कांहीं ठाउकें नसे तूतें. ॥ ४५९
तुजवांचूनि **य** शस्वी त्याला [20]वैरी असा नसे कोणी; ।
[21]शोणितें पी, जा, नरकपि मारुनि, कर शत्रुवर्जित [22]क्षोणी.'॥
तों **कुं**भकर्ण **रा** गें म्हणे, 'तुला बोध जाहला पहिला; ।
[23]अहिलालनलीलासी, सोडावी शीघ्र शत्रुची [24]महिला.॥ ४६१
बोध असा **स्व म** नीं तूं न धरुनि, धरिले सदा [25]स्मरक्रोध; ।
जो धर्म तो त्यजुनियां, केला [26]सत्सेव्यमार्गसंरोध. ॥ ४६२

---

१. शत क्रतु म्ह० शंभर यज्ञ ज्यानें केले त्याला इंद्रपद मिळून 'शतक्रतु' हें नांव मिळतें, याजवरून शतक्रतु म्ह० इंद्र. २. उपमा, तुलना. ३. जयंताचा बाप. (इंद्र.) ४. वज्रासारख्या कठिण मुष्टिप्रहारानेंचि. ५. मृततुल्य. ६. ज्याचे पाय रावणानें धरले आहेत असा (विधि). ७. पणतूच्या इच्छेस. ८. ब्रह्ममुखलब्धशापें दग्ध. ९. कुंभकर्ण. १०. मेघपंक्तितुल्यकांति. ११. युद्धेच्छेनें. १२. रावणें. १३. शब्द करणारे पंख ज्यांचे असे (बाण). १४. हे रामा. १५. चिता. १६. शीघ्र. १७. रावण. १८. ऐक. १९. राक्षसश्रेष्ठ. २०. निवारी. २१. रक्त. २२. पृथ्वी. २३. सर्पपालनक्रीडातुल्य. २४. स्त्री. २५. कामक्रोध. २६. साधुसेव्य मार्गाचा रोध.

हरुनि बळें **ज**नकसुता, **रा**माशीं लाविला वृथा दावा[1]; ।
दावानें[2] गृह गिळिलें, मग म्हणशी कूपयोग्य[3] भू दावा.' ४६३
जीवितसंश[4]**य** झाला, हित कथिलें तें न मानिलें कानें; ।
आतां काय करावें? भावानें कीं स्वकीयलेंकानें. ॥ ४६४
**रा**मापासुनि **ज**य तो दुर्लभ, परि मी करूनियां युद्ध; ।
क्रुद्धक्षितिजेशशरज्वलनीं[5] होईन जाउनी शुद्ध.' ॥ ४६५
ऐसा तो अन्या**य** स्थापुनि निजबंधुच्या शिरीं सत्य; ।
अत्यद्भुतबल **रा**वण पाद स्वशिरीं धरी जसा भृत्य. ॥ ४६६
लंकेश स्वक**रा** नें अर्पी अनुजासि कुंडलें[6] कटकें[7]; ।
कटकें[8] देऊनि म्हणे, 'जा विजयी हो वधूनि मर्कटकें[9].' ४६७
तों **कुं**भकर्ण **म**ग बहु कटकें घेऊनि जाय समरातें; ।
तेव्हां अति भय झालें, कपिवीरांतें तसेंचि अमरांतें. ॥ ४६८
कल्पांतशिखि**श्री**[10] तो घटकर्ण[11] निघे धरूनियां शूल[12]; ।
गर्जे बलवत्तर तो, वानरकटकीं उठे शिरःशूल[13]. ॥ ४६९
नगरीप्राका[14]**रा** तें लंघुनि आला असा महाशूल[15]; ।
नासाश्वासें[16] त्याच्या उडती कपिवीर ते, जसा तूल[17]. ॥ ४७०
हरिल प्राण **म**हारिपु, म्हणूनी पळती भयार्तचित्त[18] हरी[19]; ।
हरिणासम कपि गमती त्यांमध्यें एक कुंभकर्ण हरी[20]. ४७१
तो दुर्धर[21] र**ज**नीचर शतशः प्लवगांसि आननीं वैरी[22]; ।
करपदशूलाघातें मर्दी रघुवीरवाहिनी[23] वैरी. ॥ ४७२
अंगदगव[24]**य** गवाक्षप्रजंघनलनीलमारुतिप्रमुख ।
समजाउनि सैन्यातें, फिरविति जीं जाहलीं भयें विमुख. ४७३
घटकर्णशि[25]**रा** वर ते **मा**रुतिनें टाकिले बळें शिखरी[26]; ।
शूलाघातें त्यांचें रज[27] कलशश्रोत्र मूतलीं विखरी[28]. ॥ ४७४

---

१. वैर. २. वणव्यानें. ३. विहिर खणण्यास योग्य असी. ४. प्राण राहण्याचा संशय. ५. कुपित रामबाणाग्नींत. ६. कर्णभूषणें. ७. हस्तभूषणें. (कडीं.) ८. सैन्यें. ९. माकडें. १०. प्रलयाग्नीची शोभा ज्यास असा. ११. कुंभकर्ण. १२. आयुधविशेष. १३. कपाळशूळ. १४. लंकेच्या कोटातें. १५. महान् शूल ज्याचा असा. १६. नाकाच्या श्वासानें. १७. कापूस. १८. भयत्रस्त मानस. १९. वानर. २०. सिंह. २१. दुर्निवार. २२. भरी. २३. रामसेना. २४. वानरविशेष. २५. कुंभकर्णाच्या मस्तकावर. २६. पर्वत. २७. धूळ. २८. पसरी.

[1]भारसहस्र **म** य [2]महाशूल [3]क्षेपी **म**रुत्सुतावरतें; ।
वरचेवर तें झेलुनि, **मा**रुतिनें भंगिलें [4]निर्युद्धरतें. ॥ ४७५
[5]खदिरकुट **ज** धवसरलस्यंदनतरुबिल्वतालसालवट ।
वर्षति **घटकर्णा**वर कपिवर होऊनि सर्व एकवट. ॥ ४७६
[6]उच्चशिलोच्च **य** शिखरें **घटकर्णा**च्या शिरावरी पडती; ।
[7]कंदुकसम [8]**इंदुकमल**बांधवपर्यंत ते रणीं उडती. ॥ ४७७
[9]बहुलक्षत **ज** समुक्षित [10]कपिबलगत [11]फुल्लपर्णवनवर्ण; ।
[12]अर्णवकुक्षिगवाडव, तैसा भासे प्रचंड **घटकर्ण**. ॥ ४७८
[13]वृक्षशिलोच्च **य** सहित प्लवगबलातें गिळी महाकाय; ।
नासाकर्णद्वारें असतां, त्या वानरांसि भय काय? ॥ ४७९
गंधानें रुधि **रा** च्या प्रमत्त होऊनि आत्मपरि सेना ।
मर्दी, कमलवनाला [14]वारणसा, [15]वारणासि परिसेना. ॥ ४८०
केला प्लवंग **म** क्षय, **अंगद**न**ल**नील**मा**रुतिप्रमुख; ।
[16]स्वमुखज्वलनपदकरद्रुमगिरिशिखरादिकीं करी [17]विमुख. ॥ ४८१
तदुपरि तो **श्री** लक्ष्मण त्यास म्हणे, 'रे! निवार बाणातें; ।
हा खंडितों तुझ्या मी हृदयासह [18]हेमवारबाणातें.' ॥ ४८२
तों **कुंभकर्ण** **रा** क्षस धांवे **सौ**मित्रिला वधायाला; ।
[19]वसुधा यालागिं भयें कांपे, दे शाप [20]अविबुधा याला. ॥ ४८३
संग्राम पर **म** तुमुल [21]क्षणदाचरलक्ष्मणासवें झाला; ।
ज्याला [22]तुलाचि नाहीं, कोप तदा ये [23]प्लवंगराजाला. ॥ ४८४
उचलुनियां [24]**जें** गतीधर **घटकर्णा**च्या शिरावरि क्षेपी; ।
ते पिष्ट सर्व झाले, तें रज [25]खसरिज्जलार्करुचितें [26]पी. ॥ ४८५

---

१. हजारभार वजन. (एक भार=३४½ मण, ८ शेर, २ तोळे, ४ मासे.) २. मोठें आयुध. ३. टाकी. ४. अतियुद्धतत्परें किंवा बाहुयुद्धरतें. ५. खैर, कुड्याचें झाड, धावड्याचें झाड, देवदारु वृक्ष, तिवसाचें झाड, बेले, ताड, सागाचें झाड, आणि वड. ६. उंचपर्वतशिखरें. ७. चेंडूसारखे. ८. चंद्रसूर्यपर्यंत. ९. बहुरक्तानें भरलेला. १०. वानरसैन्यांत शिरलेला. ११. पुष्पितपळसयुक्त वनतुल्य. १२. समुद्रमध्यस्थ वडवानळ. १३. वृक्षपर्वतसहित. १४. गजसा. १५. निवारणासी. १६. आपल्या मुखांतील अग्नि, पाय, हात, वृक्ष आणि पर्वताचीं शिखरें यानीं. १७ पराङ्मुख, ज्यानें तोंड फिरविलें आहे असा. १८. सुवर्णकवचातें. १९. पृथ्वी. २०. मूढा. २१. राक्षसलक्ष्मणाशीं. २२. तुलनाचि. २३. सुग्रीवाला. २४. पर्वत. २५. गंगाजल, सूर्यकांति यांतें. २६. प्राशी.

दोघेहि विज **य** कामुक नियुद्ध करिती जसे प्रमत्त करी; ।
विंध्य स्वर्णाद्री कीं, ऐशी शंका मनीं निवास करी. ॥ ४८६
ते दोघे रुधि **रा** र्द्र प्रोच्चमहादेह भासती समरीं; ।
पुष्पितपर्णवनावृत पर्वत, कीं दावबन्हिदीप्त गिरी. ॥ ४८७
करितां संग्रा **म** असा, अशनिकठिनमुष्टिताडणें हरिला ।
मूर्छित भूवरि पाडुनि, नियुताधिकवीरसंघ संहरिला. ॥ ४८८
त्या असुरकुं **ज** रानें सैन्यसमुद्रीं करूनियां क्रीडा ।
कपियादोगण मथिले, तैं दिङ्मातंग पावले व्रीडा. ॥ ४८९
'कपिसमुदा **य** स्वामी **सु**ग्रीव करीतसे बलत्राण; ।
त्याला न्यावें म्हणजे, होइल हें सैन्य निर्गतप्राण.' ॥ ४९०
**कुं**भश्रुति नि **ज** चित्तीं ऐसें चिंतूनि वानरेशाला ।
घेउनि नगरामध्यें जातां दावी मृगारिवेशाला. ॥ ४९१
तों वानरना **य** क तो सावध होऊनियां महाप्राण; ।
घ्राणश्रुतियुगुलातें घेऊनि उडे, करी यशस्त्राण. ॥ ४९२
कोपें असा प **रा** भव घटकर्णाचा करोनियां सहसा, ।
कंदुकसा जाय नभीं, सांगे देवासि काय, 'यास हसा.' ॥ ४९३
तेव्हां निश्चित **म** रण क्रोधें घेऊनि परिघ तो परते; ।
भक्षी रगडी ताडी हरिला, युद्धासि न टळती परि ते. ॥ ४९४
त्या समयीं तो **श्री** मान् **सी**तापति कार्मुकासि धरुनि करें ।
निकरें **घ**टकर्णातें ताडी शतकोटितीव्रशरनिकरें. ॥ ४९५

---

१. जयेच्छु. २. बाहुयुद्ध. ३. गज. ४. मेरुपर्वत. (यालाच हेमाद्रि, रत्नसानु, सुरालय, अशीं नांवें आहेत.) ५. रक्तानें भिजलेले. ६. अतिउंच मोठे देह ज्यांचे असे. ७. फुललेल्या पळसवनानें वेष्टित. ८. वणव्यानें पेटलेले. ९. वज्रासारख्या कठिनमुष्टिताडनें. १०. वानरा. ११. दहालक्षांपेक्षां ज्यास्त वीरांचा समूह. १२. राक्षसश्रेष्ठें. १३. वानररूप जलचरें. १४. दिक् म्ह० दिशा आणि त्याच्या ठायीं ठेविलेले मातंग म्ह० हत्ती असा शब्दार्थ. पृथ्वीला सांभाळून धरण्यासाठीं तिच्या आठ बाजूंला एक एक मोठा हत्ती ठेविला आहे, त्यास दिग्गज अथवा दिङ्मातंग म्हणतात. हे आठ आहेत. यांचीं नांवें:—'ऐरावतः पुंडरीको वामनः कुमुदोऽजनः । पुष्पदन्तः सार्वभौमः सुप्रतीकश्च दिग्गजाः ॥' १५. लज्जा. १६. सैन्यरक्षण. १७. हीनबल, मेल्यासारखें. १८. कुंभकर्ण. १९. सुग्रीवा. २०. सिंहवेषा. २१. महाबल. २२. नासिकाकर्णद्वयातें. २३. कीर्तिरक्षण. २४. कुंभकर्ण. २५. गदा. २६. परंतु. २७. धनुष्यासी. २८. नेटानें. २९. वज्रसम तीक्ष्णशरांच्या समूहानें.

कोपांधनेत्र **रा** क्षस निजपरसेना रणांगणीं रगडी; ।
**का**लानें पाठविला तो बहुधा आपुलाच वीर गडी. ॥ ४९६
तो समर [1]लो **म** हर्षण झाला, जेथें असंख्य रक्तनदी ।
वाहति, ज्यांत [2]धरारुहकपिरथरक्षःक्रमेलकाश्वरदी. ॥ ४९७
[3]वानरकर **ज** रद्द्रुमगिरिशिखराघातविक्षितांग रिपू ।
करि पुष्कळ [4]हरिपुंगवमर्दन, भरि पूर्ण तत्क्षणीं [5]हरिपू.॥४९८
जाणों **र**घुना **य** क [6]हरि [7]**क**लशश्रुति तो मदांध [8]वन्यकरी; ।
कीं [9]**रा**मवासवाशीं तो [7]**क**लशश्रोत्र [10]**जं**भ युद्ध करी. ॥४९९
त्याच्या [11]दक्षक **रा** तें [12]परिघासह **राम** [13]मार्गणें छेदी; ।
भेदी [14]वामभुजातें, अभय तयाच्या पदासही [15]नेदी. ॥५००
[16]**रा**मप्रहित **म** हे षुच्छिन्न**क**लशकर्णपाददोर्दंड ।
चंड महा [17]जगतीं ते हरिति [18]हरिप्राण जेंवि **य**मदंड.॥५०१
[19]अर्धद्विजरा **ज** निभ [20]क्षुरप्र सोडूनि मस्तकासि हरी; ।
[21]हरि तेव्हां आनंदें गर्जति, जैसे [22]हतेभराज हरी. ॥ ५०२
'**र**घुराजो [23]जे **य** तितरां' ऐसें कपिसंघ गर्जती समरीं; ।
अमरीं जयध्वनीनें नभ भरिलें [24]तत्पदांबुजभ्रमरीं. ॥ ५०३
[25]**रा**वणअनु **ज** विनाश स्वभुजच्छेदासमान तो [26]भावी, ।
'[27]हां ! वीर ! **श**क्रदुःसह [28]मर्त्यकरें हे तुझी दशा व्हावी!॥५०४
ज्याला [29]**ह**रिह **य** मुख हे, सुर चळचळ कांपले [30]सुविक्रांत; ।
[31]श्रांत कसा तो झाला नरकपियुद्धीं ? न लावितां [32]प्रांत.'५०५

---

१. हर्षशोकादिकांनीं अंगावरील केश उभे करणारा, रोमहर्षण. २. वृक्ष, वानर, रथ, राक्षस, उंट, घोडे, व हत्ती. ३. वानर, नख, दंत, वृक्ष, पर्वत, शिखर, यांच्या ताडनानें भिन्न अंगें ज्याचीं असा. ४. वानरश्रेष्ठनाश.(व्याघ्र, पुंगव ,ऋषभ, कुंजर, सिंह, शार्दूल, नाग, इत्यादि शब्द समासांत उत्तरपदीं असतां श्रेष्ठार्थवाचक असतात, म्हणून 'पुंगव' याचा असा अर्थ एथें केला आहे:—'स्युरुत्तरपदे व्याघ्रपुंगवर्षभकुंजराः। सिंहशार्दूलनागाद्याः पुंसि श्रेष्ठार्थगोचराः॥') ५. इंद्रपुरी. ६. सिंह ७. कुंभकर्ण. ८. अरण्यगज. ९. रामरूप इंद्रासी. १०. दैत्यविशेष. ११. उजव्या हातातें. १२. गदेसह. १३. बाणानें. १४. डाव्या बाहुतें. १५. न देई. १६. रामानें मारलेल्या महाबाणांहीं छिन्न कुंभकर्णाचे पाय व बाहु. १७. जगतामध्यें. १८. वानरजीवित. १९. अर्धचंद्राकार. २०. बाणविशेष. २१. वानर. २२. मारिले गजेंद्र ज्यांहीं असे. २३. अतिशय जय पावतो. २४. त्याच्या (रामाच्या) चरणकमळीं जे भ्रमरासारिखे त्यांनीं (अमरीं.) २५. कुंभकर्णघात. २६. मानी. २७. हाय हाय. २८. मनुष्याच्या हातानें. २९. इंद्रादिक. ३०. उत्तम शूर. ३१. नष्टचेतन. (मेला.) ३२. शेवट.

[1]भयशोकप **रा** धीनस्वांत [2]पलाशेंद्र तप्ततनु झाला, ।
[3]तनुजांला चौघांला धाडी, तो कोप ये [4]अतनु ज्याला.॥५०६

अद्भुतविक्र **म** चौघे, **दे**वांतक एक, [5]रावणप्रकृती; ।
**अ**तिकाय दुजा, **त्रि**शिरा तिसरा, चवथा **न**रांतकाख्य [6]कृती.

दोघे भ्राते [7]सुं **श्री,** जे [8]युद्धोन्मत्त**म**त्तनामधर; ।
ते प्रेषिले रणाला, सर्व [9]महाकाय, काय [10]भूमिधर? ॥ ५०८

युद्धीं **म**होद **रा** ला, गिरिप्रहारें स्वयें वधी **नी**ल; ।
होय [11]महापार्श्वाभिधतूलीं तो ऋषभवन्हिची [12]कील. ॥ ५०९

**मा**रुतिहस्तें **म** रण **त्रि**शिरा **दे**वांतकासवें पावे; ।
यावेगळा **न**रांतक वधितां, [13]तारासुतासि जय फावे. ॥५१०

वचनें [14]प्रभं **ज** नाच्या, जाणुनियां [15]शत्रुजीवनावधिला; ।
[16]विध्यस्त्रें **रा**माच्या अनुजें **अ**तिकाय [17]संगरीं वधिला. ॥ ५११

पुत्रभ्रातृक्ष **य** हा ऐकुनि, **द**शकंठ जाहला विकल. ।
'कळतचि रिपुवन्हिमुखीं स्वकरें मीं होमिलें' म्हणे 'सकल.'॥

[18]**पौ**लस्त्य घाव **रा** हा बराचि झाला स्वपुत्रशोकानें, ।
लोकानें कथिल्यावर अप्रिय हें ऐकतांचि तो कानें. ॥ ५१३

जे दुर्जय अ **म** रांला, ते केले वानरें नरें भग्न; ।
विघ्न न होतां सागर लंघुनि झालेत [19]गोष्पदीं मग्न.॥ ५१४

इंद्रजितानें [20]**ज** नकस्वांताला तेधवां दिला धीर; ।
वीर प्रतापशाली, बोले तो [21]योधमंडलीं हीर. ॥ ५१५

'हा शरसंच **य** माझा, हे [22]दोर्दंड, हें महाचाप; ।
[23]ताता! [24]पद्मभवाचा वर असतां, पावलासि कां ताप? ॥५१६

विजय परा **ज** य दोन्हीं [25]पर्यायें भेटताति सकळाला; ।
यालागिं धीर टाकुनि, तूं घ्यावा व्यर्थ शोक न [26]जळाला.' ॥

---

१. यशाकोधीनचित्त. २. राक्षसेंद्र. ३. पुत्रांस. ४. मोठा. ५. रावणाचा प्रधान. ६. कुशल. ७. तेजस्वी. ८. हा रावणाचा सापत्न भ्राता आणि सचिव; यासच महोदर असें दुसरें नांव आहे. ९. स्थूलदेह. १०. पर्वत. ११. महापार्श्व राक्षस हाच कापूस त्याचे ठायीं. १२. ज्वाला. १३. अंगदासी. १४. वायूच्या. 'याला ब्रह्मदेवानें वर देऊन अवध्य कवच दिलें आहे, यास्तव याचा छेद ब्रह्मास्त्रानें कर; अन्यथा हा अवध्य आहे' असें वचन. (युद्धकांड, स० ७१ श्लो० ९६–९७). १५. शत्रूच्या आयुष्याच्या सीमेला. १६. ब्रह्मास्त्रें. १७. युद्धीं. १८. रावण. १९. गाईच्या पाउलाएवढ्या जागेंत. २०. रावणचित्ता. २१. वीरसमूहांत हिरा म्ह० श्रेष्ठ. २२. माझे बाहुदंड. २३. हे रावणा. २४. ब्रह्मदेवाचा. २५. अनुक्रमानें. २६. जळायाला.

**पौ**[1]लस्त्यतन **य** ऐसें वदोनि वंदी **स्व**तातचरणातें. ।
**द**शकंठ म्हणे, 'पुत्रा! तूं हो जा हेतु शत्रुमरणातें.' ॥ ९१८

तो **पं**क्तिकंध **रा** त्मज [2]शरकिरण **प्र**कट करुनियां त्वरित; ।
[3]हरितहयरथाच्यापरि, जाय [4]द्विट्जीवनासि [5]संहरित. ॥ ९१९

समरीं पिता **म** हास्त्रें **इं**द्रजितें त्या [6]हुतानलप्रबलें ।
कपि [7]सप्तषष्टिकोटि प्रसिद्ध वधिले, दुजीं असंख्य [8]बलें.॥ ९२०

**इं**द्रजितानें **श्री**मत् **दा**शरथी तेहि **वि**धि[9]वरें खिळिले; ।
**मा**रुति**बि**भीषणातें सोडुनि, मोहें प्लवंगपति गेले. ॥ ९२१

वानरजन **रा** ज**सु**गल**न**ल**जां**बव**दं**गदादि [10]यूथपती; ।
[11]सुपतीवर निजलेसे दिसती, देहीं [12]शराननें खुपती. ॥ ९२२

[13]राक्षसपति **मं** [14]ज्जास्थिक्षतजपललपूर्णमेदिनीशयनीं ।
[15]शरवस्त्रावृत पडले; [16]उन्मीलन ज्यांचिया **न**से नयनीं.॥ ९२३

ऐसा [17]**सु**रराज **ज** रिपु ब्रह्मास्त्रें करुनियां रणीं क्रीडा ।
**रा**मादिकांसि जिंकुनि गेला, देऊनि [18]साध्वसव्रीडा. ॥ ९२४

[19]**प**वनतन **य** त्या काळीं **बि**भीषणासहित [20]भूतसुखदात्री ।
[21]धात्री शोधुनि, पाहे मूर्छित**सु**गलादिकांसि तो रात्रीं.॥ ९२५

तों **जां**बवंत **रा** त्रीं पडला होता [22]धराधरावाणी; ।
[23]राक्षसपतिप्रयत्नें सावध होतां, अशी वदे वाणी. ॥ ९२६

'कुशल असे **म** रुदात्मज **बि**भीषणा! तूं विलोकिला आजी? ।
माझी कठिणावस्था! [24]सलते देहीं [25]महेषुची [26]राजी.' ॥ ९२७

[27]**द**शकंठानु **ज** तेंव्हां स्वयें पुसे तेथ [28]**जां**बवंतातें ।
'**सु**ग्रीव **रा**म टाकुनि, **ह**नुमंत कसा विचारिला [29]तातें.'॥ ९२८

---

१. रावणपुत्र. २. बाणरूप किरण. ३. सूर्यरथतुल्य. ४. शत्रुरूप उदकासि; (पक्षीं) शत्रुजीवितास. ५. आकर्षण करीत. (सूर्य आपल्या किरणांनीं उदक आकर्षून घेतो या तत्त्वास अनुलक्षून हें वर्णन आहे.) ६. अग्निसारख्या अतितेजस्व्यानें. ७. सदुसष्टकोटि. ८. सैन्यें. ९. ब्रह्मवरें. १०. सेनापति. ११. गादीवर. १२. बाणाग्रें. १३. राक्षसश्रेष्ठ. १४. मज्जा, हाडें, रक्त, मांस, यांहीं पूर्ण अशा पृथ्वीरूप शय्येवर. १५. बाणरूप वस्त्रवेष्टित. १६. उघडणें (नेत्रांचें.) १७. इंद्रजित्. १८. भयलज्जा. १९. मारुति. २०. प्राण्यास सुख देणारी. २१. पृथ्वी. २२. पर्वततुल्य. २३. बिभीषणप्रयत्नें. २४. खुपते. २५. मोठ्या बाणाची. २६. पंक्ति. २७. बिभीषण. २८. जांबवान. २९. जांबवान् हा ब्रह्मदेवाचा पुत्र आणि बिभीषण हा प्रपौत्र म्हणून 'तातें' असें बिभीषण म्हणतो.

यापरि संश **य** याला झाला, त्याला करावया दूर ।
विधिसुत[1] म्हणे, 'नसे भय, कल्याण जरी असेल [2]तो शूर. ॥

जरि एक **अं ज** नीसुत जीवंत असेल, तरि समस्तातें ।
शत्रुसमुद्रीं बुडतां, देइल तो जीवदानहस्तातें[3]. ॥ १३०

बल अप्रमे[4] **य** ज्याचें, शौर्योत्साहाद्यनंतगुणशाली,[5] ।
त्या लीलाकपितनुची[6] स्मृति म्हणउनि येधवां मला झाली.[7]' ॥

तों **वायुकुमा रा** नें क्षतविक्षतजांबवत्स्वदेहातें[8] ।
हातें केला स्पर्श, प्रभूतमूर्च्छाविलासगेहातें[9]. ॥ १३२

नंदन[10] पिता **म** हाचा **वायुसुताला** म्हणे, 'महाबाहो ! ।
सर्वांसि वांचवाया, याकालीं सानुकंप[11] तूं बा ! हो. ॥ १३३

**पवनसुता ! श्री**[12] कंठश्वशुराच्या निकट[13] शीघ्र सुमते[14] ! जा; ।
ओषधिपर्वत[15] तेथें असे, दिसे रात्रि सूर्यसमतेजा[16]. ॥ १३४

त्याच्या ठायीं वी **रा** ! ओषधि आहेत याचि अभिधानीं[17]; ।
संजीवनी[18], विशल्या[19], सुवर्णकरणी[20], तसीच संधानी[21]. ॥ १३५

या चार पर **म** यत्नें आणाव्या ओषधी सुदुष्प्रापा[22]. ।
बापा ! तुजला कांहीं दुष्कर नाहींच कार्य, निष्पापा ! ॥ १३६

एथें औषधि **ज** रि तूं घेउनि येशील शीघ्र तरि आज; ।
हा जनमान्यबलासह[23] विज्वर होईल तरणिकुलराज[24].' ॥ १३७

हें परिसुनी **य** शस्वी **मारुति** वे जांबवन्निदेशातें[25]; ।
**रामासि** नमुनि गेला, उडोनि तुहिनाचलप्रदेशातें[26]. ॥ १३८

---

१. ब्रह्मदेवाचा पुत्र जांबवान्. हा ब्रह्मदेवाच्या जृंभेपासून (जांभयीपासून) झालेला ऋक्षपुंगव. (बालकांड, स० १७ श्लो० ७.) २. हनुमंत. ३. जीवदानरूप हस्तातें. ४. निरुपम. ५. पराक्रमउत्साहादि अनेक गुणांहीं शोभणारा. ६. लीलेनें वानरदेह धरणाऱ्या मारुतीची. ७. (रामायण, युद्धकांड, स० ४ श्लो० १८—२४ पहा.) ८. छिन्नभिन्न जांबवंतदेहातें. ९. अतिमूर्च्छेच्या केलिस्थानातें. (देहाचें विशेषण.) १०. पुत्र. ११. सदय. १२. शिवाचा सासरा (हिमालय) त्याच्या. १३. जवळ. १४. हे सुबुद्धे. १५. हिमालयाच्या ऋषभ आणि कैलास या दोन शिखरांमधील पर्वत. १६. सूर्यतुल्य तेज ज्याचें असा. १७. नामांनीं. १८. मृतास जीवंत करणारी. १९. शल्याची पीडा दूर करणारी. (म्हणून हिला 'विशल्यकरणी' म्हणतात.) २०. देहादिकांचा वर्ण सुवर्णासारखा करणारी. २१. छिन्न झालेल्या मस्तकाच्या आणि कबंधाच्या नाडींचें पूर्ववत् संधान करणारी, त्रुटित नाडीस सांधणारी. २२. अतिदुर्लभा. २३. लोकमान्य सैन्यासह. २४. सूर्यकुलराजा. (राम.) २५. जांबवदाज्ञेतें. २६. हिमालयप्रदेशातें.

त्या वायुकुमा**रा**नें[2] करितां उड्डाण तें त्रिकूटशिर[1] ।
शिरलें महींत भारें झाला तो काल भूमिला शिशिर[3].॥ १३९

वीतखगेंद्र[4] **म**नोगति मारुति उसळे करुनि भुभुःकार; ।
आग्नेयौषधतेजें[5] यंत्रोत्थितलोहगोलकाकार[6]. ॥ १४०

पावे ओषधि[7] **ज**गतीधरास, तों आपणासि नेयाला ।
आला, म्हणउनि ओषधि अदर्शनें[8] कोप आणिती याला. ॥

दीप्तस्वाहाप्रि**य**[9] निजशिखा तशा नूतनपल्लवें[10] लवल्या ।
तिमिरतमालकुठारा[11], त्या औषधि तत्क्षणींच मालवल्या.॥ १४२

म्हणऊनि अं**ज**नीसुत कोपोनि म्हणे गिरीस, 'रे! मूढा! ।
गूढा[12] केल्या औषधि, नेणसि रामासि दुर्नयारूढा[13]!?॥ १४३

तुज रघुना**य**कभजनीं, मूढा! नाहींच भक्ति तिलमात्रा; ।
पात्रापात्रविचारत्यक्ता[14]! करितोसि विफल मद्यात्रा[15]? ॥ १४४

तरि तुज पा[16]**रा**वारीं, पिष्ट करुनि टाकितों क्षणामाजी; ।
परि कार्यगौरवास्तव रक्षितसें, शक्ति हे पहा माझी[17].'॥ १४५

बोलोनि असें **म**ग तो औषधिगिरि कंदुकासमान[18] करें; ।
उचलीला मारुतिनें, रघुपतिमुखवीरजीवदानकरें[19]. ॥ १४६

अतुलबल **श्री**मारुति घेउनि औषध्यगासि[20] येकटका[21]; ।
शंभुप्रहितौषधिकरनंदीश्वरसाचि[22] शीघ्र ये कटका[23]. ॥ १४७

पीयूषाच्या[24] धा**रा** तैसा तो होय अद्रिचा[25] वारा; ।
ओषधिगंधभराचा, निर्झरजलबिंदुचाहि[26] जो थारा[27]. ॥ १४८

औषधिगंध[28] **म**यमरुत्स्पर्शें रामासवें प्लवंगबलें, ।
सुप्तोत्थितापरी[29] तीं उठलीं, पहिल्यापरीसही प्रबलें. ॥ १४९

---

१. त्रिकूटपर्वतशिखर. २. वानरभारानें. ३. हिंवाळा. (कंपदायक) ४. वायु, गरुड, चित्त, यांसारखी गति ज्याची. ५. सोरागंधकादितेजें. ६. तोफेंतून निघालेल्या लोखंडाच्या गोळ्यासारखा. ७. औषधिपर्वतास ८. दर्शन न देऊन. ९. पेटलेल्या अग्नीच्या ज्वाला. (स्वाहा ही अग्नीची स्त्री आणि दक्षप्रजापतीची चौदावी कन्या. स्वाहाप्रिय म्ह० अग्नि.) १०. नवीन पल्लवें. ११. अंधकार वृक्षांच्या कुऱ्हाडी. १२. गुप्त. १३. अनीतिस्था. १४. पात्रापात्रविचारहीना. १५. माझें येणें. १६. सागरांत. १७. माझी. १८. चेंडूसारखा. १९. रामादिवीरांस जीवदान करणारा. २०. औषधिपर्वतास. २१. एकटा. २२. शिवप्रेरित औषधि ज्याच्या हातांत आहेत असा नंदिकेश्वरच. (नंदीश्वर हा शिवांश असून शिवाचा द्वारपाल आणि शालंकायन मुनीचा पुत्र.) २३. सैन्यास. २४. अमृताच्या. २५. पर्वताचा. २६. झऱ्याच्या उदकबिंदूचाही. २७. आश्रय. २८. ओषधिगंधयुक्त वायस्पर्शें. २९. निजून उठल्यासारखीं.

**पवनसुतें** [1]**ज** गती धर नेला असता तसाचि जरि ठाया ।
तरि कार्या येतें, परि उतरी **रा**मादिकांसि भेटाया.॥ ५५०

**राम** म्हणे,‘का **य** तुला होऊं, बा! मी जनांत उतराई; ।
प्राणप्रदानही तव उपकारगिरीपुढें गमे [2]राई.’ ॥ ५५१

ऐसे श्रीरघु **रा** जा वदोनि भेटे [3]स्वभक्तरत्नातें; ।
यत्नातें वाखाणी, गणी मनीं ‘जिंकिलें [4]सपत्नातें.’ ॥ ५५२

[5]यातायातश्र **म** तो **रा**में आलिंगुनी क्षणें हरिला; ।
‘गिरिला स्वस्थानीं ने,’ ऐसा केला [6]निदेश त्या [7]हरिला.॥ ५५३

[8]पवनमनो **ज** व **मा**रुति ठेवी त्या अद्रिला निजस्थानीं, ।
[9]प्रस्थानीं संस्तविला देवांनीं वातपुत्र [10]स्वःस्थानीं. ॥ ५५४

[11]बहुयोजना **य** ताध्वक्रमण श्रम न [12]**प्र**कंपनभवातें ।
हे शक्ति [13]व्यक्त करी, **क्षि**[14]तिजापतिपादभक्तिविभवातें.॥ ५५५

पुनरपि र **ज** नी असतां, फिरोनि आला **र**घूत्तमाजवळ; ।
जंव **ल**क्ष्मणाग्रजासह देखत होते [15]प्लवंगराज बळ. ॥ ५५६

**सुग्रीव** म्हणे, **‘य** तें **लं**केचें भस्म जा करा [16]रातीं.’ ।
तों [17]उल्मुकासि घेउनि, जाळी नगरी [18]क्षपाचराराती. ॥ ५५७

तेंव्हां **राक्षस** **रा** जें **कुंभनि**कुंभाख्य **कुं**भकर्णसुत ।
पाठविले समराला, देउनि [19]चतुरंगिणी चमू बहुत. ॥ ५५८

[20]**वाल्यनुजानें** **म** थिला **कुं**भ, **नि**कुंभ [12]**प्र**भंजनात्मभवें; ।
[21]**न**मुचि जसा **सु**रनाथें वधिला, कीं **अं**[22]धकासुराख्य [23]**भ**वें.५५९

---

१. औषधिपर्वत. २. मोहरी. ३. स्वकीयभक्तशिरोमणीतें (मारुतीतें.) ४. शत्रूतें. ५. जाण्यायेण्याचा श्रम. ६. आज्ञा. ७. मारुतीला. ८. वायुतुल्य आणि मनतुल्य वेग ज्याचा. ९. निघतांना. १०. स्वर्गस्थानीं. ११. बहु योजनें लांब मार्ग चालण्याचा श्रम. १२. वायूपासून ज्याचा भव म्ह० जन्म असा मारुति त्यातें. १३. स्पष्ट. १४. रामचरणभक्तिसामर्थ्यातें. १५. वानरश्रेष्ठ. १६. रात्रीच्या ठायीं. १७. कोलितासि. १८. राक्षसशत्रु. १९. चार अंगें म्ह० गज, अश्व, रथ, आणि पदाति यांनीं युक्त. २०. सुग्रीवानें. २१. कश्यपकन्या सिंहिका (हिरण्यकशिपुभगिनी) हिला विप्रचित्ति नामक दानवापासून झालेल्या तेरा पुत्रांपैकीं एक. याचा वध इंद्रानें केला. २२ अंधक नामक असुर. यानें पार्वतीला हरण्याचा यत्न केला. त्यावरून त्याचें आणि शिवाचें मोठें घोर युद्ध झालें. त्यांत त्याच्या रक्तापासून अनेक अंधक उत्पन्न होऊं लागले म्हणून त्याचें रक्त शुष्करेवती नामक देवतेकरवीं नाहींसें करविलें. तेंव्हां तो एकटाच अंधक अवशिष्ट राहिला. त्यानें महादेवाचें स्तवन केलें. नंतर शिवानें प्रसन्न होउन त्यास आपलें गणत्व म्ह० सेवकत्व दिलें. २३. शिवें.

ऐसा विजय **श्री** मद्रामाला प्राप्त होय त्या काळीं; ।
[1]कालिंदींदीवरसम झालीं [2]दशकंधराननें काळीं. ॥ १६०
[3]रक्षोनाथ **ख रा** त्मजमकराक्षातें रणार्थ आज्ञापी; ।
पापी तों रामातें [4]सोमातें दुष्टराहुसा व्यापी. ॥ १६१
आग्नेयास्त्रें तो **म** ग मकराक्ष जळे [5]सहायुधग्राम; ।
[6]रामज्वलनीं राक्षस [7]पतंग झाले करूनि संग्राम. ॥ १६२
[8]पौलस्त्यदेह **ज** न्मा इंद्रजिताख्य [9]प्रतापमार्तंड; ।
[10]खरतरशरकिरणगणें [11]शोषी [12]कपिजीवनासि उद्दंड. ॥ १६३
प्रलयसम **य** तो भासे, [13]संवर्तांभोदतुल्य शरधारा ।
हा राक्षस वर्षे, तों 'हा! राम!' म्हणे चमू निराधारा. ॥१६४
तों [14]वानराधि **रा** ज[15]द्विविदांगद[16]वातपोतनीलनल ।
जन लक्षावधि वधिती, ग्रीष्मीं [17]विपिनांतरीं जसा [18]अनल. ॥
[19]रक्षःप्लवंग **म** [20]क्षतविक्षत फुलले वनीं जणो पळस; ।
पळ सभयांला सुटला; [21]पलसह भू पाहतांचि ये [22]चिळस. ॥१६६
शतशः [23]क्षत **ज** नदी त्या मिळती, तों होय [24]सिंधुपति [25]शोण; ।
कोण प्राज्ञ म्हणेना, '**का**लाचा रक्तपूर्ण तो द्रोण.' ॥ १६७
मग [26]मायाम **य सी**ता आणुनियां **रा**वणात्मजें कपटें, ।
**मा**रुतिसमक्ष वधितां, झांकिति नेत्रासि देवलोक [27]पटें. ॥१६८
'जी वैराचें बी **ज** [28]प्राज्ञ पिता मोहिला जिणें, असिला ।
मारुनि [29]कलहप्रशमप्रसिद्धयश आज मी दिलें [30]असिला.' ॥१६९
**पौ**लस्त्यतन **य** ऐसा मोहुनि गेला प्लवंगसेनेला; ।
तें ऐकुनि **रा**म म्हणे, 'हा माझा प्राण शत्रुनें नेला.' ॥ १७०
**सी**ताशोकप **रा** ला **रा**माला आणि सर्वसेनेला; ।
[31]**पौ**लस्त्य म्हणे, '**क्षि**तिजाजीव लयाला खळें नसे नेला. ॥१७१

---

१. यमुनानीलकमलतुल्य. २. रावणमुखें. ३. रावण. ४. चंद्रातें. ५. शस्त्रसमूहासह. ६. रामरूप अग्नींत. ७. शलभ, टोळ. ८. रावणपुत्र. ९. प्रतापसूर्य. १०. तीक्ष्णबाणकिरणसमूहें. ११. मागच्या ५१९ व्या गीतीवरील टीपा पहा. १२. वानर हेंच उदक त्याला. १३. प्रलयमेघतुल्य. १४. सुग्रीव. १५. द्विविद हा अंगदाचा मातुल आणि सुग्रीवाचा सचिव. १६. मारुति. १७. वनांत. १८. अग्नि. १९. राक्षस आणि वानर. २०. छिन्नभिन्न. २१. मांसयुक्त. २२. कंटाळा. २३. रक्तनदी. २४. समुद्र. २५. लाल. २६. कपटरूपिणी, कपटानें निर्मिलेली. २७. वस्त्रें. २८. सुज्ञ. २९. कलहशांतीनें ख्यातयश. ३०. खड्ग. ३१. बिभीषण.

हें सारें माया **म** य, याचें कापट्य जाणतों हो! मी; ।
मोहुनि निकुंभिलेला[1] जाउनि, बसला असेल तो होमीं[2]. ॥ १७२
होमांतीं दिव्य **श्री** स्यंदन[3] जन्मेल भव्य कामगम[4]; ।
मग मर्त्यामर्त्याला[5] दुर्जय[6] होईल, तो महानिगम[7]. ॥ १७३
हें पूर्वी चतु **रा** नन वदला, 'हवनीं करील जो विघ्न । 
रावणपुत्रा! तूझे होतील प्राण जाण तन्निघ्न[8].' ॥ १७४
यास्तव पर **म** त्वरित प्रत्यूह[9] करा, तयासि उठवा हो! ।
वाहोत रक्ततटिनी[10], सौमित्रे! चाल तूं महाबाहो!' ॥ १७५
वाक्य असें नि **ज** कर्णीं पडतां, वर्णी तयासि रघुराजा; ।
[11]सौमित्रिप्रभृतींतें शीघ्र म्हणे, 'त्या खळासि वारा[12] जा.' ॥ १७६
तेव्हां कौसल्ये **य** प्रहित[13]प्रबलप्लवंग[14] गिरिकल्प[15], ।
कल्पक्षय करितिलसे गमती, करितांचि युद्धसंकल्प[16]. ॥ १७७
पौलस्त्यकुमा **रा** ध्वररक्षकरक्षःक्षयस्पृहावंत[17], ।
[18]अंतकनिभ प्लवंगम गेले रिपुहस्तिचे महावंत[19]. ॥ १७८
ते गगनग[20] **म** ग अगनगधर[21] खरतर वीर नीरदासारे[22]; ।
वर्षति अध्वररक्षणदक्षासुरसंघमस्तकीं[23] सारे. ॥ १७९
शाखामृग र **ज** नीचर करिती संग्राम देवदानवसे; ।
नवसेवकसम[24] दुःखीं, स्वस्वामिसमीप एकही न वसे. ॥ १८०
मांसाचे संच[25] **य** किति, रक्ताचे वाहती महापूर; ।
शूरजनक्षय झाला, भू रजोहीना[26], द्रुमाद्रिही[27] चूर[28]. ॥ १८१
विघ्नें[29] असा यें[30] **ज** नाला होतांचि, उठे सचापशरधारी; ।
संनद्ध[31] युद्धबद्ध[32] श्रद्ध क्रुद्ध प्रसिद्ध विबुधारी[33]. ॥ १८२

---

१. निकुंभिला ही लंकेच्या पश्चिमवर्ती नगरी. ही इंद्रजिताची अभिचारकर्मभूमि. एथें त्यानें अनेक यज्ञ केले. २. यज्ञांत. ३. रथ. ४. इच्छितस्थलीं जाणारा. ५. मनुष्यदेवांला. ६. जिंकण्यास कठीण असा. ७. ब्रह्मा. ८. त्याच्या स्वाधीन. ९. विघ्न. १०. रक्तनदी. ११. लक्ष्मणादिकांतें. १२. निवारा. १३. रामानें पाठविले. १४. वानर. १५. पर्वततुल्य. १६. रणास जाण्याचा विचार. १७. इंद्रजितयज्ञरक्षकराक्षसनाशेच्छु. १८. यमसम. १९. महात. २०. आकाशगामी. २१. वृक्षपर्वतधारी. २२. मेघतुल्य. २३. यज्ञरक्षणाविषयीं दक्ष जे राक्षससमूह त्यांच्या मस्तकीं. २४. नवे चाकरसे. २५. समूह. २६. धूलिहीना. २७. वृक्षपर्वतहि. २८. चूर्ण. २९. विघ्न, स्वप्न, हे शब्द संस्कृतांत पुल्लिंगी आहेत. ३०. यज्ञाला. ३१. सज्ज. ३२. युद्धीं धृतप्रीति. ३३. देवशत्रु.

पूर्ण न होतां **य** ज्ञ क्रोधें धांवे रथी धनुर्बाणी[1]; ।
शर्वाणीशावर[2] गजदैत्य[3] तसा ये रणासि निर्वाणीं[4]. ॥ १८३

चावी निजाध[5] **रा** तें दांतें, हातें स्वहस्त तो चोळी; ।
पोळी[6] अस्त्राग्नीनें, शर सोडी, ज्यांस तुच्छ दंभोली[7]. ॥१७४

हरिजित्[8] निःसी **म** बलें प्लवगांत[9], जसा मृगांत शार्दूल[10]; ।
शूलें पाशगदाशरमुसलें करि पर्वतासि निर्मूल. ॥ १८५

वटसरल[11] **श्री** फलधवतालतमालाम्रनालिकेराहीं ।
कांहीं पर्वतशिखरें, ताडुनि म्हणती कपी, 'उभा राहीं.'॥ १८६

झाले वानर **रा** क्षस हरिजित्सौमित्रिमार्गणाग्निहुत[12]; ।
क्षोणीवर[13] कोणी भट, शोणिततटिनींत[14] वाहती बहुत. ॥१८७

समरीं मत्त[15] **म** तंगज, कीं दोघे व्याघ्र, कीं मृगाधिपती[16], ।
कीं वृष[17], कीं घन, कीं ग्रह, कीं नग[18], कीं अंधक[19] स्मराराती[20].॥

श्रीमद्रामानु[21] **ज** निजभुजभुजगशिलीमुखैकरदविद्ध ।
घननाद[22] मोह पावे; पुनरपि युद्धार्थ होय तो सिद्ध. ॥ १८९

मारुततन **य** बिभीषण, ताडिति बहु पंक्तिकंठतोकाला[23]; ।
तो कालाकुलमति[24] खल होउनियां विरथ[25] जाय ओकाला[26].॥१९०

पुनरपि तो **रा** गानें आला होऊनियां रथारूढ; ।
खरतरशरवरतिमिरीं[27] करि हरिबल[28] दीर्घकाल दिङ्मूढ[29].॥ १९१

ऐसें झालें स **म** र त्रिदशजनालाहि[30] जें गमे भीम[31]; ।
श्रीमत्सौमित्रीशीं इंद्रजिताशीं त्रिरात्र निःसीम. ॥ १९२

मग रामानु **ज** वेगें, माहेंद्रास्त्राभिमंत्रिताग्निशिखें[32] ।
इंद्रजिताचें छेदी मस्तक, पातें न हालतां, विशिखें[33].॥ १९३

---

१. धनुर्बाणधर. २. शर्वाणीचा, पार्वतीचा ईश स्वामी शंकर त्याजवर. ३. एक असुर. हा रुद्राच्या हातून मरण पावला. ४. परिणामीं. ५. स्वओष्ठातें. ६. जाळी. ७. वज्र. ८. इंद्रजित्. ९. वानरांत. १०. व्याघ्र. ११. वड, देवदारुवृक्ष, पोफळीचें झाड, धावड्याचें झाड, ताड, खैर, आंबा, माड, इत्यादिकांनीं. १२. इंद्रजित् व लक्ष्मण यांच्या बाणाग्निनें दग्ध. १३. पृथ्वीवर. १४. रक्तनदींत. १५. उन्मत्त हत्ती. १६. सिंह. १७. बैल. १८. पर्वत. १९. दैत्यविशेष. (मागें ५५९व्या गीतीवरील टीपा पहा.) २०. शिव. (स्मराचा म्ह० कामाचा अराति. शिवानें कामाला दग्ध केलें ही कथा पुराणप्रसिद्ध आहे.) २१. लक्ष्मणबाहूरूप सर्पाच्या बाणरूप एकदंतें विद्ध. २२. इंद्रजित्. याचें पहिलें नांव 'मेघनाद.' २३. रावणपुत्रा. २४. कालव्याप्तबुद्धि. २५. रथहीन. २६. गृहाला. २७. तीक्ष्णबाणांधकारीं. २८. वानरसैन्य. २९. भ्रमयुक्त, दिशा न जाणणारें असें. ३०. देवालाहि. ३१. भयंकर. ३२. इंद्रास्त्रमंत्रित आहेत अग्निज्वाला ज्याच्या ठायीं असा. ३३. बाणें.

तेव्हां जयज **य** शब्दें गर्जति मुनि सिद्ध देव गंधर्व; ।
पर्व अपूर्व तयांला झालें; आनंद पावले सर्व. ॥ ५९४

ते दुंदुभि वा **ज** विती, धिमिधिमिधिमि देवलोक आनंदें; ।
गंधर्व करिति तननन; तत्थैथैथय्य अप्सरोवृंदें[1]. ॥ ५९५

तो प्रावृट्[2]सम **य** गमे, पुष्पांची वृष्टि, वाजती भेरी[3]; ।
चपला[4] सुरांगना[5] त्या तन्वंगी नाचती नभीं गौरी[6]. ॥ ५९६

जाउनि रघु **रा** याच्या चरणीं **सौ**मित्रि जाहला लीन; ।
पीनभुज[7] प्रभु हृदयीं आलिंगी बंधुला दयाधीन. ॥ ५९७

**राम**म्हणे, 'श्र **म** झाला वत्सा ! तुज नाहलासि रुधिराहीं; ।
द्व्यंगुलही[8] स्थळ देहीं रिपुबाणांहीं न चुंबिलें नाहीं. ॥ ५९८

तुजविण जे **श्री** स्त्री तनु, हें सारें सर्वथा मला वमन; ।
सांगुनियां कुशलाला[9], चिंतातटिनीतटास[10] लाव मन.'॥ ५९९

तेव्हां **रघुवी** **रा** ला नमुनि म्हणे तो दशाननानुजनी[11], ।
'तुज नीरदाभदेहा[12] जय झाला, धर्मशर्महेतु[13] जनीं. ॥ ६००

**रावणपुत्र** **म** हेंद्रद्वेष्टा दुष्टाग्रणी रणीं सबल[14] ।
**सौ**मित्रिनें, **त्रि**नेत्रें **अं**धकसा मर्दिला प्रभो ! सबल[15].॥ ६०१

याच्या निजभुज[16] **ज** भुजगें शरदंष्ट्रें[17] कार्मुकाननें[18] सकळ ।
दंश करुनियां शत्रु क्षितिपृष्ठीं[19] आज पाडिले विकळ.'॥ ६०२

ऐसी स्वविज **य** वार्ता, ऐकुनि राजा म्हणे, 'अहो ! मातें ।
सर्वांहीं तोषविलें, करुनि शराग्नींत शत्रुहोमातें[20]. ॥ ६०३

चिंतांबुधितीरा[21] **रा** ला पावायाला मला तुम्हीं सेतू; ।
हे तुमचे बलशाली भुज भद्रें[22] असोत नित्य जयहेतू.'॥ ६०४

**रा**में असे स **म** स्तहि सत्कारुनियां, **सु**षेणकौशल्यें ।
**सौ**मित्रिप्रमुखांचीं काढविलीं मर्मपीडकें शल्यें[23]. ॥ ६०५

**रावण** तनु[24] **ज** विनाशें भिजवी बाष्पोदकें[25] सुहृद्धस्त[26]; ।
ध्वस्तप्रभ[27] तो झाला **ग**भस्तिमाली[28] जसा **त**मोग्रस्त[29]. ॥ ६०६

---

१. अप्सरांचे समूह. २. वर्षाकाळ. ३. नौबद. ४. विद्युल्लता. ५. देवांगना. ६. स्त्रिया. ७. पुष्टबाहु. ८. दोन बोटेंही. ९. कल्याण, क्षेम. १०. चिंतानदीतीरास. ११. बिभीषण. १२. मेघतुल्यदेहा. १३. धर्मसुखहेतु. १४. बलवान्. १५. ससैन्य. १६. स्वबाहुसर्पें. १७. बाणदंष्ट्रा ज्याची. १८. धनु मुख ज्याचें. १९. पृथ्वीवर. २०. अरिगणाच्या यज्ञातें. २१. चिंतासमुद्रतीराला. २२. सुखी २३. बाणाग्रें. २४. इंद्रजिन्नाशें. २५. नेत्रोदकें. २६. आप्तांचे म्ह० मित्रांचे हात. २७. निस्तेज २८. सूर्य. २९. राहूनें ग्रासिलेला.

'वत्सा! [1]हरिह य शत्रो ! महाभुजा! [2]इंद्रनीलसंकाशा! ।
काशास तूं अकाळीं बापा ! धरिलीस [3]अन्यलोकाशा ?॥ ६०७
शस्त्रास्त्रें [4]कंज ज वर [5]बलरिपुकीर्तींदुराहुबाहुबल ।
झालें कैसें, [6]स्वप्नप्राप्तार्थ तसेंचि हें वृथा सकल. ॥ ६०८
तुमचा सं[7]क्ष य जीस्तव, तीच्या रक्तें तुम्हांसि तर्पीन; ।
तन्मांसाचे पिंड श्राद्धीं सकलांसि आज अर्पीन.' ॥ ६०९
ऐसें वदोनि रा वण धांवे घेऊनि तीव्र तरवारी. ।
सीतावधोद्यताला त्यालागिं [8]सुपार्श्व तीव्र[9]तर [10]वारी. ॥ ६१०
मग [11]अप्रति म बलातें प्रेषी[12], त्याशीं करूनि राम रण, ।
अर्पी हर्ष सुरांला, जय चापाला, [13]निशाचरां मरण. ॥ ६११
रथ मथिले श्री रामें, एकुणतिसलक्ष कोटिही सात; ।
तेराकोटी [14]विंशतिसहस्र दशलक्ष गजहि विख्यात. ॥ ६१२
जे [15]तुरंगव रा रोहध्वजिनी वधिली रघूत्तमें मोठी; ।
ते [16]षष्टिसहस्राधिक [17]विंशतिलक्षोत्तर [18]त्रिदशकोटी. ॥ ६१३
रजनीचर म थिले जे, त्यांची संख्याहि वर्णिली ऐशी[19]; ।
ते एकशतक पंचेचाळिसही कोटि लक्षही ऐशी[20]. ॥ ६१४
आणिकही [21]र ज नीचर वीर जगच्छत्रु धीर जयवंत; ।
[22]प्रभुशरवानरगिरिवरतरुनिकरें फार पावले अंत. ॥ ६१५
एवं रघुना य क तो [23]युग्ममुहूर्तांत संहरी कटकें; ।
लटकें कसें म्हणावें? 'काय न कीजेल त्या [24]जगद्धटकें?' ६१६
ऐसें ऐकुनि रा वण शोकें झाला [25]विसंज्ञ एकघडी; ।
मग [26]दीप्तवह्निकुंडप्रभ विंशतिसंख्य लोचनें उघडी. ॥ ६१७
त्यावरि शीघ्र म होदर वीर महापार्श्व अणि विरूपाक्ष ।
राक्षस हे पाचारुनि, करवी बळ सर्व सज्ज [27]नेखराक्ष. ॥ ६१८

---

१. इंद्रशत्रो. २. पाचूपमा. ३. परलोकेच्छा. ४. ब्रह्मवर. ५. इंद्रकीर्तिचंद्रास राहुरूप बल ज्याचें असा. ६. स्वप्नीं प्राप्त द्रव्य. ७. नाश. ८. रावणाचा सचिव. ९. अतिशीघ्र. १०. निवारी. ११. निरुपमसैन्यातें. १२. पाठवी. १३. राक्षसांला. १४. वीसहजार. १५. घोडेस्वारांची सेना. १६. साठहजारांहून अधिक. १७. वीसलक्षाधिक. १८. तीसकोटी. १९. याप्रकारची. २०. ऐंशी-संख्या. २१. राक्षस. २२. रामबाण, वानर, पर्वत, वृक्ष यांच्या समूहें. २३. दोन मुहूर्तांत. २४. विश्वोत्पादकें. २५. बेशुद्ध. २६. प्रदीप्तअग्निकुंडतुल्य. २७. रावण.

साग्रनियुत[1] जे[2] वनाश्व स्यंदन[3] नियुतत्रय[4] द्विपे[5] प्रबल; ।
हय[6] षष्टिकोटि[7], अगणित पंक्ति[8], असें शीघ्र सज्ज होय बल. ६१९

मणिहेमम य[9] स्यंदन, अष्टाश्व[10] विमानतुल्य विस्तीर्ण; ।
आणविला दिक्पालकमृगसिंहें[11] नैकशस्त्रसंकीर्ण[12]. ॥ ६२०

रथचक्रें ग ज हय भट काहल[13] वीणा मृदंग वरभेरी ।
वाजति, तेव्हां झाली केवळ ते राक्षसी चमू[14] भेरी[15]. ॥ ६२१

रावण विज य श्लाघी कनकरथीं बैसला महाकाय; ।
तो भासे कार्तस्वरगिरिशृंगारूढ[16] मेघ कीं काय. ॥ ६२२

त्या पंक्तिकंध रा ला जातां झाले अनेक अपशकुन; ।
बसले ध्वजशिखरावरि येउनि तत्काळ गृध्रबकशकुन[17]. ॥ ६२३

तों रुधिर [18]धू म योनी वर्षे, भू कांपली, रडे भालु; ।
हा लुब्ध दुष्ट तुमजे, काळग्रस्तायु[19] मूढ पतयालु[20]. ॥ ६२४

[21]सलिलधर श्री सोदरकांतिध्वजिनीसमेत जों चाले; ।
झाले उल्कापात[22], श्वसन[23] पुढें, काक मागुनी आले. ॥ ६२५

धूलीच्या निक[24] रा नें पडला सर्वत्र निबिड[25] आंधार; ।
काय रज:पटलानें[26] भूमि करी निर्जरांसि[27] आधार? ॥ ६२६

कीं [28]गगनस्था म रजनकांतांची धूलिमय तिरस्करिणी[29]; ।
[30]संमर्द सोसवेना, म्हणुनि पळे कीं रजोमिषें धरणी[31]. ॥ ६२७

त्यातें रघुरा ज तदा अवलोकुनियां करीं धरी चाप; ।
तों [32]पर्वतशिखरशिलातरुकर ते धांवती [33]कपिक्ष्माप. ॥ ६२८

[34]बहुतरतो य दपटलें, तैशीं दिसती बलें [35]पलाशांचीं; ।
गमती [36]प्रकंपनासम समरीं [37]वृंदें प्रचंड [38]कीशांचीं. ॥ ६२९

---

१. पूर्णलक्ष. २. वेगवान् घोडे. ३. रथ. ४. तीनलक्ष. ५. हत्ती. ६. घोडे. ७. साठकोटि. ८. पायदळ. ९. रत्नयुक्त सुवर्णरथ. १०. आठ घोडे ज्यास असा. ११. देवमृगास सिंहरूप (रावण) त्यानें. १२. अनेकशस्त्रयुक्त. १३. वाद्यविशेष. १४. सेना. १५. बहिरी. १६. कार्तस्वर म्ह० सोनें त्याचा पर्वत म्ह० हेमाद्रि, त्याच्या शिखरावर चढलेला. १७. गीध, बगळे, पक्षी. १८. मेघ. १९. कालानें ग्रस्त केलें आहे आयुष्य ज्याचें असा. २०. पतनेच्छु असा. २१. मेघशोभातुल्य कांतिसेनेसहित. २२. आकाशामध्यें जे अग्निरूप तारे त्यांचें पडणें. २३. वायु. २४. समूहें. २५. दाट. २६. धूलिसमूहें. २७. देवांसि. २८. आकाशस्थ देवांगनांची. २९. पडदा. ३०. युद्ध, नाश. ३१. पृथ्वी. ३२. पर्वतशिखर, दगड, वृक्ष, हस्तीं ज्यांच्या असे. ३३. वानरश्रेष्ठ. ३४. बहुतप्रकारांनीं मेघसमूहें. ३५. मांसभक्षक राक्षसांचीं. ३६. महावायुतुल्य. ३७. समूह, कुळें. ३८. वानरांचीं.

झाले मिश्रित **रा**क्षस वानर जैसे [1]करींद्र [2]पंचास्य; ।
हास्य करी हर्षानें [3]लास्यप्रिय **काल** पसरुनी [4]आस्य. ॥ ६३०

एकैकातें स **म**रीं शत्रूंतें शतशत प्लवंगपती; ।
[5]अगनगरदपदमुष्टिप्रहार करुनी वधावया जपती. ॥ ६३१

[6]शरनाराचां **ज**लिकप्रासगदाखड्गशूलपरिघांतें ।
हातें धरूनि राक्षस ताडिति कीशांसि [7]निष्ठुराघातें. ॥ ६३२

कपि पादद्व **य** धरुनि [8]क्षितिवर रजनीचरांसि आपटिती; ।
उठती तों तों दुसरे ताडिति [9]गिरिपादपादिकें [10]झटिती. ६३३

उचलुनि ग **ज** हयरथवर, गरगर फिरवूनि उडविती गगनीं; ।
[11]अंगनिष्पिष्ट कितिकही [12]कंदन असें करिति कपि [13]पलाशगणीं.

निशिचर [14]सौ**य** कशक्तिप्रासगदाशूलखड्गनिकरानें ।
ताडुनि किति कपि गिरि तरु, वारुनि संचूर्ण करिति [15]निकरानें.

शूर प्लवंग **रा**गिट [16]विकट [17]कठोरप्रचंडभुज धीट; ।
नीट प्रहार करुनी, शत्रूतें रगडिती, जणों कीट. ॥ ६३६

तो अतुल [18]लो**म** हर्षण रण जेथें [19]शोणितापगापूर; ।
राक्षस कपीस तैसे, जैसा [20]दीप्तानलास कापूर. ॥ ६३७

यापरि तेव्हां **श्री**[21]म**द्रा**मबलें राक्षसी चमू वधिली. ।
विजयें सुरांसि [22]मांसक्षतजें [23]क्रव्यादकांसि तुष्टि दिली.॥ ६३८

युद्धीं [24]**म**होद **रा**भिध आणि **वि**[25]रूपाक्षनाम हे दोघे; ।
[26]मोघेप्सितें [27]करुनि वलें, यांच्या प्राणांसि [28]कीशपति तो घे. ॥

[29]वायुसुतानें **म**थिला वीर [30]**म**हापार्श्व [31]संयुगीं [32]गोत्रें; ।
स्तोत्रें करिति सुर, तदा कोपे **द**शकंठ, गज जसा [33]तोत्रें.॥

---

१. हत्ती. २. सिंह. ३. नृत्यप्रिय. ४. मुख. ५. वृक्ष, पर्वत, दंत, पद, मुष्टि, यांनीं ताडण. ६. शस्त्रविशेष त्यांतें. ७. निर्दय प्रहारानें. ८. जमिनीवर. ९. पर्वतवृक्षादिकें. १०. शीघ्र. ११.पर्वतें चूर्ण. १२. रण. १३. राक्षसांच्या समूहांत. १४. बाणादिशस्त्रसमूहें. १५. पराकाष्ठेनें, नेटानें. १६. भयंकर. १७. कठीण आणि भयंकर आहेत भुज (बाहु) ज्यांचे असे (प्लवंग). १८. रोमांच उत्पन्न करणारा, हर्षविषादानें अंगावरील केंस उभे करणारा (रण.) १९. रक्तनदीपूर. २०. प्रदीप्ताग्नीस. २१. श्रीरामसैन्यें. २२. मांसरक्तें. २३. मांसभक्षकांसि. २४. महोदर नांवाचा राक्षस. हा रावणाचा सापत्नभ्राता व सचिव. २५. सुमाली राक्षसाचा अमात्य. २६. निष्फलेच्छ. २७. (रामायण, युद्धकांड, स० ९६–९७ पहा.) २८. सुग्रीव. २९. मारुतीनें. रामायणांत (युद्धकांड, स० ९८ श्लो० १९–२३) अंगदानें महापार्श्वास मारिलें असें वर्णन आहे, तेव्हां पंतांचा पाठ 'वालिसुतानें' असा असून लेखकप्रमादानें 'लि स्थाना 'यु' आला असावा असें दिसतें. ३०. रावणाचा सापत्नभ्राता आणि अमात्य. ३१. युद्धीं. ३२. पर्वतें. ३३. अंकुशें.

क्षणदाचर[1] **ज** ननाशें **रा**वण नानाविधायुधस्तोमीं[2], ।
वर्षे कपिसेनेवर, उद्गार[3] तधीं दिला **य**में व्योमीं[4]. ॥ ६४१

रघुकुलना **य** क सायकनिकरें[5] रिपुशस्त्रवृष्टिला वारी[6], ।
वारिदें[7]सम बाणगणें तों तों वर्षे समस्तदेवारी[8]. ॥ ६४२

तों तामसास्त्र[9] **रा** गें केलें **मं**दोदरीधवें प्रकट; ।
सिंहं[10]व्याघ्रवृकादिश्वापदमुख बाण जन्मले विकट[11]. ॥ ६४३

रघुवंशोत्त **म** त्यातें आग्नेयास्त्रें[12] क्षणांत निर्दाळी; ।
**वा**लिप्राणारि[13] रिपुध्वजिनीला[14] प्रलयवन्हिसा जाळी. ॥ ६४४

वैश्रवणानु[15] **ज** तेव्हां **म**यरचितास्त्रासि[16] योजिता होय; ।
शरशक्तिशूलमुसलप्रासगदा वर्षती जसें तोयें[17]. ॥ ६४५

गंधर्वास्त्रें सा **य** क अभिमंत्रुनि सोडिले यशोधामें[18]; ।
**इं**द्रें पविप्रहारें[19] पर्वतसा, शत्रु ताडिला **रा**में. ॥ ६४६

शस्त्रास्त्राचा व्रं[20] **ज** मग सोडुनि **द**शकंधरें महापतितें[21] ।
आच्छादिलें रवीतें, विधुंतुदाचे[22] परी धरापतितें. ॥ ६४७

**सौ**मित्रिनें प्र **य** त्नें छेदुनि **द**शकंठचापलतिकेला[23] ।
अशनिप्रभबाणानें[24] सारथिमूर्धापहारही[25] केला. ॥ ६४८

**मं**दोदरीव **रा** च्या स्यंदनसंबद्धवाजिसंघातें[26] ।
मारी स्वयें **बि**भीषण धांउनियां तेधवां गदाघातें[27]. ॥ ६४९

कालभुजंग[28] **म** वज्रज्वलनज्वालांतकोपमा शक्ती ।
बंधुवधास्तव हस्तीं धरिली **द**शकंधरें महाशक्ती[29]. ॥ ६५०

---

१. राक्षसनाशें. २. अनेकविधशस्त्रसमूहेंकरून. ३. ढेंकर. ४. आकाशीं. ५. बाणसमूहें. ६. निवारी. ७. मेघतुल्य. ८. रावण. (सकल देवांचा वैरी.) ९. तमोग्रह (राहु) आहे देवता ज्याची असें अस्त्र. १०. सिंह, वाघ, लांडगा इत्यादिक श्वापदांचीं मुखें ज्यांस असे. ११. भयंकर. १२. ज्याची अग्नि देवता आहे असें अस्त्र. १३. राम. १४. रावणसेनेला. १५. वैश्रवणाचा (कुबेराचा) अनुज. (रावण.) १६. मयासुरानें निर्माण केलेलें भयंकर अस्त्र. (युद्धकांड, स० १०० श्लो० २ पहा.) १७. उदक. १८. यशस्थान असा. ('रामें' या शब्दाचें विशेषण.) १९. वज्रप्रहारें. २०. समूह. २१. ऊर्ध्वगतीस कारणीभूत जें पुण्य तें ज्याच्या पदरीं नाहीं असा मोठा पापी. २२. राहूचे परी. २३. रावणाच्या धनुष्याला. २४. वज्रतुल्य बाणें. २५. सारथिशिरच्छेदहि. २६. रथास योजिलेल्या घोड्यांच्या समूहातें. २७. गदाप्रहारें. २८. काल, सर्प, वज्र, अग्निज्वाला, यम, यांची उपमा जिला आहे अशी (शक्ति). २९. मोठें बल आहे जिचें अशी.

तेव्हां त्वरित **श्री**[1]मान् लक्ष्मण निःसीमवीर्यचुंचुक[2][3]वी ।
रिपुला मोहुनि बाणें, मित्राला[4] शक्तिपासुनी चुकवी. ॥ ६५१

जनरावण[5] **रा**वण तो सौमित्रिस त्याच शक्तिनें ताडी; ।
दुःखार्तदेवलोचनजलवृष्टिसह[6] क्ष्मातलीं[7] पाडी. ॥ ६५२

अशनिच्छिन्न **म**हीधरशिखरासम[8] रामचंद्रबंधु पडे; ।
वेगें प्रभंजनाच्या[9] समूळ[10] जैसा महातरू उपडे. ॥ ६५३

राम जघन्य[11] **ज**पातें, 'हा! वत्स!' म्हणोनि पावला शोक; ।
याचेंहि हृदय झालें भिन्न असें मानिती तदा लोक. ॥ ६५४

बंधुहृदाल[12] **य**वासी रामहि शक्तीस काय सांपडला ? ।
लक्ष्मणहृदयच्छेदें, नातरि मोहाननांत[13] कां पडला ? ॥ ६५५

शक्तीतें स्वक **रा**नें उद्धरितां,[14] राववासि बाणगणीं ।
मर्मस्थानीं रावण ताडी, परि राम दुःख तें न गणी. ॥ ६५६

जैसी भुजंग[15] **म**स्त्री वल्मीकबिलांतुनी[16] अहिग्राही[17] ।
काढी, तैसी रामें उद्धरिली शक्ति ते समग्रा ही. ॥ ६५७

सुगलप्रभं[18] **ज**नात्मज सौमित्रीचें करावया त्राण ।
ठेउनि, रामें रिपुवर आशीविषतीव्र[19] सोडिले बाण. ॥ ६५८

जीवितसंश[20] **य** होतां, विरथ दशग्रीव रामशरभग्न ।
गेला पळोनि मागें, चिंताभयशोकमोहसंमग्न.[21] ॥ ६५९

मग रघुरा **ज** फिरोनि त्वरितचि येऊनि बंधुदेहातें[22] ।
हातें शिवोनि पावे 'हा! वत्स! असें म्हणोनि मोहातें.[23] ॥ ६६०

अनुजवि[24]ल **य**भीतातें रामातें तो सुषेण[25] समजावी; ।
'सौमित्रिमृत्युशंका[26] हृदयापासूनियां' म्हणे 'जावी.' ॥ ६६१

---

१. शोभायमान. २. अमितबल (भारी बळकट) आहे चोंच ज्याची. ३. पक्षी. ४. बिभीषणाला. ५. लोकपीडक. ६. दुःखपीडित देवांच्या नेत्रोद्भत अश्रुवृष्टिसहित. ७. पृथ्वीतलीं. ८. वज्रच्छिन्नपर्वतशिखरतुल्य. ९. वायूच्या. १०. मूळासकट. ११. कनिष्ठ भावाच्या (लक्ष्मणाच्या) पातें. १२. लक्ष्मणहृदयीं राहणारा. १३. मोहाच्या (मूर्च्छेच्या) तोंडांत. १४. ओढून काढतां. १५. सर्पिणी. १६. वारुळबिळांतून. १७. गारुडी. १८. सुग्रीव मारुती. १९. आशी म्ह० दाढ तिच्यामध्यें विष आहे ज्याच्या अशा सर्पाप्रमाणें उग्र. २०. प्राणभय उत्पन्न होतां. २१. चिंता, भय, शोक, मोह, यांत बुडालेला असा. २२. भावाच्या (लक्ष्मणाच्या) शरीराला. २३. मूर्छेतें. २४. लक्ष्मणनाशभीतातें. २५. रामाच्या वैद्याचे नांव. (वानरविशेष.) २६. लक्ष्मणाच्या मरणाची भीति.

'या [1]वायुकुमा रा चा [2]दोर्विक्रम सुखद काय [3]वानावा? ।
संकटसिंधु तराया आम्हाला याचिया भुजा [4]नावा. ॥ ६६२
मारुति यास म यीं त्या जाउनि दिव्यौषधीस आणील; ।
[5]मोहतरूतें [6]चिंतालतिकेसहवर्तमान खाणील.' ॥ ६६३
ऐसें वदतां, श्री मद्रामानें [7]लक्ष्मणात्मशयनानें; ।
अवलोकिलें [8]मुखांबुज मारुतिचें [9]अश्रुपूर्णनयनानें. ॥ ६६४
तेव्हां रघुवी रा ला वंदूनि, उडे [10]तनूज [11]पवनाचा; ।
[12]झाला अतिथि [13]मुहूर्तें महौषधीच्या [14]विलासभवनाचा. ॥ ६६५
त्यास [15]विशल्या म ग ते, न कळे म्हणवूनि न करितां उशिर; ।
औषधिगिरिसचि नेउनि ठेवी रामाचिया पदीं स्वशिर. ६६६
तंव तो [16]भेष ज वेत्ता सुषेणनामा विशल्यकरणीला ।
शोधी, मग तीणें त्या [17]वरुणसुताचा स्वहस्त [18]परिणीला. ६६७
तीच्या [19]अनाम य प्रद्गंधाचें करवितांची [20]आंघ्राण, ।
[21]शल्यक्षतरहिततनू लक्ष्मण झाला क्षणांत [22]संप्राण. ॥ ६६८
हर्षें रघुवी रा नें लक्ष्मण आलिंगिला [23]भुजायुगुलें; ।
केला [24]जयशब्द सुखें मारुतिनें अंगदें नलें [25]सुगलें. ॥ ६६९
[26]औषधिवास [27]म हीध्र स्वस्थानीं स्थापुनी [28]प्रभंजनजें; ।
केलें कर्म सुदुष्कर [29]बलवज्जनसर्वगर्वभंजन जें. ॥ ६७०
पुनरपि [30]रां ज मणी तो युद्धाला सिद्ध होय ते काळीं; ।
अन्यरथावरि बैसुनि दशकंठें दाविलीं मुखें काळीं. ॥ ६७१
तेव्हां [31]हरिह य निजरथ देउनि धाडी सवेग [32]मातलिला; ।
[33]विभुहस्तें वधवाया दुष्टचमूला [34]उदंड [35]मातलिला. ॥ ६७२

---

१. मारुतीचा. २. बाहुपराक्रम. ३. वर्णावा. ४. नौका. ५. मूर्छावृक्षातें. ६. चिंतारूप वल्लीसहित. ७. लक्ष्मण आहे शय्या ज्याची असा. ८. मुखकमल. ९. बाष्पाकुललोचनानें. १०. पुत्र. ११. वायूचा. १२. अतिथि झाला=पाहुणा झाला, औषधिपर्वतावर आला. १३. दोन घटिकात्मक कालानें. १४. क्रीडास्थान (औषधिपर्वत) त्याचा. १५. वनस्पतिविशेष. (हिच्या योगें शल्यपीडा नष्ट होते, यास्तव हिला 'विशल्यकरणी' असें म्हणतात.) १६. औषधजाणता, वैद्य. १७. लक्ष्मणाचा. १८. स्पर्शिला. १९. आरोग्यप्रद वासाचें. २०. हुंगणें. २१. बाणाग्रक्षतहीन देह. २२. सावध. २३. बाहुद्वयें. २४. जयजयकार. २५. सुग्रीवें. २६. औषधि राहण्याचें स्थान. २७. पर्वत. २८. वायुपुत्रें. २९. बलाढ्यलोक गर्वनाशक. ३०. राम. ३१. इंद्र. ३२. इंद्राचा सारथी, त्यातें. ३३. प्रभूच्या (रामाच्या) हातानें. ३४. पुष्कळ. (उदंड' हा 'उद्दण्ड' याचा अपभ्रंश. उंच आहे दांडा ज्याचा तें उद्दंड, यावरून उदंड म्ह० 'पुष्कळ' असा अर्थ कालांतरानें निष्पन्न झाला. ३५. माजलेलीला.

**मा**तलि म[1]नु **ज** वरातें भेटे तत्काल उतरुनी [2]महितें; ।
[3]शरशक्तिकवचयुत रथ **रा**में स्वीकारिला [4]जगन्महितें. ॥ ६७३

[5]सुरजन ज **य** दरथावरि **बै**से [6]भुवनैकवीर राजमणी; ।
त्रि[7]पुरांतक **शि**व, किंवा तिमिर[8]स्तोमापहारक [9]द्युमणी. ॥ ६७४

मग समरीं **रा** क्षस तो सोडी [10]सर्पास्त्र **रा**घवावरतें; ।
**रा**में **सौ**[11]पर्णास्त्रें नि[12]वारिलें, अन्यथा न आवरतें. ॥ ६७५

काय [13]भुजंग **म** [14]राघवकृष्णागरुगंधलुब्ध ते आले; ।
[13]व्यालेश्वरासि परि त्या [15]सुपर्ण मध्येंचि भक्षिते झाले. ॥ ६७६

[16]कनकमय **श्री**[17] मद्ध्वज तोडुनियां **जि**[18]ष्णुच्या [19]तुरंगांतें ।
पीडी [20]खरविशिखांहीं; सिंह नखांहीं जसा [21]कुरंगांतें. ॥ ६७७

**मा**तलि [22]रुधि **रा** द्र तनू [23]भासे, **र**विच्या रथीं जसा **अ**रुण; ।
[24]कनकविकृतशरनिकरें **रा**म गमे [25]**अ**र्यमा जणों तरुण. ॥ ६७८

**रा**म [26]अरिंद **म** बाणें छेदी रिपुचा क्षणांत [27]रथकेतु; ।
ते [28]तुमुल **यु**द्ध करिती राक्षसमनुजेंद्र [29]नाशजयहेतु. ॥ ६७९

**रा**वण **म्ह**णे, '**ज** याची वांच्छा धरितोसि [30]वानराधारें; ।
[31]उडुपें सागर तरणें, त्याहुनिही कर्म हें नरा! [32]धारें. ॥ ६८०

**तू**ज [33]**य**मक्ष **य** वांच्छा झाली, म्हणवूनि धांवलास रणा; ।
[34]सरणावर निज नि[35]जजनसहजासह, जा, नयें **शि**[36]वा [37]शरणा. ॥

---

१. नरवरातें (रामातें). २. पृथ्वीवर. ३. बाणादियुक्त. ४. जगत्पूज्यें. ५. देवांला जय देणाऱ्या रथावर. ६. पृथ्वीवरील श्रेष्ठवीर. ७. मयासुरानें ब्रह्मदेवाचा वर संपादून लोह, रजत आणि सुवर्ण यांचीं तीन अभेद्य अशीं पुरें निर्माण केलीं; आणि त्यांचें आधिपत्य तारकासुर, कमलाक्ष आणि विद्युन्माली या तिघां असुरांस दिलें. हे तिघेहि देवांस उपद्रव देऊं लागले तेव्हां महादेवानें देवांच्या प्रार्थनेस अनुसरून त्या त्रिपुरांचा नाश केला, अशी कथा आहे. तिचा संबंध येथें दाखविला आहे. ८. अंधकारसमूहनाशक. ९. सूर्य. १०. सर्पास्त्र सोडिल्यानें साप उत्पन्न होतात. ११. गरुडास्त्रें. १२. प्रतीकार केला. गारुत्मत अस्त्र सोडिल्यानें गरुड उत्पन्न झाले आणि त्यांनीं सर्पांचें निर्दाळण केलें. १३. सर्प. १४. रामचंदनगंधलुब्ध. १५. गरुड. १६. सुवर्णमय. १७. देदीप्यमान. १८. इंद्राच्या. १९. घोड्यांतें. २०. तीक्ष्णबाणांहीं. २१. हरिणांतें. २२. रक्तार्द्रदेह. २३. शोभे. २४. सुवर्णभूषित बाणसमूहें. २५. सूर्य. २६. शत्रुनाशक. २७. रथध्वज. २८. ज्यांत गर्दी उडाली आहे असें. २९. शत्रुनाश आणि स्वजय यांला कारण असें. ३०. वानरांच्या बळावर. ३१. लहान नौकेनें. ३२. धाकटें. ३३. यमगृहेच्छा. ३४. चितेवर. ३५. वानरलक्ष्मणासह. ३६. महादेवा. ३७. आश्रयार्थ.

आतां तुला पे[1] **रा** सु क्षणांत करितों.' असें वदोनि खळ ।
सोडी शूल, तदा प्रभु खंडी हरिशक्तिनेंचि[2] तें निखळ[3].६८२

बाणें छेदुनि **म** मीं केला सिंदूरपर्वतावाणी[4]; ।
तेव्हां 'जयति श्रीमान् **रा**म' अशी जन्मली नभीं वाणी.६८३

**द**शवदनें जै[5] **जै** यकामें सोडुनि शरपंक्तिला अहीनेला[6] ।
शोणितवर्षिघनाच्या[7] तुळेशि[8] **ख**रवायुचा[9] अंही[10] नेला.॥६८४

झाले सुर भ[11] **य** परवश, उत्पातहि[12] फार पावले जनन[13]; ।
जन न करिति जयनिश्चय, म्हणती, 'भासे भविष्य आज नन.'॥

**रा**म म्हणे, 'तु **ज** असतें बळ, जरि मजसीं करावयास रण; ।
तरि जनकसुताहरणीं[14] धरिलेंशि किमर्थ[15] तस्कराचरण[16] ?॥६८६

तुज निःसंश **य** **का**ळें विलोकिलें, म्हणुनि मूढ झालास; ।
ज्याच्या समीप यम[17] ये, तो मानी सत्य इंद्रजालास[18].' ॥ ६८७

ऐसें वदोनि **रा** घव तीव्रशराचा[19] क्षणें करूनि पट[20]; ।
पापादर्शनकामें[21] झांकी जाणों स्वशत्रुला निपट. ॥ ६८८

वानरही द्रु **म** शिखरें आच्छादिति **य**क्षपत्यवरजाला[22]; ।
जालावृत[23] मत्स्य जसा, तैसा **द**शकंठ भासता झाला.॥ ६८९

मूर्छित नष्ट[24] **श्री** तो सारथिनें **रा**क्षसेंद्र पळवीला; ।
प्लवंगबलें[25] सिंहरवें[26] जय **कै**लासीं **शि**वासि कळवीला. ॥ ६९०

संज्ञा[27] पावुनि **रा** गें **रा**वण निंदी स्वकीयसारथिला; ।
त्याणें 'मूर्छितरथिला रक्षावें' हा स्वधर्म संकथिला[28]. ॥ ६९१

पुनरपि सें[29] **म** राकांक्षी **रा**वण येतां, **अ**गस्त्यमुनि सदय ।
**र**घुनाथाला शिकवी येउनि, जयकारि **भा**नुचें हृदय[30].॥६९२

---

१. गतप्राण. २. इंद्रशक्तिनेंचि. ३. निर्मल, निखालस. ४. शेंदूराच्या पर्वतासारखा. ५. जयेच्छु. ६. श्रेष्ठेला. ७. रक्तवर्षी मेघाच्या. ८. समतेला. ९. खरराक्षसवायूचा. १०. सर्प. (राम.) ११. भयाक्रांत. १२. धरणीकंप, उल्कापात, इत्यादि अशुभसूचक अद्भुत प्रकार. १३. जन्म. १४. सीतेला नेण्याच्या कामीं. १५. कशास्तव. १६. चोराचें आचरण. १७. मृत्यु. १८. आहे तें न दिसावें आणि नाहीं तें दिसावें ज्याणें अशी विद्या, माया, दृष्टिमोह. १९. तीक्ष्ण बाणांचा. २०. पडदा. २१. दुष्टाचें दर्शन होऊं नये या बुद्धीनें. २२. रावणाला. (यक्षपतीचा म्ह० कुबेराचा अवरज म्ह० कनिष्ठ बंधु, रावण.) २३. जाळ्यांत सांपडलेला. २४. गतलक्ष्मीक. २५. वानरसैन्यानें. २६. सिंहनादें. २७. सावधपणा, चेतना. २८. सांगितला. २९. युद्धेच्छु. ३०. 'आदित्यहृदय' या नांवाचें स्तोत्र. (रामायण, युद्धकांड, स० १०५ श्लो० ३-२७ पहा.)

रविहृदय **ज** प नृपालें त्रिवार केला धरूनि विश्वास; ।
'शत्रुं[1] जहि[2] राम[3]!' असें वदोनि दे हर्ष सूर्य विश्वास[4]. ॥ ६९३

मग रघुना **य** करावण हे द्वैरथ[5]युद्ध तेधवां करिती; ।
शस्त्रास्त्राच्या निकरें[6] द्यावाभूम्यंतरा[7]सिही भरिती. ॥ ६९४

केलीं राक्षस **रा** जें, परि रामाशीं न चाललीं कपटें; ।
होइल निबद्ध कैसा प्रज्वलितज्वाल[8] वन्हि नैकपटें[9]? ॥ ६९५

राम[10]पराक्र **म** पावकदग्धाखिलराक्षसाटवीमाजी; ।
उठतांक्षणीं कबंधें[11], गमती तीं स्थाणुं[12]ची जणों राजी[13]. ॥ ६९६

युद्धीं रघुरा **ज** करें सार्थक[14] झालें म्हणोनि काय सुखें? ।
नाचति रणीं कबंधें, हांसति विच्छिन्न[15]कंठनालमुखें. ॥ ६९७

रथसूतह[16] **य** विवर्जित विरथ पदाती[17] क्षपाचराधिपती[18]; ।
द्विप[19] तीव्रहरिनखक्षत[20], कीं प्रभुसूर्यें तदीक्षणें[21] दिपती. ॥ ६९८

खरविशिखें[22] **ज** गदीशें[23] रामें जें छेदिलें दशास्यशिर[24], ।
तें तें झालें प्रकट ब्रह्मवरानें[25] न लावितां उशिर. ॥ ६९९

दशमूर्धतो[26] **य** जें तीं, शतवार च्छेदितां नृपें निकरें; ।
दशमुख पद नमुनि जणों 'पुरे' असा प्रार्थिला शिरोनिकरें[27]. ॥

मग तो रघु **रा** ज बळी संहारायासि निर्जरद्वेषी[28]; ।
ब्रह्मास्त्रें[29] अभिमंत्रुनि अगस्तिदत्ताशुगाप्रति[30] प्रेषी. ॥ ७०१

तो शर पर **म** प्रखर ज्वलनाशनिदीप्ति[31] काय यमदंड[32]? ।
अंडजपतिपवनगती[33] धांवे रिपुला करावया दंडें[34]. ॥ ७०२

---

१. शत्रूप्रत. २. जिंक, मार. ३. हे रामा. ४. जगास. ५. दोन रथांनीं प्रवर्तित अथवा दोन रथांचें युद्ध. ६. समूहें. ७. स्वर्गपृथ्वीचे अंतरासिहि. ८. जळणाऱ्या ज्वाला आहेत ज्याला असा (वह्नि). ९. अनेकवस्त्रें. १०. रामपराक्रमाग्निदग्धसर्वराक्षसवनांत. ११. धडें. १२. जळलेल्या वृक्षाचे खांब त्यांची. १३. पंक्ति. १४. मरण आलें. १५. तुटलीं आहेत कंठनालमुखें ज्यांचीं अशीं. १६. रथ, सारथी, घोडे, यांनीं रहित. १७. पादचारी. १८. रावण. (राक्षसांचा स्वामी.) १९. गज. द्विप म्ह० दोन साधनांनीं (मुखानें आणि करानें) उदक पिणारा. याच कारणास्तव हत्तीला 'अनेपक' असें दुसरें अन्वर्थक नांव आहे. २०. तीव्रसिंहनखभिन्न. २१. त्याचीं (रावणाचीं) नेत्रें. २२. तीक्ष्णबाणें. २३. विश्वनायकें. २४. रावणशिर. २५. ब्रह्मदेवाच्या वरानें. २६. दहा मस्तकरूप कमलें. २७. मस्तकसमूहें. २८. राक्षस. (देवांचा शत्रु.) २९. पैतामहअस्त्र. ३०. अगस्त्यदत्तबाणाप्रति. (हाच बाण ब्रह्मदेवानें इंद्रास दिला असून इंद्रानें अगस्त्यमुनिद्वारा रामास दिला.) ३१. अग्निवज्रकांति. ३२. शिक्षा करण्याचें साधन. (काठी.) ३३. गरुडवायुगती. ३४. शिक्षा. ('दंड'शब्दाचा 'शिक्षा करणें' हाच मूळचा अर्थ असून पुढे अर्थांतरें झालीं; जसें यमदंड.)

तो सुविचित्र **श्री** शर झाला दशकंठहृच्छिलैकघन; ।
रामयशःक्षीरधिविधु सुरसंघमनोमयूरहर्षघन. ॥ ७०३

**रघुवीरश रा** घातें भिन्नहृदय तो पडे गतप्राण; ।
रिपुजीवनधन घेउनि, पुनरपि तूणीं प्रवेशला बाण. ॥ ७०४

विगतप्राण **म** हासुर पडतां सवनाकरा धरा सारी ।
कांपे चळचळ, नसतां नाविक अनिलें जलीं तरीसारी. ७०५

**रावणतनु ज** गतीवर, **रामा**वर देवपुष्पवृष्टि गळे; ।
बाष्पें निशाचरांचे अमरांचे जाहले निरुद्ध गळे. ॥ ७०६

'रघुनाथो ज **य** ति' असें गर्जति सुरसिद्ध, हर्षले सर्व; ।
दुंदुभि वाजति, नाचति वराप्सरा, कीर्ति गाति गंधर्व. ॥ ७०७

राक्षसतिमि **रा** पह**रघु**राजयशश्चंद्रचंद्रिकाजालें ।
तापविवर्जित भुवन, प्रकटसुधापूर्णकुंभसें झालें. ॥ ७०८

सुप्रभ दिनें **म** णि झाला, अतिशीतल मंद गंधवह वाहे; ।
त्या पर्वी ब्रह्मांड प्रभुकीर्तिक्षीरसागरीं न्हाहे. ॥ ७०९

सर्व कपि प्रां **जे** लि ते स्तविती **रा**मास शर्मधामास; ।
गाती नाचति भेटति शत्रुविरामास पूर्णकामास. ॥ ७१०

तेव्हां सविन **य** वंदी **बि**भीषण प्रेमपूर्ण देवास; ।
उठवुनि निजभक्तातें भुजांतरीं **राम**चंद्र दे वास. ॥ ७११

त्याला **रघुरा ज** म्हणे, 'स्वबंधुच्या पारलौकिकासि करीं; ।
क्षाळीं विवेकनीरें, स्वीयांचा शोककर्दम स्वकरीं. ॥ ७१२

---

१. विलक्षण तेजस्वी. २. रावणहृदयशिलेस घण. ३. रामकीर्तिसमुद्रास चंद्ररूप. ४. देवसमूहमनोमयूरास हर्षकारी मेघच. ५. मृत. ६. शत्रुजीवितरूप धन. ७. भात्यांत. ८. आपलें इष्ट कार्य करून नंतर स्वस्थळीं पुन: गेला, असा भाव. ९. अरण्यें आणि खाणी यांसहित. १०. पृथ्वी. ११. सगळी. १२. नावाडी. १३. वायूनें. १४. नावेसारखी. १५. आनंदबाष्पांनीं अमरांचे आणि दु:खबाष्पांनीं निशाचरांचे गळे बंद झाले. १६. कंठ. १७. राम जय पावतो. १८. स्वर्गातील श्रेष्ठ वेश्या. १९. राक्षसांधकारनाशकरामकीर्तिरूप चंद्राच्या चांदण्याच्या जालानें. २०. दु:खहीन. २१. स्पष्टअमृतपूर्णकलशतुल्य. २२. तेजस्वी. २३. सूर्य. २४. वायु. २५. त्या प्रसंगीं. २६. ब्रह्मगोल, चतुर्दशभुवनात्मक प्रदेश. २७. रामकीर्तिरूप क्षीरसागरीं. २८. स्नान करी. २९. हात जोडलेले. ३०. सुखस्थानास. ३१. शत्रुनाशकास. ३२. ज्याचा मनोरथ पूर्ण झाला आहे अशा (रामास). ३३. नम्रतेनें युक्त असा. ३४. दोहों बाहूंमध्यें. ३५. स्थान. (आलिंगन.) ३६. उत्तरकार्यातें, और्ध्वदेहिक कार्यातें. ३७. विचाररूप उदकानें. ३८. स्वकीयजनांचा. ३९. शोकरूप चिखल.

करणें क्रिया **य** थोक्त, त्वद्बंधु जसा तसाच हा माझा; ।
[१]मरणान्त मात्र वैर, क्षिप्र [२]ज्वलनीं तयासि होमा जा. ॥ ७१३

दशमुखदा[३] **रा** सकला झाल्या वैधव्य[४]पावकें [५]विकळा; ।
कर त्यांचें सांत्वन हो, आली त्यांलागिं आज ही [६]अकळा.' ॥

[७]रविवंशोत्त **म** वाक्यें जाउनि तो बंधुतें [८]परेतातें ।
आलिंगुनी म्हणे, 'हा! केलें सुरकाम त्वां पुरें तातें. ॥ ७१५

तव हृदय **[९]श्री** कंठीं, 'शिवशिव' म्हणशी सदैव तूं वदनें; ।
म्हणुनि जणो तुज वधिलें, **[१०]शिव**दग्धें [११]अन्यदुःसहें [१२]**म**दनें. ७१६

कीं राज्यमदें **रा** जा! **शि**वासि विसरूनि सेविला **का**म; ।
या अन्यायें [१३]क्षोभ [१४]**स्म**ररिपुचा जाहला [१५]महोद्दाम. ॥ ७१७

[१६]वसुधासुर **म** राशीं केला तूं द्रोह, पीडिला धर्म; ।
कर्म [१७]अमंगळ करितां [१८]भूतरिपू कोण पावला [१९]शर्म? ॥ ७१८

[२०]पापाचारें नि **ज** जन नरवानरहस्तकेंचि मारविला; ।
[२१]**मा**रविलास**त**मानें गिळिलें तुज राक्षसोत्तमा! रविला.' ॥ ७१९

यापरि [२२]सदे **य** स्वांतें विलाप केला **बि**भीषणें, तंव ती ।
[२३]युवती **द**शाननाची धांवत आली [२४]वियोगशोकवती. ॥ ७२०

[२५]**द**शमुखदा **रा** पतिला आलिंगिति [२६]शोकतापधृतकंपा; ।
[२७]प्रावृट्काळीं गगनीं [२८]जेंयापरी [२९]धूमयोनिला [३०]शंपा. ॥ ७२१

शोकग्रस्त प्र **म** दा, 'हा नाथ!' असें म्हणोनियां रडती, ।
[३१]उररीकृतशोकभरा [३२]कुररीसम एकदांचि आरडती. ॥ ७२२

---

१. मरणापर्यंत, पुढें नाहीं. २. अग्नींत. ३. स्त्रिया. ४. अग्नीनें. ५. व्याकुळ. ६. अवनति, दुर्दशा. ७. रामवाक्यें. ८. मृतातें. ९. शिवीं. १०. शिवानें जाळिलेला अशा. ११. अन्यास सहन करण्यास अशक्य. १२. कामानें. शिवाचा भक्त रावण आणि शिवाचा शत्रु मदन, तेव्हां मदनानें आपल्या शत्रूच्या भक्तास वधिलें. रावण काममोहित होऊन मरण पावला, असा भावार्थ. १३. उग्र कोप. १४. मदनशत्रु (शिव) त्याचा. १५. मोठा प्रबळ, दुर्दान्त, दांडगा. १६. ब्राह्मण-देवांशीं. १७. अशुभ. १८. प्राणिद्रोही. १९. सुख. २०. दुष्ट आचरणानें. २१. कामक्रीडाराहूनें. २२. सदयचित्तें. २३. स्त्री. २४. वियोगशोकयुक्त. २५. रावणस्त्रिया. २६. शोकतापें धरिला कंप ज्यांणीं अशा. २७. पावसाळ्यांत. २८. ज्याप्रमाणें. २९. मेघा. धूम (धूर) आहे योनि (उत्पत्तिस्थान) ज्याची तो, असा शब्दार्थ. मेघ तीन प्रकारचे मानिले आहेत:—वन्हिज, निःश्वासज आणि यज्ञज. धूमयोनि वन्हिज, जीमूत निःश्वासज, आणि पुष्करावर्तकादि घन यज्ञज. ३०. विद्युल्लता. ३१. अंगीकृत शोकभर ज्यांणीं अशा. ३२. पक्षीविशेष, त्याच्या स्त्रियांसारिख्या.

म्हणती, 'कां निजलासि क्षितिवरि? उठ ये [1]स्वकेलिशयनातें; ।
सप्रेम एकदां तरि पाहें, उघडोनि रम्यनयनातें.' ॥ ७२३

हे [2]महिषी [3]मय कन्या राज्ञी मंदोदरी स्वयें आली; ।
आलिंगुनि तुज देवा! समजावितसे तुझी प्रिया [4]आली. ७२४

तव पदभजनावांचुनि, नेणों आणीक हे तुझी [5]आण; ।
प्राणपते! हें वदतों, मिथ्या कीं सत्य तें मनीं आण. ॥ ७२५

अपराध काय झाला? रुसवा केला दयानिधे! कां जी? ।
अमृतप्राशन करवुनि पाजावें काय शेवटीं [6]कांजी? ॥ ७२६

सेवक अमरादि तुझे, [7]कांचनमय [8]दुर्ग [9]मुदितजनवर्ग; ।
[10]भर्ग प्रसन्न झाला, अधिक तुला काय भासलो स्वर्ग? ॥ ७२७

त्याच्या करीं समर्पण करणें, जो पुत्रतुल्य रक्षील; ।
आम्हांशि शोकहस्तीं दिधलें, हा याक्षणींच भक्षील.' ॥ ७२८

ऐशा [11]विगतश्री त्या [12]विकलस्वांता [13]द्विषन्निहतकांता ।
[14]कांता दशाननाच्या करिती तेव्हां अनेक आक्रांता. ॥ ७२९

त्या [15]पंक्तिकंधराला [16]संस्कार बिभीषणें स्वयें केला; ।
समजावुनि [17]पाठविले, ते सारे [18]बंधुदार लंकेला. ॥ ७३०

[19]भक्तसुरद्रुम राघव [20]अंबरमणिवंशपुंडरीकरवी ।
[21]लंकाख्य [22]पारितोषिक दे [23]पौलस्त्यासि लक्ष्मणाकरवीं. ॥ ७३१

[24]जनकसुता जगतीवर [25]मनुजेंद्राज्ञप्त [26]वायुपुत्रघन ।
उठवी [27]रोमांचांकुरें [28]जयवागमृतें हरूनि ताप [29]घनें. ॥ ७३२

[30]दशकंठक्षय वार्ता ऐकुनि सीता, 'म्हणे [31]मरुत्पोता! ।
दावीं आतां राजा मजला, [32]चिंतामहासरित्पोता!' ॥ ७३३

---

१. स्वक्रीडाशय्येतें. २. पट्टाभिषिक्त स्त्री. ३. मयासुराची (दुसरी) कन्या. ४. सखी. ५. शपथ. ६ पेज. ७. सुवर्णमय. ८. किल्ले. ९. आनंदित आहेत लोक ज्याच्या ठायीं असे. १०. शिव. ११. तेजोहीन. १२. विकलचित्ता. १३. शत्रूंनीं मारला पती ज्यांचा अशा. १४. स्त्रिया. १५. रावणाला. (पंक्ति=दहा, कंधर=कंठ. दशकंठ.) १६. अंत्यविधि. १७. 'दार'शब्द पुल्लिंगी आणि बहुवचनी म्हणून 'पाठविले' असें पुल्लिंगी रूप योजिलें आहे. १८. रावणस्त्रिया. १९. भक्तकल्पवृक्ष. २०. सूर्यवंशकमलविकासक सूर्य. २१. लंकानामक. २२. बक्षीस. २३. बिभीषणास. २४. सीतारूप पृथ्वीवर. २५. रामानें आज्ञापिलेला. २६. मारुतिरूप मेघ. २७. हर्षानें अंगावरील केशांचीं अग्रें उभीं राहणें ही रोमांचविकारक्रिया. २८. जयवाणीरूप अमृतें. २९. मोठा. ३०. रावणवधाची बातमी. ३१. हे वायुपुत्रा. (मारुते.) ३२. हे चिंतानदींतील नौकारूपा.

हा काम[1] समी[2] **रा** त्मज सांगे, तेव्हां दयाळु दाशरथी ।
'जा आण जानकीला' ऐसें स्वमुखें बिभीषणासि कथी. ॥ ७३४

प्रभुवचनें **म** ग त्याणें स्नाता[3] धृतभूषणा[4] जगन्महिता[5] ।
बैसवुनी नरयानीं[6] अतिहर्षें आणिली धरादुहिता[7]. ॥ ७३५

कौसल्यातनु[8] **ज** म्हणे, 'सीते! दशकंठ पावला निधन[9]; ।
जो तस्कर[10] लंकेला आला माझें बळें हरूनि धन[11]. ॥ ७३६

अपवादाल[12] **य** जो जन, त्याला लोकांत भेटती न शिवें[13]; ।
वसलीस परगृहीं तूं म्हणउनि तुज सर्वथैव मी न शिवें. ॥ ७३७

निंदेस[14] तुं, तु **ज** ला मी वरितां दोघांस ही नसे शर्म[15]; ।
मर्मच्छेदक[16] जनवाग्बाण निवारावया नसे वर्म[17].' ॥ ७३८

यापरि अप्रि **य** वदतां, आलें दुःखाब्धिनीर[18] नेत्रांस; ।
गात्रांस कंप सुटला, सीता बहु पावली मनें त्रास. ॥ ७३९

अघशंका[19] वा **रा** या प्रत्यय[20] उपजावया, विशुद्ध सती ।
शपथपुरःसर दीप्त ज्वलनज्वालांत[21] जाहली धसती[22]. ॥ ७४०

जाणों विरहें[23] **म** याग्नी क्षितितनयेला[24] असह्य तो जाळी; ।
तापें ताप हरावा, म्हणउनि अनलीं[25] प्रवेशती झाली. ॥ ७४१

हेमांबुजिनी[26] **श्री** मत्सरस्वतीच्या हृदीं[27] तसी साजे; ।
ज्वलनाधिदेवता[28] कीं, त्रिलोकपूज्या[29] जगन्निवासा[30] जे. ॥ ७४२

कीं स्वच्छपद्म[31] **रा** गग्रावविरचितालवाल हेमलता[32] ।
माणिक्यदर्पणांतस्थ[33]:स्त्रीप्रतिबिंब हें म्हणो भलता. ॥ ७४३

---

१. इच्छा. २. वायुपुत्र. (मारुति.) ३. स्नान केलेली. ४. भूषणालंकृत. ५. जगत्पूज्या. ६. पालखींत. ७. सीता. ८. राम. ९. मरण. १०. चोर. ११. सीतारूप धन. १२. निंदास्थान. १३. कल्याणें. १४. निंदेस तूं वरितां, (आणि) तुजला मी (वरितां), दोघांसही शर्म नसे—असा अन्वय. १५. सुख. १६. मर्मभेदी लोकवाग्बाण. १७. कवच. १८. दुःखसमुद्रोदक. १९. पापाचा संशय. २०. विश्वास, प्रतीति. २१. पेटलेल्या अग्नीच्या ज्वालांमध्यें. २२. निर्भय प्रवेश करणारी. २३. वियोगजात अग्नि. २४. सीतेला. २५. अग्नींत. २६. सुवर्णकमलिनी. २७. डोहीं. २८. अग्निदेवता. २९. त्रैलोक्यानें पूज्य अशी. ३०. जगताचें आश्रयस्थान अशी. ३१. शुभ्रमाणिकरूप दगडांचें केलें आहे आळें (आलवाल) जीस अशी. ३२. सुवर्णवेल. ३३. माणकाच्या आरशांतील देवस्त्रीप्रतिबिंब.

[1]धृतमूर्ति तो **म** रुत्सख[2] **सी**ता आपूनि **रा**घवासि म्हणे; ।
'[3]क्षितिजास्पर्शें झालों विशुद्ध मी, हीस घे नृपालमणे[4] !'॥७४४

[5]**हरशक्राब्ज** **ज** न्मप्रभृतित्रिदशर्षिदेवगंधर्व ।
म्हणती, '**रा**मा ! **सी**ता निर्दोषा[6] सत्य बोलतों सर्व. ॥७४५

तुजला प्रत्य[7] **य** दिधला, स्त्रीचा स्वीकार निर्विशंक[8] करीं[9]; ।
हे [10]**श्री**, तूं [11]**पु**रुषोत्तम, धर आतां **जा**नकी विपंका[12] करीं[13].' ॥

[14]देवर्षिप्रव **रा** ज्ञा **रा**में स्वीकारिली वधूसहित; ।
तों **द**शरथही आला, स्नेहें सांगावया सुतास हित. ॥ ७४७

उतरोनियां **म** हीवर **द**शरथ धरि नंदनाशि[15] हृत्संगीं[16]; ।
हुंगोनि उत्तमांगीं[17], स्थापी प्रेमाश्रुमार्जितोत्संगीं[18]. ॥ ७४८

श्वशुरपदीं **ज** नकसुता नमन करी, जेंवि **क**श्यपास **र**मा; ।
आशीर्वादें तीतें[19] नृपनाथें[20] तुष्टि अर्पिली परमा. ॥ ७४९

दुसरा तन[21] **य** सुविनयें, प्रणमन[22] करि तातपादजलजातें[23]; ।
माथा क्षाळूनि जटा, आर्द्र करी **दि**ग्रथाश्रुजल[24] ज्यातें. ॥७५०

नृपति म्हणे, '[25]**ज** लजाक्षा ! वत्सा ! **सी**ता सती [27]सुनिष्पंका ।
**लं**[26]कानाथाराते ! पापाची तूं धरूं नको शंका. ॥ ७५१

[28]**ज**नकनृप **य** जनजनना जननाथा ! हे पतिव्रता धन्या ।
झाली प्राप्त तुला, जशि हरिला पूर्वी पयोधिची[29] कन्या. ७५२

हे [30]**मा**नसचा **रा** ची वाङ्मुक्तांची[31] सदैव [32]रसिका कीं ।
नृपहंसा ! तव हंसी, न धरी मन पंकभक्षित्या[33] काकीं. ॥ ७५३

---

१. मूर्तिमान्. २. वायूचा मित्र. (अग्नि.) ३. सीतास्पर्शें. ४. राजश्रेष्ठा. ५. शिव, इंद्र, ब्रह्मदेवादि, देवर्षि, देव आणि गंधर्व. ६. दोषरहिता. ७. प्रमाण, विश्वास. ८. निःसंशय. ९. कर. १०. लक्ष्मी. ११. विष्णु. १२. निर्दोष. (पंक, चिखल म्ह० पाप त्यानें रहित.) १३. हातीं. १४. देवर्षिजनांतील श्रेष्ठांचें वचन. १५. आनंद देणाऱ्या पुत्रास. १६. हृदयाजवळ. १७. मस्तकीं. १८. प्रेमाश्रूंनीं आर्द्र जी मांडी तिच्या ठायीं. १९. सीतेतें. २०. दशरथानें. २१. लक्ष्मण. २२. नमस्कार. २३. दशरथपादकमलातें. २४. दशरथनेत्रजल. २५. कमलनेत्रा. २६. रावणशत्रो. २७. संशय. २८. जनकयज्ञोत्पन्ना. २९. समुद्राची कन्या. (लक्ष्मी.) ३०. मानससरोवरीं फिरणाऱ्याची. ३१. वाणीरूप मोत्यांची. ३२. अनुरागिणी, प्रीति करणारी, रससेवन करणारी. ३३. चिखल खाणाऱ्या कावळ्याच्या ठायीं.

**क्षि**तिकन्येस, **म** हीस, श्रीमद्‌योध्येस, कुलगुरूक्तीस, ।
पाळीं जातिस सर्व, प्रजेस निजधर्मविप्रभक्तीस. ॥ ७५४
[1]अस्थिरता जे **श्री** ची, ती तूझ्या [2]शत्रुजीवनीं राहो; ।
संतत कल्याण असो, [3]विपक्षलोकप्रतापरविराहो! ॥ ७५५
जे सो[4]दरपौ **रा** त्तप्रधानजननीवसिष्ठमुख **रा**मा! ।
यांला प्राणासम तूं मानावें, [5]सद्गुणद्रुमारामा!' ॥ ७५६
ऐसें[6] स्वहित **[7]म** नःप्रिय ऐकुनि, **सी**तापती करी मान्य; ।
मग सकळांसि विचारुनि, गेला स्वर्गासि तो[8] [9]जगन्मान्य. ॥
[10]ऋक्षप्लवंग **ज** न जो, मृत तो [11]**रा**मप्रियार्थ **दे**वेशें[12] ।
उठवीतां, पूर्वस्थिति नेणुनि, गर्जे [13]रणस्पृहावेशें. ॥ ७५८
सुरजन **ज य** जयशब्दें गर्जति, वाद्यें अनेक वाजविती; ।
पुष्पांहीं [14]वर्षर्तुसि, [15]चपलांसि [16]वराप्सराहि लाजविती. ॥ ७५९
[17]सांद्रानंदभ **रा** नें तेव्हां [18]प्लवगेंद्रसंघ ते [19]लवले; ।
[20]लव [21]लेखर्षिस्वांतीं दुःख नसे, [22]तापदीप मालवले. ॥ ७६०
[23]**भ**र्गादिक अ **म** र सुखें स्वर्गा गेले पुसोनि **रा**माला; ।
[24]रघुपतिगुणमुक्तांची शोभे सर्वांचिया [25]गळां माला. ॥ ७६१

---

१. अस्थिरत्व. २. शत्रूच्या जीवितांमध्यें. ३. हे शत्रुप्रतापसूर्यग्रासक. ४. बंधु, पुरवासी लोक, आप्त, प्रधान, माता, वसिष्ठप्रमुख जे त्यांला. ५. सुगुणवृक्षाच्या बागा. ६. असें दशरथाचें वचन. (रामायण, युद्धकांड, स० ११९ श्लो० १३-२३ हे पंतांच्या प्रस्तुत वर्णनाशीं ताडून पाहण्यालायक आहेत.) ७. मनाला आवडणारें. ८. दशरथ. ९. जगत्पूज्य. १०. आस्वलवानर. ११. रामाला बरें वाटावें यास्तव त्याच्या प्रार्थनेवरून इंद्रानें मृतवानरादि जनास सप्राण केलें. १२. इंद्रें. १३. युद्धेच्छेच्या आवेशानें. १४. पर्जन्यकालासी. १५. विजांसी. १६. श्रेष्ठ देववेश्याही. (अप्सरा ह्या समुद्रमंथनकाळीं अप् म्ह० उदक यापासून उत्पन्न झाल्या:—'अप्सु निर्मथनादेव रसात्तस्माद्वरस्त्रियः। उत्पेतुर्मनुजश्रेष्ठ तस्मादप्सरसोऽभवन् ॥.' ह्या गंधर्वांगना असून स्वर्वेश्या आहेत. ह्या इंद्राच्या दासी असून त्याला कोणाच्या तपाचें भय वाटलें म्हणजे तपोभंग करण्याच्या कामीं मोठ्या कुशल, म्हणून त्याच्या आज्ञेनें ह्याच जावयाच्या आणि कार्यसिद्धि करून परत यावयाच्या. उर्वशी, मेनका, रंभा, घृताची, तिलोत्तमा, सुकेशी, मंजुघोषा इत्यादि प्रमुख सुरवेश्या होत. बाणकवीनें यांचीं चवदा कुळें असल्याविषयींचा उल्लेख कादंबरीग्रंथांत केला आहे. अप्सरा आपल्या नृत्यविलसितानें विजांस लाज आणतात.) १७. अतिहर्षाच्या भारानें. १८. वानरसमूह. १९. दडपून गेले. २०. किंचित्. २१. देवर्षिचित्तीं. २२. संतापरूप दीप. २३. शिवादिक. २४. रामाच्या गुणरूप मोत्यांची. २५. रामाची सर्व स्तुति करूं लागले, असा भावार्थ.

[1]मातलिला वि[2] **ज** योत्तर पूजुनि [3]नाकासि पाठवी **राम**; ।
[4]तामरसप्रभवाला जैसा हर तो [5]पुरत्रयविराम. ॥ ७६२

तो [6]दशकंठ **य** वीयान् प्रार्थी पूजावयास **रा**मातें; ।
त्यास म्हणे प्रभु, 'पूजन **भ**रताविण [7]नेष्ट [8]वत्सा! मातें. ७६३

कपिसैन्यपू **ज** नानें पूजित मी, यांत अन्यथा नाहीं; ।
तूं जयधन बहु दिधलें, आतां इच्छा मनीं नसे कांहीं. ॥७६४

कैकेयी[9]तन **य** मला चिंतितसे [10]जीवनादुदासीन; ।
[11]वल्की [12]जटी [13]फलाशी [14]भूशायी [15]दर्भसंस्तरासीन. ॥ ७६५

'[16]मच्चित्तैकप **रा** तें जातों भेटावयासि **भ**रतातें; ।
आज्ञा केली त्याचा, उतराया [17]भूरि शोकभर तातें.'॥ ७६६

हें रघुसत्त **म** वदतां, **बि**भीषणें सर्व पूजिलीं [18]कटकें; ।
दिधलीं [19]हाटकमणिमयसत्पदकें [20]हारकुंडलें [21]कटकें. ॥ ७६७

[22]तदुपरि तो **श्री**[23] दाचें [24]पुष्पकयान [25]क्ष्मासुतेशाला; ।
अर्पुनि म्हणे **बि**भीषण, 'याणें जावें [26]स्वकीयदेशाला.'॥७६८

तेव्हां [27]यानव **रा** वर [28]सानुज सस्त्रीक **राम**भद्र चढे; ।
[29]सतडिन्मेघाधिष्ठितरत्नाचलमौलिशींच साम्य घडे. ॥ ७६९

[30]राज्याभिषेक **म** हसुखकाम [31]प्लवगेंद्रराक्षसाधिप ते ।
म्हणती, 'आम्हांसहि ने [32]साकेताला, [33]समस्तलोकपते !'॥७७०

---

१. इंद्रसारथि त्याला. २. जयानंतर. ३. स्वर्गासि. ४. ब्रह्मदेवाला. (तामरस म्ह० कमल त्यापासून प्रभव म्ह० उत्पत्ति आहे ज्याची तो.) त्रिपुरनाशाच्या समयीं हराचा (महादेवाचा) ब्रह्मदेव सारथी झाला होता, या कथेचा येथें संबंध दाखविला आहे. ५. त्रिपुरनाशक. ६. बिभीषण. ७. इष्ट नाहीं. ८. हे वत्सा. ९. भरत. १०. प्राणादिकीं उदासीन. ११. वल्कलधारी. १२. जटाधारी. १३. फलभोजी. १४. भूमीवर निजणारा. १५. दर्भासनस्थ. १६. माझ्याकडे ज्याचें सर्वस्वी मन गुंतलें आहे अशा (भरतातें). १७. बहुत. १८. सैन्यें. १९. सुवर्णखचित रत्नांचीं उत्तम पदकें. २०. कंठभूषणें आणि कर्णभूषणें. २१. कडीं. २२. त्यानंतर. (पूजनानंतर.) २३. कुबेराचें. २४. पुष्पकविमान हें कुबेराचें होतें. रावणानें तें त्याजपासून जिंकून लंकेंत आणिलें. तें आतां बिभीषणानें रावणमरणोत्तर रामास दिलें. राम यांतच बसून परत अयोध्येस आला. नंतर त्यानें तें कुबेराकडे परत पाठविलें. यांत बसून जिकडे जाण्याची इच्छा करावी तिकडे तें जाई. २५. जानकीपति रामाला. २६. अयोध्येला. २७. पुष्पकावर. २८. धाकट्या भावासह. २९. विजेसहित मेघानें अधिष्ठिलेल्या मेरुशिखराशींच. ३०. राज्याभिषेकोत्सवसुखेच्छु. ३१ सुग्रीवबिभीषण. ३२. अयोध्येला. ३३. सकलजनाधिपा हे रामा.

मग **रा**[1]जरा **ज** यानीं, त्यांसहि कटकासमेत पूजुनि घे; ।
परमोत्सवें सवेग, श्रीमत्**सी**तेसवें नरेंद्र निघे. ॥ ७७१

वीर्यें दे[2]वाल **य** जो हरिला होता **द**शाननें पहिला; ।
म[3]हिला सोडुनि जातो, तो म्हणती प्राकृताचिया म[4]हिला. ७७२

**सी**तेसि म्हणे **रा** घव, 'रि[5]पुकटकें या रणांगणीं श[6]मलीं; ।
सु[7]मुखि! म[8]दीयशरानलवदनीं सारीं प[9]तंगशीं गमलीं. ॥ ७७३

शतयोजन **मं**[10] करालय **मा**रुति तुज शोधितां स्वयें तरला; ।
तर लाधलों तुला मी, होती मद्बुद्धि जीवनीं त[11]रला. ॥ ७७४

बाष्पजलें भि **ज** ली क्षिति, येथें माझ्या [12]सरोजपत्राक्षी! ।
[13]**सौ**मित्रि कीं म[14]दात्मा, याहुनि दुःखासि त्या नसे साक्षी. ७७५

सांपडला तो[15] **य** धिच्या तीरीं मजला **बि**भीषणाख्य मणी; ।
म[16]त्पूर्वजकृत सागर या स्थानीं भेटला मला र[17]मणी! ॥ ७७६

हे **सु**गलरा **ज** धानी **कि**ष्किं[18]धा, यास्थळीं असे ता[19]रा; ।
**वा**[20]लिवियुक्ता सुभगा, चंद्रवियोगाकुला जसी ता[21]रा.' ॥ ७७७

तेव्हां सुहृद **य** पतिला स्वानंदें **जा**नकी म्हणे वा[22]टे; ।
'न्याव्या **ता**राप्रमुखा, वानरकांता पुरीस हें वाटे.' ॥ ७७८

**रा**में प्ल[23]वंग **रा** जा धाडुनियां सर्व वा[24]नरप्रमदा; ।
आणविल्या **ता**रेसह यानीं **सी**ता[25]स्वचित्तविभ्रमदा. ॥ ७७९

त्या स्त्रींस कु[26]सु **म** यानीं, स्थापुनि जातां न[27]भःपथें स[28]बळ ।
योजनसमुच्च पर्वत, केवळ दूरूनि भासती सकळ. ॥ ७८०

---

१. राजांचा (यक्षांचा) राजा (प्रभु) कुबेर त्याच्या विमानीं. २. स्वर्ग. ३. पृथ्वीला. ४. स्त्रिया. ५. अरिसैन्यें. ६, निमालीं, मरण पावलीं. ७. हे सीते. ८. मद्बाणाग्निमुखीं. ९. शलभासारिखीं. १०. समुद्र. ११. चंचल. १२. हे कमलनयने. १३. सुमित्रेचा मुलगा लक्ष्मण. १४. माझें मन किंवा जीव. १५. समुद्राच्या. १६. माझे पूर्वज जे सगर त्यांनीं केलेला. १७. हे रमणीय स्त्रिये. १८. सुग्रीवाची मुख्य नगरी किष्किंधा. येथेंच रामानें वालिला मारिलें. किष्किंधा जेथें होती तेथें हल्लीं अनागोंदी शहर आहे. हें तुंगभद्रेच्या कांठीं आहे. १९. सुषेण वानराची कन्या आणि वालीची बायको. वालीच्या मरणानंतर ही सुग्रीवाची भार्या झाली. २०. वालि, सुग्रीवाचा वडील भाऊ, त्याच्या मरणानें वियुक्त. २१. नक्षत्र. २२. वाटेस. २३. सुग्रीव. २४. वानरस्त्रिया. २५. सीताचित्तास व आपल्या चित्तास आश्चर्य देणाऱ्या. २६. पुष्पकविमानांत. २७. आकाशमार्गें. २८. ससैन्य.

त्वरिततर **श्री**[१]दाचें विमान जेव्हां नभःपथें चाले; ।
तेव्हां दिसती प्रभुला सामोरे वृक्ष [२]मूध्र कीं आले. ॥ ७८१

[३]कांतेसि म्हणे **रा** घव, 'हा दिसतो ऋष्यमूकनाम नेग; ।
तेथें मजला तूझे **सु**ग्रीवें अर्पिले स्वकीय नैग. ॥ ७८२

[५]**वा**ल्यनुजाचें **म** स्तक, येथें [६]राज्याभिषेकनीरानें; ।
मेघें गिरिशिखर तसें, भिजवीलें या तुझ्याचि [७]दीरानें. ॥७८३

हे **पं**[८]पा [९]पुण्य **ज** ला, येथें तुजला स्मरोनि मी रडलों; ।
**सौ**[१०]मित्र्यंकावरता, मुहूर्तपर्यंत [११]कश्मलें पडलों. ॥ ७८४

**नि**[१२]शिचरना **य** क येथें आला होऊनि [१३]दंभसंन्यासी; ।
तुज नेउनि मज दिधलें दुःख, जनीं जें असह्य अन्यासी. ॥

ज्यास्थानीं [१४]रुचि**रा**क्षी ! तूंचि उभी हें मनांत [१५]माजा ये; ।
आलिंगिले [१६]लताद्रुम, वि[१७]द्रुमबिंबप्रभाधरे ! जाये ! ॥ ७८६

दिसतो [१८]आश्र **म** तो हा, जेथें तुज शोधितां सये ! जाये ! ।
शतवार [१९]सानुजें म्यां, केलें **गो**दावरीस ये जा ये. ॥ ७८७

वाढविले नि **ज** हस्तें, जे तूं [२०]सुतनिर्विशेष [२१]**भू**पुत्री ! ।
ते हे [२२]उटजस्थानीं, मृग शुक शिखि[२३] हंस सारिका [२४]पैत्री. ॥

[२५]पंकजदला **य** ताक्षि ! स्वकरें तूं शिंपिलीस जी [२६]लवली; ।
तीही फलभारानें, भाग्यानें सज्जनापरी लवली. ॥ ७८९

जे त्वां द्वि[२७]जरा **ज** मुखि ! स्वकरें पूजार्थ लाविली [२८]तुळशी; ।
तत्सेवनें [२९]मंदंकीं सां[३०]बुदविद्युल्लतेसवें [३१]तुळशी. ॥ ७९०

[३२]आवालवल **य** निर्मुनि जे [३३]चूताजवळ लाविली [३४]जाती; ।
[३५]पुष्पवती ते त्यातें, आलिंगाया स्वयें पहा ! जाती. ॥ ७९१

---

१. कुबेराचें. २. पर्वत. ३. सीतेसि. ४. दागिने. ५. सुग्रीवाचें. ६. राज्याभिषेकोदकें. ७. देवरानें. (लक्ष्मणानें.) वालीचा धाकटा बंधु सुग्रीव हा या ऋष्यमूकपर्वताचा राजा झाला. ८. ऋष्यमूक पर्वताजवळचें प्रसिद्ध सरोवर. ९. पवित्र उदक जीचें अशी. १०. लक्ष्मणाच्या मांडीवर. ११. मूर्च्छेनें. १२. रावण. १३. रावणानें पर्णकुटींत येऊन जानकीला तापसवेषानें लंकेस नेलें हा कथासंबंध. १४. सुंदरनयने. १५. माझ्या. १६. वेली आणि वृक्ष. १७. पोंवळें, तोंडलें, यांच्या तुल्य अधरकांति जीची अशी. १८. पंचवटींतील आश्रमस्थान. १९. लक्ष्मणासह. २०. पुत्रतुल्य. २१. हे सीते. २२. पर्णशाळेंत. २३. मोर. २४. पक्षी. २५. कमलनेत्रे. २६. लताविशेष. २७. हे चंद्रमुखी. २८. वृक्षविशेष. २९ माझ्या मांडीवर. ३०. समेघ विजेशीं. ३१. तुलना पावसि. ३२. अळें. ३३. आंब्याजवळ. ३४. जाई. ३५. पुष्पिता.

निर्भीति हे [1]ध **रा** सुर करिती विविधक्रिया अनादि सती !; ।
[2]मुदितस्वांतें शांतें, [3]कांते ! हीं श्वापदादिकें दिसती. ॥ ७९२
वंदावें **गौत म** मुनिकीर्तिस **गो**दावरीस [4]भावानें; ।
तरलों [5]विपत्समुद्रीं, जीच्या [6]तटसेवनप्रभावानें. ॥ ७९३
[7]शशिजलज **श्री** जितमुखि ! तो हा [8]नग **चि**त्रकूट, जेथ मला ।
येउनि अर्पित होता **भ**रत प्रार्थूनि मे[9]दिनी [10]कमला. ॥ ७९४
[11]हीरकशिख **रा** भदति ! [12]त्वत्स्मितरुचिपुंजशुद्धतोयवहा ।
[13]त्वद्दलकनिभ**य**मुनेशीं [14]संयुक्ता [15]**जा**न्हवी पहा [16]भवहा. ॥ ७९५
या क्षितिवरि **म** त्पूर्वें, [17]**भ**गीरथें आणिली [18]महानाव ।
यास्तव हीचें लोकीं, प्रसिद्ध **भा**गीरथी असें नांव. ॥ ७९६
हे मम [19]पूर्व **ज** दत्ता, मौक्ति[20]कमालाचि होय पृथ्वीची; ।
हीच्या [21]अघगिर्यशनीं शोभति कुंदें[22]दुकांति [23]पृथु [24]वीची. ॥ ७९७
सुंदरि ! **गं**गा **य** मुनासं[25]गमें हा हर्ष देतसे थोर; ।
[26]मिश्रितमुक्तामरकतमणिमयहारद्वयप्रभाचोर. ॥ ७९८
कर जोडुनि **रा** ज्ञि ! करी [27]प्रणति, [28]त्रिजगद्भवाब्धिनौकेला; ।
जीणें [29]**क**पिलहताखिल[30]**स**गरसुतोद्धार तत्क्षणीं केला. ॥ ७९९

---

१. ब्राह्मण. २. आनंदितचित्तें. ३. हे सुंदरी. ४. भक्तिनें. ५. संकटसमुद्रीं. ६. तीरीं राहिल्याच्या योगानें. ७. चंद्र, कमल, यांची शोभा जिंकिली मुखें जीच्या अशी. ८. पर्वतविशेष. हा प्रयागाजवळ आहे. येथें राम वनवासास जाण्यापूर्वी राहिला होता. ९. पृथ्वी. १०. संपत्ति. ११. हिरकणीतुल्य दंत जीचे अशी. १२. तुझ्या हास्यकांतीतुल्य स्वच्छउदकें वाहणारी अशी. १३. तुझ्या केशतुल्य यमुनेशीं. १४. मिळाली. १५. गंगा. १६. संसारनाशिनी. १७. भगीरथराजाचे पूर्वज कपिलमुनीच्या कोपानें दग्ध झाले, तेव्हां त्यांस (सगराच्या साठहजार पुत्रांस) उद्धरण्यासाठीं भगीरथानें महाप्रयत्नानें शिवाला प्रसन्न करून त्याच्या मस्तकींची गंगा भूलोकीं आणिली, म्हणून तिला येथें 'महानाव' म्हणजे तारण करणारी मोठी नौका असें म्हटलें आहे. १८. मोठी नौका. १९. पूर्वजानें (भगीरथानें) दिलेली. २०. मोत्यांची माळ. 'मुक्तावली कंठगतेव भूमेः' असें रघुवंशांत आहे (स० १३ श्लो० ४८). २१. पापपर्वतभक्षणीं. २२. कुंद, चंद्रवत् कांति ज्याची असा. २३. मोठ्या. २४. लाटा. २५. या संगमाचें वर्णन कालिदासानें रघुवंशाच्या तेराव्या सर्गांत (श्लो० ५४-५७) केलें आहे, तें तावून पाहण्यालायक आहे. २६. मिश्रित मोत्यें व पाचू यांच्या दोन हारांची शोभाहारक. २७. नमन. २८. त्रैलोक्यास संसारांतून तारणारी जी भागीरथी तिला. २९. कपिलानें मारले जे सर्व सगरराजाचे पुत्र त्यांचा उद्धार. ३०. सगर नामक राजानें अश्वमेध केला. तेव्हां त्यानें साठ हजार पुत्र बरोबर देउन यज्ञसंबंधी अश्व सोडिला. तो इंद्रानें चोरून कपिलाच्या आश्रमांत नेउन ठेविला. सगरपुत्र अश्वाचा

**भारद्वाजाश्र म** हा, जाऊं त्याच्या नमूंचि पायास; ।
आम्हां तिघांसि पाहुनि पूर्वी आली महाकृपा यास.' ॥ ८००

ऐसें वदतां, [1]**ज** गती पावे संयोग [2]पुष्पयानाशीं; ।
मग [3]**रा**मशिरोंबुजही मुनिपादाशीं [4]दयानिधानाशीं. ॥ ८०१

**पवनतन य** मग **रा**में **भ**रतातें [5]स्वागमास कळवाया ।
पाठविला दूत पुढें, लोकांचा सर्व शोक पळवाया. ॥ ८०२

तो **पवनात्म ज** मार्गीं सांगोनि [6]गुहासि **रा**म आला हें; ।
**नं**दिग्रामीं गेला, मनुजाकृतिला धरूनि लवलाहें. ॥ ८०३

[7]मणिहेमम **य** श्रीमद्रघुनंदनपादुकार्चनाधीन ।
[8]मीन जलाविण जैसा, **मारु**तिनें **भ**रत देखिला दीन. ॥ ८०४

'आला **राघव रा** जा, [9]तापापह मेघ तो जसा मोरा; ।
[10]तत्सेवालाभरता **भ**रता ! ये त्यास आज सामोरा'. ॥ ८०५

ऐसें [11]अमृत **म** योक्त श्रवणीं पडतां, [12]**प्र**भंजनात्मजनी ।
**भ**रतासि भासला तो [13]विग्रहधारी [14]महाप्रमोद जनीं. ॥ ८०६

आलिंगुनियां **श्री** मन्**मा**रुतिला [15]कांचनासनीं [16]अर्ची; ।
प्रार्थुनि म्हणे, 'कृपाळा ! मालविली शोकवन्हिची [17]अर्ची. ८०७

[18]मद्दुःखसाग **रा** चा **अ**गस्त्य तूं; काय बा तुझें नांव ? ।
चिंतानदींत बुडतां, दैवें कोठोनि धाडिली [19]नांव ? ॥ ८०८

**रामचरित्र म** यामृत पाजावें त्वां महातृषाक्रांता; ।
बाळाला [20]स्तन्य जसें देत्ये माता [21]कृपाकुलस्वांता.' ॥ ८०९

---

शोध करीत करीत पाताळीं आले; तेथें त्यांस तो अश्व कपिलाच्या आश्रमांत आढळला. तेव्हां ते त्या मुनीस ताडन करूं लागले. रागानें त्यांजकडे पाहतांच ते सर्व जळून भस्मीभूत झाले. त्यांचा उद्धार करण्यासाठीं भगीरथानें गंगेला पाताळांत कपिलाश्रमीं नेऊन त्यांस पापमुक्त केलें, असा येथें कथासंबंध आहे. १. पृथ्वी. २. पुष्पकविमानाशीं. ३. रामशिरकमल. ४. दयाभांडार असा. ५. आपलें आगमन. ६. गुह हा किरात रामाचा मित्र होता. राम वनवासास जाऊं लागला, तेव्हां यानें त्याला नावेंतून भागीरथीचे पार करून दिलें. ७. रत्नखचित रामपादुकापूजातत्पर. ८. मासा. ९. तापनाशक. १०. रामसेवातत्परा. ११. अमृततुल्य मधुर भाषण. १२. मारुति. १३. शरीरधारी. १४. मोठा आनंद. १५. सुवर्णाच्या आसनावर. १६. पूजी. १७. ज्वाला. १८. माझ्या दुःखसमुद्राचा तूं अगस्त्यमुनिसारखा नाशक. (अगस्त्यमुनीनें कालेयक नामक दैत्यांचा नाश करण्यासाठीं सागरजलाचें शोषण केलें, अशी पुराणप्रसिद्ध कथा आहे.) १९. नौका. २०. दुग्ध. २१. कृपाव्याप्त आहे चित्त जीचें अशी.

**मा**रुति म्हणे, '**ज** सा तूं घेवुनियां पादुकांसि आलास; ।
तैसाचि विरह **रा**में समर्पिला **चि**त्रकूटशैलास. ॥ ८१०

मग **र**घुना **य** कवासें शोभे **गो**दावरी [1]सपंचवटी; ।
चवदासहस्र राक्षस[2], तेथ मुहूर्तांतरीं प्रभू निर्वटी. ॥ ८११

तों **रा**वणचो **रा** नें, नेली **सी**ता हरूनि **लं**केला; ।
तच्छोकाकुल**रा**में विलापसह शोध [3]काननीं केला. ॥ ८१२

[4]**पं**पेसमीप **म** जला केलें [5]निजपादपंकजीं [6]भृंग; ।
मग [7]ऋष्यमूकगोत्रीं **सु**ग्रीवें **रा**म पावला संग. ॥ ८१३

[8]शाखामृगरा **ज** बली **वा**ली मारूनि सर्व तद्राज्य; ।
**सु**ग्रीवाला देवुनि कपिसैन्यें तेथ आणिलीं [9]प्राज्य. ॥ ८१४

शोधावयास **य** त्नें कपि पाठविले सतीस त्यामाजी; ।
[10]यात्रा सफल झाली, प्रभुप्रसादें करूनिया [11]मौजी. ॥ ८१५

मग [12]शतयो **ज** न जलनिधि दुस्तर म्हणवोनि निर्मिला सेतू; ।
[13]प्रस्तर तरले उदकीं, तेथें **रा**मप्रताप तो हेतू. ॥ ८१६

[14]राक्षससंक्ष **य** केला, **बि**भीषणाला समर्पिली **लं**का; ।
विजयी **रा**घव आला, घेवुनि **सी**तासती [15]गतकलंका. ॥ ८१७

**सु**ग्रीव वान **रा** धिप राक्षसराजा **बि**भीषण ख्यात; ।
आले [16]प्लवंग निशाचर तुजला भेटावया असंख्यात. ॥ ८१८

मी [17]रघुसत्त **म** पदरज आज्ञेसह मस्तकीं धरायाचा; ।
नामेंकरूनि **ह**नुमान् [18]**मा**रुतसुत दूत **रा**मरायाचा.' ॥ ८१९

हें ऐकुनियां **श्री** मद्भरत त्वरित [19]प्रमोदपूर्णमना; ।
पौरप्रधान माता घेवुनि करि **रा**घवाकडे गमना. ॥ ८२०

[20]विश्वंभरासु **रा** ची आज्ञा घेवूनि **रा**मही [21]वाटे, ।
भेटुनि **गु**हासि येतां [22]अमृतस्नाता तसी मही वाटे. ॥ ८२१

---

१. पंचवटीसहित. (पंचवटी हें स्थल नाशिकानजिक गोदावरीच्या उत्तरतीरीं आहे.) २. नाश करी. ३. वनांत. ४ ऋष्यमूक पर्वताच्या समीपचें सरोवर. ५. स्वचरणकमलीं. ६. भ्रमर. ७. ऋष्यमूक नामक पर्वतीं. ८. वानरराज. ९. बहुत. १०. गमन. ११. माझी. (येथें प्रासाकरितां 'झ'च्या स्थानीं एकांशीं सवर्ण जो 'ज' त्याचा आदेश केला आहे. कविनिरंकुशत्व जाणून हें रूप दोषार्ह मानण्याची प्रवृत्ति नाहीं.) १२. शंभर योजनें. १३. पाषाण. १४. राक्षसनाश. १५. निर्दोषा. १६. वानर, राक्षस. १७. रामपदधूली. १८. वायुपुत्र. १९. हर्षपूर्णचित्त. २०. ब्राह्मणाची. २१. मार्गीं. २२. अमृतानें भिजलेली.

**रामसमाग म** समयीं **भरत** प्रेमेंकरूनियां नाचे; ।
त्वरितहि येतां भावी[1], मंदचि ते वेग पुष्पयानाचे[2]. ॥ ८२२
शिखि[3]चातक **ज** लदातें[4] विलोकिती ते तसेचि **रामा**तें; ।
ठाकति बाहु उभारुनि आलिंगायासि शर्मधामातें[5]. ॥ ८२३
‘[6]आबालप्रत्र **य** स्कप्रजाप्रमोदाश्रुसिक्तभूवरता ।
जलसेक[7] करा’ ऐसें सांगावें लागलें नसे **भरता.** ॥ ८२४
वाद्यांच्या प्रक **रा** नें[8] मागधबंदिस्तुतिस्वनें[9] कांहीं ।
ब्रह्मांड रिक्त होतें, तें भरिलें सर्व देवलोकांहीं. ॥ ८२५
अमर कुसु[10] **म** गण वर्षति, तननन करिती समस्त गंधर्व; ।
सर्वत्रांला झालें आनंदाचेंचि तें महापर्व. ॥ ८२६
उतरुनियां **ज** [11]गतीवर पुष्पक, **रामें** सबाष्प[12] **भरता**तें ।
[13]आघ्राण करुनि माथा, हृदयीं धरिलें सुतासि कीं तातें. ॥ ८२७
**रघुरमण य** थायोग्य, प्रधान[14]गुरुमातृपौरसद्विप्र ।
सप्रेम तोषवुनियां **नं**दिग्रामासि[15] जाय तो क्षिप्र[16]. ॥ ८२८
मग रा[17]जरा **ज** संनिध पुष्पक धाडूनियां, अनंतर तें ।
**भरता**दिजटाधारण दुःखासह वारिलें अनंतरतें[18]. ॥ ८२९
स्नानाउपरि **य** [19]थारुचि सर्वांला अर्पिले अलंकार; ।
आपणही स्वीकारें केला त्या भूषणासि सत्कार. ॥ ८३०
**कौ**सल्येनें सा **रा** वानरकांताजन[20] प्रमोदानें[21] ।
स्नातोत्तर भूषविला नानालंकारसत्क्रियादानें[22]. ॥ ८३१

---

१. मानी, गुणी. २. पुष्पकविमानाचे. ३. मोर. ४. मेघातें. ५. सुखस्थान असा. ६. बालादि वृद्धपर्यंत प्रजांच्या आनंदाश्रूंनीं भिजलेल्या भूमीवर. ७. उदक शिंपणें. ८. समूहें. ९. भाटादिकांच्या स्तुतिशब्दें. (मागध म्हणजे राजाचा स्तुतिपाठक. वेणराजाच्या दक्षिणबाहुमंथनापासून पृथुराजा झाला. त्याचे सूत आणि मागध या नांवाचे दोन स्तुतिपाठक होते. तेव्हांपासून राजाच्या स्तुतिपाठकांस ‘सूत’ अथवा ‘मागध’ असें म्हणतात, म्हणजे हीं प्रथमत: विशेषनामें होतीं व कालांतरानें सामान्यनामें झालीं.) १०. पुष्पसमूह. ११. पृथ्वीवर. १२. नेत्रोदकयुक्त. १३. श्वास घेणें. (हें प्रेमातिशयाचें सूचक आहे.) १४. सचिव, कुलगुरु, जननी, नागरिक जन, आणि उत्तम ब्राह्मण यांना. १५. अयोध्येनजिकचा गांव. १६. शीघ्र. १७. कुबेराजवळ. (राजांचा म्ह० यक्षांचा राजा—कुबेर.) १८. शेवरतें. १९. आवडीप्रमाणें. २०. वानरस्त्रिया. २१. हर्षें. २२. अनेक अलंकार देवून आणि सत्कार करून.

मग साकेता[1] **म** ध्यें प्रवेशला जेंवि हर्ष लोकमनीं; ।
[2]कमनीयरूपपानें, कोणीही पौर तृप्तिला न मनीं[3]. ॥ ८३२

शुभसदनीं[4] **श्री** रामें सुग्रीव बिभीषण प्रमोदानें[5] ।
संस्थापिले यथोचितदानधुरीणें[6] दयापयोदानें[7]. ॥ ८३३

आपण मग **रा** जगृहीं शिरला देहांत जेंवि चैतन्य; ।
धन्य जनाला केलें, साकेत[8] दिसे क्षणांतरीं अन्य. ॥ ८३४

त्यावरि उत्त **म** समयीं, भरत वसिष्ठ प्रधान संप्रकृती[9]; ।
राज्याभिषेककामें, प्रार्थिति रामासि पौर[10] विप्र कृती[11].॥८३५

कपिजन[12] रा **ज** निदेशें, शतपंचक[13] सिंधुनीरसंपूर्ण[14]; ।
ऋक्षेश[15] वेगदर्शी[16], पवनात्मज[17] कुंभ आणिती तूर्ण[18]. ॥ ८३६

वासवदिक्तो[19] **य** धिचें जल हेमघटें सुषेण तो आणी; ।
नल शातकुंभकुंभें[20], घेवुनि ये उत्तराब्धिचें पाणी. ॥ ८३७

यमदिग्जल[21] **रा** शिजलें ऋषभानें[22] आणिलीं प्रमोदानें; ।
पश्चिमसमुद्रनीरें गवयानेंही[22] जशीं पयोदानें[23]. ॥ ८३८

रघुसत्तम **म** स्तक मग, पुण्य मुहूर्तीं स्वयें वसिष्ठानें ।
अभिषेकिलें विधीनें[24], हरिशिर[25] जैसें जगद्वरिष्ठानें. ॥ ८३९

मग युवरा[26] **ज** पदीं ही भरताला स्थापिलें महोदारें[27]; ।
तेव्हां [28]संपन्मोदक्षेमांहीं शीघ्र उघडिलीं दारें. ॥ ८४०

हेमांबुजम[29] **य** माला, मुक्तामणिहार वायुच्या हातें ।
इंद्रें[30] समर्पितां घे, गुणभूषित [31]पूर्णकामही हा तें. ॥ ८४१

---

१. अयोध्येंत. (अयोध्येलाच साकेत, शची आणि विशाल अशीं नांवें होतीं, असें प्राचीन ग्रंथांवरून दिसतें.) २. सुरूपदर्शनें. ३. मानी. ४. सुगृहीं. ५. आनंदानें. ६. योग्यदानसमर्थ. ७. कृपामेघें. ८. अयोध्या. ९. प्रजासह. १०. नगरस्थलोक. ११. कुशल. १२. सुग्रीवाज्ञेनें. १३. पांचशें. १४. समुद्रोदकपूर्ण. १५. जांबवान्. १६. वेगवान्. १७. मारुति. १८. शीघ्र. १९. इंद्राच्या दिशेच्या (पूर्वेच्या) सागराचें. २०. शातकुंभ नामक पर्वतावर झालेल्या सुवर्णाचे कुंभानें. २१. यमाच्या दिशेच्या (दक्षिणदिशेच्या) सागराचीं उदकें. २२. वानरविशेष. २३. मेघें. २४. यथाशास्त्र. २५. इंद्राचें शिर. २६. राजा राज्यपदीं असतांच राज्यकारभार पाहण्यासाठीं यथाविधि नेमिलेला जो अधिकारी त्याच्या स्थानीं. २७. अतिउदार (राम) त्याणें. २८. संपत्ति, हर्ष, आणि कल्याण यांनीं. २९. स्वर्णकमलमय. ३०. इंद्रानें वायुद्वारा कांचनमाला आणि मुक्ताहार असे अलंकार रामास दिले. (रामायण, युद्धकांड, स० १२८ श्लो० ७०-७१.) ३१. पूर्णमनोरथहि.

रघुनाथाच्या **ज**नपदजन[1] पदपद्मीं[2] उपायनें[3] वित्तें ।
आधीं अर्पुनि भावें[4], मग करिती लोकरीतिही, चित्तें[5].॥ ८४२
जन समुदा **य** प्रभुनें, भूषणदानें करोनि गौरविला; ।
लाजवि नानामणिगणहेमपिनद्धांग[6] लोक तो **र**विला[7]. ॥ ८४३
मुक्तामणिहा **रा** तें **सी**ता घेवोनि हस्तकीं होती; ।
तों सर्वज्ञवराला कळली तच्चित्तकामना[8] हो! ती. ॥ ८४४
**रा**म म्हणे, 'प्र **म** दे! या लोकीं जो योग्य हार हा देया ।
त्याला देतां राज्य, प्राणहि नाहींत सर्वथा प्राज्य[9]. ॥ ८४५
जैसी तूं तैसी **श्री**, **भ**रत जसा हा तसेचि हे प्राण; ।
ज्याणें[10] मातें दिधले **सी**ते! तो पूज्य सर्वथा जाण.' ॥ ८४६
'एवं **र**घुवी **रा** च्या वाक्यें झाली प्रहृष्टरूपा[11] हे; ।
माता जसी सुतातें, तैसी ते **मा**रुतीकडे पाहे. ॥ . ८४७
शिर करक **म** लें चरणीं समर्पितां, **मा**रुतीस ती **सी**ता ।
देवी मणिहारासह, दे हृदयाभीष्ट[12] भक्ति सुप्रीता. ॥ ८४८
'तूं निर्मलनि[13] **ज** गुणमणिभूषित वत्सा! सदैव परि हार ।
कंठीं' म्हणे 'असो दे, मद्विस्मृतिचा[14] करील परिहार[15].॥८४९
तुझिया हृदे[16] **य** सरोजीं स्मरण असो आणि हार हा कंठीं; ।
मुदितमनें कालातें आत्मज्ञानें[17] पहा रहा [18]कंठीं. ॥ ८५०
आम्हां उपका**रा** चा सागर लंघावया नसे नाव[19]; ।
धन्य वदान्यांमध्यें[20] ध्यावें पहिलें सदा तुझें नांव.' ॥ ८५१
सकलजनीं **म**[21] रुदात्मज पावे ब्रह्माद्यलभ्यसत्कार[22]; ।
फार प्रेमाश्रुप्लुतलोचन[23] भावें करी नमस्कार. ॥ ८५२
**प**वनतनु **ज** हेमप्रभ[24] सितमुक्ताहार[25] घालितां कंठीं ।
भासे कनकाद्रीच्या[26] बलाकमालाचि[27] काय उपकंठीं[28]. ॥ ८५३

---

१. देशांतील लोक. २ चरणकमलीं. ३. नजराणे. ४. भक्तिपूर्वक. ५. चित्तेंकरून. ६. अनेकरत्नसुवर्णांहीं भूषितांग असा. ७. रामाला. ८. तिच्या मनाची इच्छा. ९. बहुत. १०. अशा. ११. सानंदचित्ता. १२. मनाला प्रिय. १३. निर्दोषस्वगुणरूप मण्यांहीं अलंकृत. १४. माझ्या विस्मरणाचा. १५. निवारण. १६. हृदयकमळीं. १७. आत्मस्वरूपाची ओळख करून. १८. घालीव. १९. नौका. २०. उदार जनांमध्यें. २१. मारुति. २२. ब्रह्मादिक देवांना दुर्लभ असा सत्कार. २३. प्रेमाश्रुपूर्णनेत्र. २४. सुवर्णतुल्यकांति. २५. पांढरे मोत्यांचा हार. २६. मेरुपर्वताच्या. (हा पर्वत सुवर्णाचा आहे.) २७. बगळ्यांची पंक्तीच. २८. समीपभागीं.

पवनतन **य** त्या हारें म्हणतों[1] तो शोभला तसा शूर; ।
जरि रत्नसानुगोत्रीं[2] होते दोन स्वरापगापूर[3]. ॥ ८९४

तेव्हां नृपति **ज** नाला आज्ञा दे जावयास गेहातें; ।
विरहासहिष्णु[4] रडती, म्हणुनि म्हणे त्यांस तो 'उगे'हातें. ॥ ८९५

'वसतों हृद **य** गृहीं मी तुमच्याहि, तुम्हीहि माझिया सकळ; ।
कां बंधुहो! वृथा मग, मानूनि वियोग होतसां विकळ[5]?' ॥ ८९६

ऐसें वदोनि **रा** क्षसवानरराजे ससैन्य पाठविले; ।
मणिपदकप्रतिबिंबच्छद्में[6] हृदयांत काय सांठविले. ॥ ८९७

रघुवर हे[7] **म** नगावर सतडिद्घनसा[8] नृपासनीं साजे; ।
सेवकमयूर[9] नाचति, चातकसे सर्व भासती राजे. ॥ ८९८

---

## उत्तरकांड[10].

रामप्रेक्षाकामें[11] **श्री** मदगस्त्यादि[12] पुण्यकीर्ति[13] मुनी, ।
येती त्यांला पूजी राजा, निजमस्तकीं पदें नमुनी. ॥ १

---

१. मी (मोरोपंत) म्हणतों. २. रत्नसानु(मेरु)नामक गोत्रीं (पर्वतीं). रत्नसानु म्ह० ज्याच्या शिखरावर रत्नें आहेत असा पर्वत. ३. गंगापूर. ४. विरह न सहन करणारे. ५. व्याकुळ. ६. रत्नखचित पदकीं प्रतिबिंबमिषें. ७. मेरुपर्वतावर. ८. विजेसहित मेघसा. ९. मोर (विजेसह मेघ पाहून). मेघास पाहून मोर आनंदानें नाचतात असा कविसंकेत आहे. या कविसंकेतांविषयीं विश्वनाथकविराजकृत 'साहित्यदर्पणां'तील तीन पद्यें (सप्तमपरिच्छेद) उपयुक्त आहेत म्हणून येथें दिलीं आहेत. यांत बऱ्याच कविसमयांचा समावेश केला आहे:—'मालिन्यं व्योम्नि पापे यशसि धवलता वर्ण्यते हासकीर्त्यो रक्तौ च क्रोधरागौ सरिदुदधिगतं पंकजेंदीवरादि । तोयाधारेऽखिलेऽपि प्रसरति च मरालादिकः पक्षिसंघो ज्योत्स्ना पेया चकोरैर्जलधरसमये मानसं यांति हंसाः ॥,' 'पादाघातादशोकं विकसति बकुलं योषितामास्यमद्यैर्यूनामंगेषु हाराः स्फुटति च हृदयं विप्रयोगस्य तापैः । मौर्वी रोलम्बमाला धनुरथ विशिखाः कौसुमाः पुष्पकेतोर्भिन्नं स्यादस्य बाणैर्युवजनहृदयं स्त्रीकटाक्षेण तद्वत् ॥,' 'अह्न्यंभोजं निशायां विकसति कुमुदं चंद्रिका शुक्लपक्षे मेघध्वानेषु नृत्यं भवति च शिखिनां नाप्यशोके फलं स्यात् । न स्याज्जाती वसन्ते न च कुसुमफले गंधसारद्रुमाणामित्याद्युन्नेयमन्यत्कविसमयगतं सत्कवीनां प्रबंधे ॥.' १०. पंतांनीं या मंत्ररामायणाच्या उपोद्घातांत म्हटलें आहे कीं, 'उत्तरकांडचि केवळ श्रीरघुपतिमंत्ररत्नमंजूषा' (गी० १०); तसेंच पुढें म्हटलें आहे कीं, 'देहीं आत्मा, तैसा आर्यांतीं मंत्रवर्ण सांग वसे; । सूक्ष्मदशावांचुनियां कथापरालाचि तो कसा गवसे? ॥' (गी० ११). हे मंत्र कोणते हें समजणें फार कठीण आहे. आम्हांस ५० गीतींपर्यंत समजले आहेत त्यांवर आम्ही पुष्पाकार चिन्ह घातलें आहे; पुढील मंत्र कोणांस माहित असल्यास त्यांहीं ते आम्हांस दाखविल्यास मोठे उपकार होतील. गीति १ पासून १० पर्यंत मंत्र साधिला आहे तोः—**'रामो दाशरथिः शूरो लक्ष्मणानुचरो बली । काकुत्स्थः पुरुषः पूर्णः कौसल्येयो रघूत्तमः ॥'** ११. रामदर्शनेच्छेनें. १२. अगस्त्य, कण्व, गालव, मेधातिथि, धौम्य, इत्यादि. १३. पवित्र आहे कीर्ति ज्यांची असे.

म्हणती, 'त्वद्विध[1] **रा** जा पूर्वीं आम्ही न देखिला कोणी; ।
दारुण[2] शत्रु निशाचर[3] मथिला, केली सुखाकरा[4] क्षोणी[5]. ॥ २
क्षाळायाला जन[6] **म** ळ **भ**गीरथें आणिलीचि देवधुनी[7]; ।
चंद्रांशूपरि[8] कीर्ती विनिर्मिली त्वांहि सुररिपू[9] वधुनी. ॥ ३
विमलगुणा! तु **ज** वांचुनि सूक्ष्मदृशांला[10] न देखणा[11] ठाव[12]; ।
अनुदिनिं[13] तव चरणाब्जीं[14], म्हणवुनि त्यांचा द्विरेफसा[15] भाव.' ४
हें ऐकुनि विन **य** ज्ञ प्रभु वंदुनियां म्हणे, 'अहो! स्वामी! ।
बहुमानकीर्तिशाली[16] भवत्प्रसादेंकरूनियां[17] आम्ही. ॥ ५
लंकेश निशिच[18] **रा** धिप मेला तुमच्या तपः[19]प्रभावानें; ।
कारुण्याकुलहृत्स्थल[20] मजला स्तवितां स्वपुत्रभावानें. ॥ ६
हा **द**शमुख अ **म** रांचा रिपु[21] दारुण जन्मला कसा दुष्ट? ।
दोषनिधीला[22] याला, वरदाता[23] कोण जाहला तुष्ट? ॥ ७
हें पूर्ववृत्त म **ज** ला सांगा, आकर्णनस्पृहा[24] आहे.' ।
ऐसें पुसतां हर्षें **अ**गस्त्य सांगे कथा तयाला हे. ॥ ८
**च**[25]तुरास्यतन **य** **रा**मा! **पु**[26]लस्त्यनामा अखंडितज्ञान ।
वेदाब्धि[27] पाविकौजा[28], सत्कैवल्येक्ष[29] गेयविज्ञान[30]. ॥ ९
संसारसिंधुचें[31] **ज** ल केलें लंघूनि जेंवि तृणबिंदु[32] ।
त्या सत्तमासि[33] मग दे कन्या[34] राजर्षिनाथ **तृ**[35]णबिंदु. ॥ १०

---

१. तुझ्यासारखा. २. भयंकर. ३. रावण. ४. सुखाचा आकर (खाण.) ५. पृथ्वी. ६. जनाचा मळ (पातक.) ७. गंगा. (देवांची नदी.) ८. चंद्रकिरणतुल्य. ९. देवांचा शत्रु. (रावण.) १०. बारीक दृष्टीनें पाहणारांला. ११. सुंदर. १२. स्थान. १३. प्रत्येक दिवशीं. १४. तुझ्या चरणकमलीं. १५. भ्रमरसा. (ज्याच्या नांवामध्यें दोन रेफ म्ह० रकार आहेत तो.) १६. अतिमान व कीर्ति यांनीं शोभणारे. १७. तुमच्या प्रसादेंकरून. १८. राक्षसपति. १९. तपाच्या सामर्थ्यानें. २०. दयायुक्त हृदय ज्याचें असा. २१. शत्रु. २२. पापी. २३. वर देणारा. २४. ऐकण्याची इच्छा. २५. ब्रह्मपुत्र, प्रजापतिसुत, रावणपितामह. २६. पुलस्त्यनामक ब्रह्मर्षि. २७. वेदसमुद्र (सर्ववेदज्ञ.) २८. अग्नितुल्यकांति. २९. ब्रह्मद्रष्टा. ३०. प्रशंसापात्र ज्याचें विज्ञान असा. ३१. प्रपंचरूप सागराचें. ३२. गवताच्या अग्रीं राहणारा उदकबिंदु. ३३. त्या उत्तम साधूला. (पुलस्त्यऋषीला.) ३४. हिचें नांव 'गौ' होतें. ३५. राजविशेष.

त्याला झाला तेन **य**, ख्यात मुनी विश्रवा गुणें हृद्य; ।
वेदांतसारवेत्ता, सर्वजनामाजि मान्य सद्विद्य. ॥ ११

तद्वनिता रघु **रा** या ! सती भरद्वाजकन्यका झाली; ।
यक्षप सुज्ञेश्वरसख, शमधन **वैश्रवण**नाम सुत व्याली. ॥ १२

त्याप्रति **लंका**ना **म** क पुरातन स्थान अर्पिलें तातें; ।
द्रविणस्वामित्वासह, पुष्पक **विधि** दे स्वभक्तिमंतातें. ॥ १३

भव पुरकाल **श्री** गल **गौरीगुरु** भक्तकामनाकर्ता ।
झाला शूलविषोरगधर **वित्तप**मित्र **काम**संहर्ता. ॥ १४

त्यावरि **सुमालि रा** क्षस, जाणुनि जनगीतकीर्ति विश्रवस, ।
कन्येसि म्हणे, '**कैकसि** ! सल्लक्षण विप्रं हा भजोनि वस.' १५

गेली प्रदोषस **म** यीं दैवानें विप्रसत्तमाजवळी; ।
अर्कश्रीस शिखीपरि, तत्सेवा प्रीतिमान् मुनी कवळी. ॥ १६

अतिबल तनु **ज** प्रथमचि झाला तीतें, **उमेशि गुह** काय ? ।
नीलपयोधरसप्रभ **शक्र** तसा वीर तो महाकाय. ॥ १७

---

१. गीति ११ पासून १७ पर्यंत पुढील मंत्र साधिला आहे:-'**वेदांतवेत्ता यज्ञेशः पुराणपुरुषोत्तमः। जानकीवल्लभः श्रीमानप्रमेयपराक्रमः॥**.' २. पुत्र. ३. नामविशेष. याच्या मातेनें हा उदरांत असतां वेदाचें विशेष श्रवण केलें म्हणून याला 'विश्रवा' हें नांव पडलें. (उत्तरकांड, स० २ श्लो० ३१ पहा.) ४. सुंदर, प्रिय. ५. सांगवेदाध्ययनसंपन्न. ६. उत्तम. विद्यालंकृत. ७. त्याची स्त्री. ८. भरद्वाजमुनीची देववर्णिनी नामक कन्या. ही विश्रव्याची पहिली भार्या; दुसरीचें नांव कैकसी. पहिलीचें अपत्य वैश्रवण (कुबेर), आणि दुसरीचीं अपत्यें रावण, कुंभकर्ण, शूर्पणखा आणि बिभीषण. ९. कुबेर. १०. शिवमित्र. ११. शांत. (शम हेंच धन ज्याचें असा.) १२. प्रसवली. १३. पौलस्त्यानें, विश्रव्यानें. १४. धनाधिपत्वासह. १५. पुष्पक नामक विमान. १६. ब्रह्मा. १७. निधीशत्व आणि पुष्पक असे दोन वर दिले. १८. शिव. १९. त्रिपुरसूदन. २०. विषकंठ. २१. पार्वतीचा गुरु (पति). २२. भक्तांची इच्छा परिपूर्ण करणारा. २३. शूल, विष आणि सर्प यांतें धारण करणारा. २४. कुबेरमित्र. २५. मदनातें जाळणारा, कामारी. २६. लोकांनीं ज्याची कीर्ति स्तविली आहे असा (विश्रवस.) २७. पुलस्त्यपुत्र. २८. सुमालि राक्षसाच्या कन्येचें नांव. २९. उत्तमलक्षण. ३०. विश्रवस. ३१. रहा. ३२. संध्यासमयीं. ३३. सूर्यकांति. ३४. अग्नि. ३५. घेई. ३६. पुत्र. ३७. रावण. ३८. षडानन, स्कंद. ३९. नीलमेघतुल्यकांति. ४०. इंद्र. ४१. स्थूलदेह.

दुसराही तेन **य** बली कैकसिका प्रसवली विशालशिर;[2] ।
तो लोकप्राणांतें तत्काळ हरी, करीच ना उशिर. ॥ १८

तिसरी कृत्रिमें[3] **रा** शिच शूर्पणखी योग्य ठेविलें नाम, ।
जीचें सतृष्ण[4] मानस, मनुष्यमांसाशनीं[5] महोद्दाम.[6] ॥ १९

ध्रुवें[7] जापरि वि **म** लचरित,[8] मेधावी[9] सुकृतपुंजसा[10] चरम[11] ।
अविलंबित[12] धर्मी रत, सदभीष्ट[13] अदोषवृत्ति गुणपरम.[14] ॥२०

जो सुरजेन[15] पू **ज** नरत, सामग्री शांतिभक्ति हे ज्याची; ।
वाहे न नंदनेच्छा,[16] करील वार्ता किमर्थ राज्याची ? ॥२१

जो प्रथमतन **य** त्याला दशमुख हें विश्रवा करी नाम ; ।
तो कुंभकर्ण बलिवर[17] विग्रहकर्ता[18] दुजा महोद्दाम.[19] ॥ २२

तिसरा जो आत्म **ज** तो बिभीषणाख्यें करूनि गौरविला; ।
तो परम पुण्यकर्मी, मतिमान् धीर प्रसिद्धकीर्ति भला.॥२३

जनकपदद्व[20][21] **य** नमना समस्तयक्षेंद्र[22] एकदां आला; ।
गुर्वाज्ञेला घेवुनि जाय महात्मा स्वकीयवासाला.[23] ॥ २४

त्यास विलोकुनि **रां**[24] क्षसकन्या चित्तीं अखर्व[25] खेद धरी; ।
सापत्नभाव लक्षी; वैभवकामें[26] सुतासि बोध करी. ॥ २५

मग विश्वसृट्[27] स[28] **म** र्चुनि, तुष्टि कराया महाहटस्थितिनें;[29] ।
अत्यंततनुश्रमकृत्[30] तप करि दशकंठ भूतिच्या[31] रतिनें.[32]॥२६

---

१. गीति १८ पासून २३ पर्यंत हा श्लोक साधिला आहे:—'**रावणांतकरः कृष्णो ध्रुवीकृतबिभीषणः । सुग्रीवानंदकर्ता यो वालिहंतातिपुण्यमान् ॥.**' २. कुंभकर्ण. ३. कपटराशी. ४. इच्छायुक्त. ५. मनुष्यांच्या मांसाच्या भक्षणीं. ६. अत्यंत उद्धट. ७. उत्तानपादपुत्र. (यानें सापत्न माता सुरुचि हिच्या त्रासानें राजगृह सोडून परमेश्वरास शरण जावून, त्याची आराधना निर्मलांतःकरणानें करून, अचल पद मिळविलें.) ८. शुद्धाचरण. ९. बुद्धिमान्. १०. पुण्यराशितुल्य. ११. शेवटला. १२. निरलस. १३. साधुप्रिय. १४. गुणोत्तम. (बिभीषण.) १५. देवपूजासक्त. १६. पुत्रेच्छा. १७. बळकटांमध्यें श्रेष्ठ. १८. वैरकर्ता. १९. मोठा दांडगा. २०. गीति २४ पासून ३० पर्यंत पुढील मंत्र साधिला आहे:—'**सर्वात्मा सर्वसाक्षी वै सृष्टिस्थित्यंतकृद्विभुः । सर्वाश्चर्यमयो वीरः सच्चिदानंदविग्रहः ॥.**' २१. विश्रवस. २२. वैश्रवण. २३. स्वस्थानाला. २४. कैकसी. २५. मोठा. २६. संपत्तीच्छेनें. २७. ब्रह्मदेव. २८. पूजा करून. २९. हठयोगादिसाधनांनीं. ३०. देहाला अत्यंत श्रम देणारें असें तप. ३१. संपत्तीच्या. ३२. प्रीतीनें.

गो[1]कर्णी ते[2] सारे, [3]**श्री वि**धिला तो[4]षवावया तपती; ।
केवळ नि[5]रशन होवुनि, भुवनपतीतें स्वमानसीं जपती.॥२७

दि[6]क्शतसमा नि[7]**रा** कुल निर्वाह करूनि निश्चयें धीर, ।
कार्यज्ञ एक म[8]स्तकतोयज [9]होमी [10]**द**शास्य तो वीर. ॥ २८

वर्षें [11]अयुत स **म** र्थें, धैर्याच्या पर्वतें अशीं नेलीं; ।
पं[12]चाग्निसाधनस्थें [13]आतपहिमवृष्टि तुच्छसी केली. ॥ २९

द[14]शमशिरोंबु **ज** हवनीं, समजुनियां [15]तच्चिकीर्षितासि तदा; ।
[16]हरिनंदन **वि**धि आग्रहें, वारूनि म्हणे, 'स्वयोग्य माग पदा.॥

[17]ओजः[18]संपन्न प्रि **य** परमोदार [19]त्वदीय बल राहो; ।
आकृति असो यथास्थित, वर मागायासि सिद्ध वीरा! हो.'॥

शुभवचनें तो **रा** क्षस, [20]अनतिक्रमितांचि बोलिल्या विधिलीं[21]; ।
सांग [22]समर्ची [23]वन्यें. तेव्हां 'अमरत्व दे' म्हणे **विधिला.३२**

[24]**द्रु**हिण म्हणे,'अ **म** राच्या [25]भावाला पात्र अन्य जन नाहीं; ।
सुखकर वर देतों घे, [26]वाचें वद होय योग्य जें कांहीं.' ३३

'[27]यक्षसुपर्णभु **ज** गसुरदितिदनुसुतराक्षसादि जे कांहीं ।
यांपासुनि मरण नसो. नरादिकीं भीति' तो म्हणे 'नाहीं.'॥

ऐसें ऐकुनि **तो य** जभव त्यासि म्हणे, 'दिलें [28]प्रपौत्राला; ।
[29]अन्यदुरासदता घे. समर्पिली [30]कामरूपता [31]बाला!' ॥ ३५

---

१. गोकर्ण नामक क्षेत्रीं. २. सर्व बंधु. ३. ब्रह्मदेवाला. ४. तप करिती. ५. उपवासी. ६. हजार वर्षें. ७. स्वस्थ. ८. शिरकमल. ९. अर्पण करी. १०. रावण. ११. दहा हजार. १२. चार दिशांस चार अग्नि व मस्तकावर मध्याह्नींचा सूर्य असे तपश्चरणासाठीं केलेले पांच अग्नि. हे पांच अग्नि प्रखर प्रज्वलित असतां मध्यें बसून तपश्चर्या करणें याचें नांव 'पंचाग्निसाधन'. (१) गार्हपत्य, (२) आहवनीय, (३) दक्षिण, (४) आवसथ्य, आणि (५) सभ्य अशीं ही पंचाग्नींचीं नांवें आढळतात. १३. उष्णशीतपर्जन्यवृष्टि. १४. दहाव्या मस्तकाच्या होमीं. १५. रावणेच्छितासि. १६. विष्णुपुत्र. १७. गीति ३१ पासून ३३ पर्यंत हा मंत्र साधिला आहे:—'ॐ **नमो भगवते वासुदेवाय**.' १८. तेजोयुक्त. १९. तुझें. २०. न उल्लंघितां. २१. प्रकाराला. २२. पूजी. २३. पुष्पादिकानें. २४. ब्रह्मदेव. २५ देवत्वाला. २६. वाणीनें. २७. गीति ३४ पासून ५० पर्यंत हा श्लोक साधिला आहे:—'**राम राम हरे राम हरे राम हरे हरे । हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे ॥**.' २८. पौत्राच्या (विश्रवसाच्या) मुलाला. २९. दुसऱ्यानें अजिंकपणा अन्यानें जिंकण्यास अशक्य अशी स्थिति, अजय्यत्व. ३०. यथेच्छरूप घेणें. ३१. हे मुला.

मग जलरुहँ[1] ज न्मा तो बिभीषणाला म्हणे, 'पुरे शांता ।
पंचसहस्रसमा[2] तप केलें सत्यव्रतस्थिता[3]! दांता[4]! ॥ ३६
सूर्यालोकननि[5] य में केलें संपूर्ण हो नयप्राज्ञा[6]! ।
माग वरातें सुमते[7]! वत्सा! मी देतसें स्वयें आज्ञा.' ॥ ३७
विनवुनि चतु रा स्यातें म्हणे, 'असो हर्षे साधुच्या भजनीं; ।
दे ब्रह्मास्त्र[8] अशिक्षित[9] सुरेश्वरा! हाचि मुख्य लाभ जनीं.'
त्याला म्हणे पिता म ह, फार बरा काम[10] हा तुझा साधो[11]. ।
राक्षस असोनि शुभमति, यास्तव अमरत्वही दिलें साधो[12]!'॥३९
तदुपरि गेला श्री[13] विधि घटकर्णाला[14] वरासि देयातें; ।
'दुष्टासि वरसमर्पण, अनुचित[15]' म्हणती अमर्त्य[16] तों यातें.४०
मग मुखविव रा मध्यें घटकर्णाच्या[14] सुरार्थ[17] ते वाणी ।
शीघ्र पितामहवाक्यें[18] शिरे गुहेमाजि चंचलेवाणी[19]. ॥ ४१
घटकर्णाला[14] कं[13] म लज, 'माग' म्हणे 'जें अभीष्ट[20] तें सारें; ।
अयुताब्दकाल[21] दुःसह नियम बरे पाळिले निराहारें[22].'॥४२
दशवदनानु[14] ज तेव्हां व्यामोहदभारतीहृतस्वांत[23] ।
सर्व सुरेशासि म्हणे, 'निद्रा दे जाहलों तपःश्रांत.' ॥ ४३
वर देवुनि तो[13] य जभव जातां संध्यापयोदसमवर्ण[24] ।
सुरकृतवंचन[25] जाणुनि[26] सोडी निश्वास उष्ण घटकर्ण[14].॥ ४४

---

१. ब्रह्मदेव. २. पांचहजार वर्षें. ३. सत्यव्रतीं रहाणाऱ्या. ४. हे जितेंद्रिया. ५. सूर्यावलोकन-नियमानें. ६. हे नीतिज्ञा. ७. हे बुद्धिमंता. ८. हें मोठें भयंकर अस्त्र असून मोठमोठ्या पराक्रमशाली वीरांसच माहीत असे. ९. सदुपदेशाशिवाय अवगत व्हावें असें. १०. इच्छा. ११. सिद्ध होवो. १२. हे साधो. १३. ब्रह्मा. १४. कुंभकर्णाला. १५. अयोग्य. १६. देव. १७. देवकार्यार्थ. १८. ब्रह्मवचनें. १९. विजेतुल्य. २०. वांछित. २१. दहाहजार वर्षें. २२. भोजनाशिवाय राहून. २३. मोह उत्पन्न करणाऱ्या वाणीनें ज्याचें चित्त हरिलें असा. २४. सायंकाळमेघतुल्यकांति. २५. देवकृत मोह. २६. कुंभकर्णानें गोकर्णक्षेत्रीं उग्र तप केलें म्हणून पितामह त्यास वर देण्यास सिद्ध झाला. तेव्हां यास 'वर माग' असें म्हणावयाचें तें याला आधीं मोहित करून नंतर म्हणावें, अशी देवांनीं प्रार्थना केली. मग पितामहानें देवांच्या विनंतीप्रमाणें याच्या जिव्हाग्रीं सरस्वतीची स्थापना करून यास वर मागण्याची आज्ञा केली. तेव्हां यानें 'निद्रा दे' असा वर मागितला. नंतर सरस्वती निघून गेल्यावर हा शुद्धीवर आला, आणि माझ्या मुखांतून असें वचन कसें निघालें असें म्हणून खिन्न झाला. हा कांहीं भलतेंच मागावयास चुकावयाचा नाहीं अशा भीतीनें देवांनीं हें कपट केलें. (रामायण, उत्तरकांड, स० १० श्लो० ३५–४९)

मग मातामहें **रा** क्षस **सु**मालिनामा **द**शाननास म्हणे, ।
'वर साधिले बरें तरि, घे, **लं**कास्थान शीघ्र वीरमणे!'॥ ४५
तेव्हां **प्र**हस्तना **म** क दूत द्रविणाधिपाकडे प्रेषी; ।
प्राकृत परस्वहरणीं सतृष्ण **दि**क्तुंड तो जगद्द्वेषी. ॥ ४६
त्या **घ**टकर्णाग्र **ज** निजदूतोक्ताचें करूनियां श्रवण ।
विकृति न धरितां बोले, सौभ्रात्रीं जो सतृष्ण **वै**श्रवण. ४७
'मी अग्रज तनं **य** तसा, तूं मज एका स्थळीं कृतस्नेह ।
पवमानकृष्णवर्त्मा तसे वसों ये, तुझेंचि हें गेह.'॥ ४८
हें दूतमुखें नि **ज** मत, कळवी अनुजासि, तों हटप्रकृती ।
त्या उत्तरेश्वराशीं, इच्छीना स्नेह निर्दयोपकृती. ॥ ४९
तातास **य**क्षना **य** क एकांतीं हें समस्त आयकवी; ।
सस्नेह भूसुरेश्वर, तें ऐकुनि सूनुला असें शिकवी. ॥ ५०
'हा दुष्ट परम **रा** क्षस निवारितांही करीतसे दावा; ।
दे **लं**का सोडुनियां, त्वां तरि माझा, निदेश वंदावा.'॥ ५१
तातनिदेशें तो **म** ग, **कु**बेर गेला **हि**मालयशैलास ।
वसवी **दु**र्गा**शं**करचरणाब्जस्पर्शपूत **कै**लास. ॥ ५२
तो **द**शवदन **श्री** दत्यक्तपुरीमाजि जेधवां बैसला; ।
त्रिभुवनलोक मनींही, तेव्हां भययुक्त तापही बसला. ॥ ५३
**वि**ष्णुभयद्रुत **रा** क्षस पातालाहूनि याकडे आले; ।
राज्याभिषेक होतां **द**शकंठाला, महासुखी झाले. ॥ ५४

---

१. आजा. आईचा (कैकसीचा) पिता. २. रावणास. ३. कुबेराकडे. ४. क्षुद्र, नीच. ५. परधनहरणीं. ६. इच्छायुक्त. ७. रावण. ८. रावणदूतवाक्याचें. ९. येथें 'निज' या शब्दाचें स्वारस्य दिसत नाहीं. १०. कोप. ११. उत्तमबंधुत्वाविषयीं १२. वडील बंधु. १३. पुत्र. १४. स्नेहबद्ध. १५. वायु व अग्नि. कृष्णवर्त्मा म्ह० अग्नि. अग्नीचा मार्ग (वर्त्म) दहनक्रियेनें काळा (कृष्ण) होतो, म्हणून हें नांव त्याला पडलें आहे. १६. गृह. १७. दुराग्रहस्वभावी. १८. दयाउपकारहीन. १९. पिता (विश्रवाऋषि) त्यास. २०. ब्राह्मणश्रेष्ठ. २१. कलह. 'दावा' हा शब्द आरबी आहे. २२. आज्ञा. २३. हिमाचलास. २४. पार्वतीशिवपदकमलस्पर्शें पवित्र असा. २५. कुबेरानें टाकिलेल्या नगरींत. २६. वसला. येथें 'बवयोः सावर्ण्यम्' या नियमास अनुसरून 'ब'-च्या स्थानीं 'व' योजिला असतां प्रास साधून वर्णव्यत्ययरूप दोषही येत नाहीं. वर्णाच्या सजातीयत्वाविषयीं नियम आहे तो:—'रलयोर्डलयोश्चैव शषयोर्बवयोस्तथा । वदंत्येषां च सावर्ण्यमलंकारविदो जनाः ॥.' २७. तीन जगतांतील जनांच्या मनांत. २८. विष्णुभयें पळालेले.

शूर्पणखीला दे म ग विद्यु[1]ज्जिह्वाख्यकालकेयातें; ।
मंदोदरी स्वकन्या, दिधली भावें मयासुरें यातें. ॥ ५५

दशवदनानु[2] ज नीनें घटकर्णानें मनःप्रिया शांता ।
वैरोचन[3]दौहित्री वज्र[4]ज्वालाहि साधिली कांता. ॥ ५६

गंधर्वलोकना य क शैलूष[5] स्वात्मजा[6] सती सरमा[7] ।
अर्पी बिभीषणाला, तो पावे प्रीति तद्गुणें परमा. ॥ ५७

निद्रा सतत क रा या अनुजाला एकगांव[8] विस्तीर्ण ।
योजनयुग्मायत[9]गृह करूनि दे हेमरत्न[10]संकीर्ण. ॥ ५८

दशकंठें वर म त्तें क्रीडा आरंभिली अपार जनीं; ।
ते सुखयश[11]:सितांबुजवृंदाची होय वार्षिकी[12] रजनी[13]. ॥ ५९

हें सर्व राजरा[14] ज श्रवण करुनियां स्वबंधुला वारी[15]; ।
हित कथिलें परि तो खळ, अहितचि मानी मनांत देवारी[16]. ॥

मग तो दिग्विज[17] य स्पृह आधीं जिंकी धनेश्वरास रणीं; ।
पुष्पक हरूनि भिजवी, त्याची पळतां तदश्रुनें[18] सरणी[19].॥६१

पळवुनि अग्र[14] ज राजा दशमुख[16] तो ‘धन्य मी’ म्हणे ‘आजी; ।
माजी शक्ति न जाणुन, दुर्बल आला करावया आजी[20].’६२

सकळ[21] धनेंद्र य शःशशिराहु दशग्रीव[16] पुष्पकीं वेंचे[22]; ।
विधिवर[23]सामर्थ्यानें, अनन्यलभ्य[24]प्रमोद[25] दैवें घे. ॥ ६३

दुर्गेसहित ह रा ची वर्तत होती जया स्थळीं केली[26]; ।
त्या शरवणांत[27] पुष्पक जातां गति कुंठित क्षणें केली.॥६४

---

१. विद्युज्जिव्ह नामक कालकेय वंशांतील दैत्य त्यातें. २. रावणबंधूनें. ३. विरोचनपुत्र (बलि) याची दौहित्री (कन्येची कन्या.) ४. नामविशेष. ५. गंधर्वपती शैलूष. ६. कन्या. ७. शैलूष नामक गंधर्वाची कन्या. हिची आई मानससरोवरासमीप प्रसूत झाली असतां, जलदागमामुळें पाणी वाढून तें ह्या मुलीपर्यंत आलें. तेव्हां मूल भय पावून रडूं लागली; तें ऐकून आई कन्यास्नेहानें म्हणाली, ‘सरो मा वर्धत’ (सरोवरा! वाढूं नको). मग पाणी कमी झालें. ‘सरो मा’ या शब्दांवरून सरमा असें हिचें नांव पडलें (उत्तरकांड, स० ७ श्लो० २४-२६) ८. चार कोस रुंद. ९. आठ कोस लांब. १०. सुवर्णरत्नखचित. ११. सुखकारक कीर्ति तोच स्वच्छ कमलसमूह त्याची. १२. पर्जन्यकालची. १३. रात्री. १४. कुबेर. १५. निवारी. १६. रावण. १७. दिग्विजयेच्छु. १८. कुबेरनेत्रोदकें. १९. मार्ग. २०. युद्ध. २१. सर्व कुबेरकीर्तिचंद्राचा राहु. २२. खर्चे. २३. ब्रह्मवरसामर्थ्यें. २४. अन्यास अलभ्य. २५. हर्ष. २६. क्रीडा. २७. स्थानविशेष त्यांत. शरवण हें हिमालयावरील शिवपार्वतीचें क्रीडावन. येथें जो कोणी जाईल त्याला स्त्रीत्व प्राप्त होईल असा त्या स्थळास पार्वतीचा शाप होता. येथेंच स्कंदाचा जन्म झाला.

चालवितां पर **म** बळें निष्फलयत्न क्षपाचर[1] श्रमले; ।
शिवपदरतजनपीडक,[2] दृष्टांतीं यास्थळीं मैला[3] गमले. ॥६५

तेव्हां तेथें आला, **श्री**कंठध्यानसक्त[4] आनंदी; ।
वानरतुल्यानन[5] जो, सर्वगुणाध्यक्ष[6] सन्मती नंदी.[7] ॥ ६६

दशसंख्यकंध **रा** ला[8] नंदी आज्ञा करी फिरायाला; ।
'शिरतां विपिनीं[9] येइल कोप' म्हणे 'सर्वलोकरायाला.[10]'॥६७

हांसे वरवीर्य[11] **म** दें कपिमुखनंदीस रात्रिचरपाल; ।
तेव्हां शिवदास म्हणे, 'कपीच होतील रे! तुझे काल.'६८

हें परिसुनि र **ज** नीचर, समूळ उपडावयासि कैलास ।
विंशति[12] भुजपरिघ[13] तळीं, घालुनि उचली क्षणांत शैलास.६९

गण[14] सर्व सभ **य** झाले, गिरिकंपें पार्वती धरी कंपा; ।
आलिंगी पतिला ती, भासे शरदंबुदीं[15] जणो शंपा[16]. ॥ ७०

गिरिमस्तकीं ह **रा** नें, चरणांगुष्ठेंचि घालितां भार; ।
नगमूलबद्धभुज[17] खल, निर्बल दशकंठ तो रडे फार. ॥ ७१

दिव्यशतवर्षें[18] श्र **म** ला, अद्यापि म्हणे नयेचि मृत्यु कसा; ।
बाष्पांबुपल्वलांतीं,[19] रडतां भासे दशास्य बेडुकसा. ॥ ७२

सदय अमर **ज** न म्हणती, 'गौरीपतिचे[20] मनीं धरीं पाय; ।
दशकंठा ! हा केवळ तुज कथिला मुक्तिचा महोपाय.'॥७३

शंकरपदतो[21] **य** ज तो, यजिता झाला धरूनि विश्वास;[22] ।
त्या देवें सोडविला, जो पाळी आशुतोष[23] विश्वास.[24] ॥ ७४

त्यावरि मनसि[25] **ज** रिपु तो देवुनियां चंद्रहासनामासी;[26] ।
रावण[27] हें अभिधान,[28] स्थापुनि पुरवी स्वभक्तकामासी.॥७५

---

१. राक्षस. २. शिवभक्तपीडक. ३. मोरोपंताला. ४. शिवध्यानसक्त. ५. वानरसममुख. ६. सर्वगुणयुक्त. ७. हा कामधेनूचा पुत्र आणि शिवाच्या गणांतील एक. याची आकृति मनुष्यासारखी असून, मुख मात्र वानरासारखें होतें. ८. रावणाला. ९. वनीं. १०. शिवाला. ११. वराच्या सामर्थ्यानें आणि मदानें. १२. वीस. १३. बाहुस्तंभ. १४. शिवाचे गण. १५. शरदतूंतील मेघ. १६. वीज. १७. पर्वतमूलीं सांपडले बाहु ज्याचे असा. १८. सहस्रवर्षें. १९. नेत्रोदकाल्पसरोवराच्या नाशीं. २०. शिवाचे. २१. शिवपदकमल. २२. निश्चय. २३. शीघ्र संतुष्ट होणारा असा शिव. २४. जगास. २५. कामशत्रु. (शिव.) २६. चंद्रहासनामक खड्ग. २७. शिवानें दशाननाला चंद्रहास नामक खड्ग देवून 'रावण' असें नांव ठेविलें. (उत्तरकांड, स० १६ श्लो० ४३-४५). २८. नांव.

शिवचरण द्व **य** वंदुनि तुहिननगीं[1] जाय पुष्पकारूढ; ।
तेथें तपस्विनीतें,[2] पाहुनि झाला स्मरार्त[3] तो मूढ. ॥ ७६
वृत्त तिचें असु **रा** धिप, पुसतां मग त्यास ते म्हणे युवती,[4] ।
'मी गुरुपुत्रकुशध्वजकन्या[5] नामें करूनि वेदवती. ॥ ७७
वेदोच्चारणस **म** यीं झाल्यें मी वाङ्मयी[6] प्रभावानें; ।
विष्णुप्राप्त्यर्थ वनीं, तप करित्यें नित्य शुद्ध भावानें. ॥७८
मज्जनकमनीं[7] **श्री** पतिहस्तीं[8] द्यावी सुता असें होतें; ।
दैत्येंद्रें[9] शंभूनें वधितां तातासि,[10] राहिलें हो तें. ॥ ७९
हरिहुनि दुस **रा** वर मज न रुचे, म्हणवूनि हें सदाचरण; ।
निजजनकल्पतरूचे[11] चित्तीं मी पूजित्यें सदा चरण.' ॥ ८०
श्रवण करुनि **म**[12] दनातुर रावण तीतें म्हणे, 'अहो! जाये! ।
मजहुनि काय अधिक हरि? होवुनि पत्नी गृहासि माजा ये.'॥
यापरि खल[13] र **ज** नीचर वदतां, पावे अनल्प[14] धिक्कार; ।
वेदवतीकेशातें धरुनि करी दुष्ट तो बलात्कार. ॥ ८२
अलकांचा[15] संच[16] **य** ती करकरवालेंचि[17] तत्क्षणीं छेदी; ।
सुकृतक्षयभय[18] झालें, म्हणवुनियां शापदानही नेदी.[19] ॥ ८३
मग ते निशाचर[20] **रा** ला 'वधीन जन्मांतरीं तुला! हो मी;' ।
ऐसें वदोनि तनुला[21] त्यासमयीं दीप्तपावकीं[22] होमी. ॥ ८४
वेदवती[23] ते क **म** लीं जन्मे तों तीस दुष्ट तो पाहे; ।
मग दशवदनें नेली लंकेला वेदगर्भरूपा[24] हे. ॥ ८५
रावणमंत्री ति **अ** ला अवलोकुनियां म्हणे, 'अहो स्वामी! ।
टाकावी हे कन्या, न वसावी सर्वथा तुझ्या धामीं.'[25] ॥ ८६

---

१. हिमाचळीं. २. तप करणारी स्त्री तीतें. ३. कामपीडित. ४. स्त्री. ५. बृहस्पतीचा पुत्र जो कुशध्वज नांवाचा ऋषि त्याची कन्या. ६. वाणीरूप. ७. माझ्या बापाच्या मनीं. ८. विष्णुहस्तीं. ९. दैत्येश्वर शंभुनामा त्याणें. १०. बापाला, कुशध्वजाला. शंभु नामक असुरानें हिला तिच्या बापाजवळ मागितलें तेव्हां त्यानें तिला दिली नाहीं, म्हणून असुरानें तिच्या बापास रात्रीं निजलेला असतां मारून पलायन केलें. (उत्तरकांड, स० १७ श्लो० १२-१३.) ११. स्वभक्तकल्पवृक्षाचे. १२. कामातुर. १३. रावण. १४. बहु. १५. केशांचा. १६. समूह. १७. हस्तरूप तलवारीनें. १८. शाप दिला असतां पुण्याचा नाश होईल असें भय. १९. न देई. २०. राक्षसाला. २१. देहाला. २२. पेटलेल्या अग्नींत. २३. गीति ८५-८७ यांस वाल्मीकिकृत रामायणांत आधार दिसत नाहीं. २४. वेदोत्पन्न. २५. गृहीं.

सचिवोक्तीनें[1] तो[2] **य** धिजठरीं नेवूनि टाकिली कन्या; ।
ते [3]जनकसवायतनक्षमोदरीं [4]लांगलें निघे धन्या. ॥ ८७

[5]हलपद्धतींत **ज** न्मे यास्तव [6]सीता असें तिचें नाम; ।
ते **रा**मा! तव [7]रामा, क्षमादयासत्वकीर्तिचें धाम. ॥ ८८

उपजे दिग्विज[8] **य** कर प्रथम जसा [9]काम यास [10]उद्दाम; ।
तैसाचि पुत्र झाला, [11]अन्वर्थचि **मे**घनाद [12]तन्नाम. ॥ ८९

त्यावरि [13]मरुत्त **रा** जा करीत होता [14]तयां स्थलीं यज्ञ; ।
[15]रणकाम धरुनि तेथें गेला तो **पं**क्तिकंठ अनयज्ञ. ॥ ९०

मग रणसज्ज **म** रुत्त क्रोधावेशें करील [16]संवर्त ।
यास्तव [17]सर्वासमाप्तिछद्में [18]वारी [19]तयासि **सं**[20]वर्त. ॥ ९१

[21]देवेंद्रसमान **श्री** **म**रुत्त परते [22]गुरूक्तिला नमुनी; ।
भ्याला म्हणून फिरला, हें भावी मूढ तो महामानी.॥ ९२

समयज्ञ अन्य **रा** जे देती [23]दशकंधरासि एक [24]कर; ।
समरीं कितेक अर्पिति [25]तनुधनगृहकामिनीयशःप्रकर. ॥ ९३

[26]अनरण्यनाम **म**[27] नुकुलकमलार्क महर्षिमान्य राजर्षी ।
होता [28]साकेतीं तो, त्यातेंहि बळें रणार्थ [29]आकर्षी. ॥ ९४

कपट करुनि **ज** नपतिला **अ**नरण्याला वधी महापापी; ।
'मत्कुलज**रा**महस्तें मरशिल' ऐसें खलासि तो शापी.॥ ९५

[30]नारद मुनिना **य** क तो त्या **द**शकंठासि भेटला [31]वाटे; ।
त्याला म्हणे **द**शानन, 'बलिष्ठ तुज कोण या जनीं वाटे.' ९६

---

१. मंत्रिवाक्यें. २. समुद्रांत. ३. जनकराजाच्या सवाच्या (यज्ञाच्या) आयतनक्षमेच्या (गृहभूमीच्या) पोटांत. ४. नांगरें. ५. नांगरमार्गी. ६. नांगराची रेषा. (हिला 'तास' असें म्हणतात.) ७. स्त्री. ८. दिग्विजय करण्याचा. ९. इच्छा. १०. मोठा. ११. अर्थयुक्त. १२. त्या इंद्रजिताचें नांव. १३. नामविशेष. १४. उशीरबीज नामक देशांत यमुनानदीतीरस्थ प्लक्षावतरणतीर्थी मरुत्त नामक राजानें यज्ञ केला. मरुत्त हा दिष्टकुलोत्पन्न अवीक्षितराजाचा पुत्र. १५.युद्धेच्छा. १६.प्रलय. १७. यज्ञाच्या असमाप्तिमिषें. १८. ज्यानें यज्ञदीक्षा घेतली आहे त्यानें युद्ध करणें अनुचित इत्यादि सांगून निवारण केलें. १९. मरुत्तराजाला. २०. ऋषिविशेष. (हा बृहस्पतीचा भ्राता.) २१. इंद्रसमसंपत्ती. २२. गुरुवचनाला. २३. रावणासि. २४. करभार, खंडणी. २५. देह. धन, गृह, स्त्री, यशःसमूह. २६. अयोध्याधिपति. २७. मनुवंशकमलास सूर्य असा. २८. अयोध्येंत. २९. ओढी. ३०. देवर्षिश्रेष्ठ. हा स्वेच्छाचारी असून कलहप्रिय अशी याची ख्याति पुराणांत वर्णिली आहे. हा परमभागवत होता. ३१. मार्गी.

तो मुनि म्हणे, '[1]भू **रा** पति दुर्बल, हे काय जिंकिशी धीरा! ? ।
[2]**य**मपरिभवें [3]जगत्रय [4]निर्जित होईल सर्वथा वीरा !' ॥ ९७

मुनिवचनें **य म** लोकीं गेला **द**शकंठ [5]पुष्पकावरणें; ।
तों [6]नारकिजन म्हणती, 'सोडुनि आम्हांसि कीर्तिला वरणें.९८

नि[7]रयमुखीं नि **ज** पापें पचलों [8]संताप पावलों राया ! ।
करितों बहु [9]परिदेवन, परि देव न येचि दीन ताराया. ९९

तूं तरि हा नि[7]रें **य** श्रम वारुनियां हो [10]शरण्य बा! आजी; ।
[11]अस्मत्त्राण न होतां, घडेल कैसी **य**मासवें [12]आजी ?'॥ १००

एवं त्या नारकि **ज** नवचनाहीं राक्षसाचिया हृदया ।
वज्रीं मृदुता तैसी, आली आश्चर्यहेतु फार दया. ॥ १०१

[13]पापिविमोक्षें तों **य** म, युद्ध करी [14]सप्तरात्र कोपानें; ।
अन्योन्यबळें करिती परस्परांच्याचि [15]शोणितें पानें. ॥ १०२

मग [16]काळदंड **रा** गें **द**शमुखमरणार्थ घेतला स्वकरीं; ।
तों [17]**वि**धि म्हणे, '**य**मा ! मज [18]वरदासि जगत्रयीं [19]मृषा न करीं.'॥

**वि**धिवचनें **य म** समर त्यागुनियां गुप्त होय तत्काल; ।
[20]बालमती क्षणदाचर म्हणे, 'पळाला भयामुळें [21]**का**ल.' १०४

**लं**केच्या नाथें जो **श्री** कंठाचा स्वकंठिंचा हार ।
तो [22]**वा**सुकि जिंकुनियां, युद्धीं केला [23]भुजंगसंहार. ॥ १०५

**वा**सुकि जिंकुनि **रा** वण वेढी जावूनि [24]**म**णिमयाख्यपुरी, ।
संपूर्ण वर्ष तेथें [25]**नि**वातकवचांसवें रणाशिं करी. ॥ १०६

[26]अमितपराक्र **म** सारे, सर्वांचीही जनीं [27]परा [28]भूती; ।
वर्षसहस्रें न घडे, अन्योन्यातें रणीं [29]पराभूती. ॥ १०७

---

१. राजे. २. यमपराभवें. ३. स्वर्गलोक, भूलोक आणि पाताळलोक. ४. जिंकिलेंसें. ५. पुष्पकविमानावरून. ६. नरकलोकसंबंधी. ७. नरकांत. ८. शोक. ९. नरकदुःख. १०. रक्षक, शरणागतांस तारणारा. ११. आमचें रक्षण. १२. युद्ध. १३. पापी पुरुषांची सुटका व्हावी म्हणून. १४. सात दिवस. १५. रक्तें. १६. यमदंड. १७. ब्रह्मदेव. १८. वर देणाऱ्यास. (रावणाला ब्रह्मदेवाचा देवगणावध्यत्वरूप वर होता.) १९ खोटा. २० मूढ. २१. यम. २२. सर्पविशेष. २३. सर्पनाश. २४. मणिमय नामक नगर. २५. दैत्यविशेष त्यांच्याशीं. २६. अतुलपराक्रमी. २७. उत्तम. २८. संपत्ति. २९. पराभव.

यास्तव पं[1]कज ज न्मा संधि[2] करी त्या परस्परांसहित; ।
सा[3]में करूनि सांगे निवातकवचक्षपाचरास हि[4]तं. ॥ १०८
तेथें वसोनि हा[5] य न द[6]शकंधर जाय अ[7]श्मनगराला; ।
शू[8]र्पणखीपतिसह तो संहारी का[9]लकेयनिकराला. ॥ १०९
व[10]रुणालयास रा वण जातां वंदी ज[11]गन्नुता सु[12]रभी, ।
जीच्या दुग्धें झा[13]ला क्षीरधि[14], ह[15]रिनाभिपंकजें सु[16]रभी.॥११०
द[6]शकंठानें स म रीं वरुणाचे पुत्र जिंकिले सर्वे; ।
तेव्हां ऐकत होता पा[17]शी विधिच्या सभेंत [18]गांधर्व.॥१११
वै[19]रोचनि दिति ज वळी जिंकावा हा धरोनि संकल्प ।
गेला, ज्व[20]लनपराजयकामें ख[21]द्योत काय अत्यल्प? ॥ ११२
वै[19]रोचनि विस्म य सह द[6]शकंठाला धरोनियां हांसे; ।
क[22]र्पूरमूर्तिसम तो स्मि[23]तभापूरांत रा[6]त्रिचर भासे. ॥ ११३
ना[24]मान्वय प्रयो ज न आगमनाचें, बली तयाशि पु[25]से; ।
तों निशिचर ति[26]लकदशक ध[27]र्मजलाच्या भरेंकरोनि पुसे. ॥
द[6]शमुख अ[28]न्व य नाम प्र[29]माण सांगोनियां म्हणे, 'राया! ।
आलों हरिला जिंकुनि, तूझ्या भयबंधनासि वाराया.'११५
हें ऐकुनि अ[30]सु रा धिप, हांसोनि म्हणे, 'भला भला मित्रा! ।
मी त्रा[31]ण इच्छितों तूं आलासि सु[32]हृद्विपत्तमोमित्रा! ॥ ११६
आतां या च[33]क्रानें म र्दी म[34]द्बंधदुःखहेतूतें; ।
मग पूजितील हर्षें सारेही दैत्यलोक हे तूतें.' ॥ ११७

---

१. ब्रह्मा. २. मित्रता, सख्य. ३. शत्रूला वश करण्याचें उपायचतुष्टय (साम, दान, दंड आणि भेद), त्यांतील पहिला उपाय. ४. कल्याण. ५. वर्ष. ६. रावण. ७. मणिमय नामक नगर. ८. विद्युज्जिव्हासहित. ९. कालकेयनामक दैत्यसमूहा. (हे दैत्य अश्मनगरांत राहत होते.) १०. वरुणगृहासि. ११. जनानें स्तविली असी. १२. कामधेनु. १३. सुरभीच्या दुग्धापासून क्षीरसागर उत्पन्न झाला. १४. क्षीरसमुद्र. १५. हरिनाभिकमलें. १६. सुगंधी. १७. वरुण. १८. गायन. (उत्तरकांड स० २३ श्लो० ५० पहा.) १९. विरोचनपुत्र. (वलि.) २०. अग्निपराजयेच्छेनें. २१. काजवा. २२. कापुराच्या मूर्तीसारखा शुभ्र. २३. हास्यकांतिपूरीं. २४. नाम, वंश. २५. विचारी. २६. दहा टिळे. २७. घामाच्या पाण्यानें. २८. वंश. २९. प्रयोजन. ३०. बली. ३१. रक्षण. ३२. स्वजनदुःखांधकाररूर्या. ३३. चक्राकृतिकुंडलानें. ३४. माझ्या बंधनरूप दुःखाच्या कारणातें. (विष्णूतें.)

**ब**[1]लितेजोभग्न **श्री रा**वण चक्रासि ऊचलायाला ।
बळ करितां पडिला तो, पाहुनि दैत्येंद्रे[2] हांसला याला. ॥

'त्रि[3]जगन्नाथप **रा** जय कर्तव्याच्या धरूनि का[4]मातें ।
याच बळें द[5]शवदना! करणार विमुक्त काय तूं मातें? ॥

जिंकित होते स **म** रीं अ[6]मरपतीतें करोनियां प[7]ण जे ।
ते ज्या ह[8]रिनें वधिले ली[9]लालेशेंचि आमचे प[10]णजे. ॥१२०

होता जो मत्पूर्व **ज** हिरण्यकशिपु प्रसिद्ध नामानें ।
त्याचें हें कुंडल, जें झालें गु[11]रु तूज **मे**रुच्या मानें. ॥१२१

नुचले कुंडल **य** त्नें ज्याचें, त[12]त्काल मारिशील कसा? ।
ग[13]गनस्थविधुग्रहणीं इच्छा धरितोशि काय बालकसा?' १२२

**ब**लिवाक्यानें सा **रा** रावणगर्व क्षणांतरें शमला; ।
**लं**केसि जावयाला प्रार्थुनियां 'दे' म्हणे 'निदे[14]श मला.' ॥

दैत्याधीश महा **म** ति आज्ञा दे **रा**वणासि जायाला; ।
व[15]रमहिमा रक्षाया द्वारीं न मु[16]रारि भेटला याला. ॥ १२४

**दि**[17]नमणिपरा **ज** यातें मग जाय **द**शास्य चं[18]डकोदंडी; ।
क्षुद्रमतीप्रति रविनें 'जितोऽस्मि'[19] म्हणवोनि धाडिला **दं**[20]डी. ॥

**प**र्वत [21]मुनिना **य** क जो, ज्ञानाचें पीठ[22] ज्यापरी धा[23]ता ।
त्याणें **द**शकंठाला कथिला राजा समर्थ **मां**[24]धाता. ॥ १२६

मुनिवचनें र **ज** नीचर यु[25]वनाश्वसुतासवें करी समर; ।
तेव्हां जय कोणातें घडेल हें नेणती **स्व**यें अमर. ॥ १२७

**गा**[26]लव **पु**लस्त्य **य** त्नें वारिति येवूनि शीघ्र दोघांस; ।
म्हणती, 'तुमच्या मरणें निजजन शोकाग्निचा न हो घा[27]स.' ॥

---

१. बलितेजें निस्तेज असा. २. बली. ३. विष्णुपराजय करण्याच्या. ४. इच्छेतें. ५. हे रावणा. ६. इंद्रातें. ७. प्रतिज्ञा. ८. विष्णूनें. ९. सहजचि. १०. हिरण्याक्ष व हिरण्यकशिपु. ११. जड. १२. विष्णु. १३. आकाशांतील चंद्रग्रहणीं. १४. आज्ञा. १५. वरसामर्थ्य. ब्रह्मदेवानें दिलेला वर खंडित न व्हावा म्हणून विष्णु अंतर्धान पावला. बलीच्या द्वारीं मुसळधारी विष्णुरूपी पुरुष द्वारपालक होता अशी कथा आहे. १६. विष्णु. रावण बलिराजाला सोडविण्यासाठीं गेला होता. ही कथा उत्तरकांडाच्या प्रक्षिप्त सर्गांत आहे. १७. सूर्यपराभवातें. १८. भयंकर धनु ज्याचें असा. १९. जिंकिला आहें (मी). २०. नामविशेष. सूर्याचा द्वारपालक. २१. ऋषिश्रेष्ठ. २२. स्थान. २३. ब्रह्मा. २४. इक्ष्वाकुकुलोत्पन्न युवनाश्वराजाचा पुत्र, अयोध्याधिपति. २५. युवनाश्वनामक राजाचा पुत्र जो मांधाता त्यासवें. २६. ऋषिविशेष. २७. आहुति.

मग [1]अमृतक **रा** संगें रण करितां, येवुनी सुरांसहित ।
**वि**धि **द**शकंठासि म्हणे, '[2]विधु रक्षीं हा, असे जनास हित.'
तदुपरि पश्चि **म** सिंधुद्वीपीं [3]**क**पिलासमीप तो गेला; ।
श्वानें [4]अंगारचयीं [5]मांसोच्चयनिश्चय भ्रमें केला. ॥ १३०
अवलोकुनियां **श्री** तें हरावयाचा मनीं धरी लोभ; ।
तों [6]भग्नदर्प **रा**वण पडला, झाला [7]महर्षिचा [8]क्षोभ. ॥ १३१
[9]कौशिक [10]दिवांक **रा** च्या तेजें जैसा, तसाचि तो भ्रमला; ।
[11]अमलात्मा [7]प्रभु उठवी, तदा [12]पुनर्जातसा क्षणें गमला. १३२
[13]**द**शकंठ म्हणे, '**म** जला तूं मृत्यु [14]श्लाघ्य या जनामाजी; ।
वांचविलें तरि देवा, स्मृति तव [15]पादांबुजीं असो [16]मांजी.' ॥ १३३
स्तवुनि नमुनि **ज** गदीश्वरचरणातें [17]सर्वलोकशरणातें, ।
आज्ञा घेवुनि गेला [13]**द**शमुख [18]गंधर्वदेवशरणातें. ॥ १३४
तो निर्भय दुर्न **य** खल [19]सुरगंधर्वांगना बळेंचि हरी; ।
हरिणीसम त्या गमती, [20]हरि ! **ह**रि ! **द**शकंठही तयांत [21]हरी. ॥
त्या मग [13]निशाच **रा** ला देती कोपें पतिव्रता शाप; ।
म्हणती, 'सत्वर पावो [22]स्त्रीकृतमरणासि हा महापाप.' ॥ १३६
**लं**काप्रवेशस **म** यीं ऐकुनि [23]निजकांतमृत्युची वार्ता, ।
**शू**र्पणखी बहु निंदी बंधुसि, [24]वैधव्यदुःखदावार्ता. ॥ १३७
समजावुनि नि **ज** भगिनी, **ख**रनामकराक्षसास ते [25]निरवी; ।
पाहे [26]**नि**कुंभिलांतीं [27]सुत जो भासे प्रभेकरूनि रवी. ॥ १३८
करकमलद्व **य** जोडुनि नमन करी [27]**मे**घनाद तों यातें; ।
[13]तात मुखें [28]आशीतें, वर्षे नेत्रें [29]प्रमोदतोयातें. ॥ १३९

---

१. चंद्राशीं. २. चंद्र. ३. मुनिवर्य. ४. इंगलसमूहीं. ५. मांससमूहनिश्चय. ६. नष्टगर्व. ७. कपिलाचा. ८. कोप. ९. घुबड. १०. सूर्याच्या. ११. निर्मळचित्त. १२. पुनः झाल्यासारखा. १३. रावण. १४. योग्य, स्तुत्य. १५. चरणकमलीं. १६. गीति ११२–१३३ यांत वर्णिलेला कथाभाग उत्तरकांडाच्या २३ व्या सर्गापुढच्या पांच प्रक्षिप्त सर्गांत आहे. १७. सर्वलोकांचे आश्रयस्थानातें. १८. गंधर्व, देव, इत्यादिकांच्या गृहीं. १९. देवगंधर्वस्त्रिया. २०. खेदार्थी अव्यय. २१. सिंह. २२. स्त्रीनिमित्तमरणासि. (स० २४ श्लो० २१ पहा.) २३. स्वपतिमृत्यूची, विद्युज्जिव्हाच्या मरणाची. २४. वैधव्यदुःखरूप वणव्यानें पीडित असी. २५. स्वाधीन करी. (स० २४ श्लो० ३६ पहा.) २६. लंकेच्या पश्चिमद्वारदेशीं असणारें उपवन. येथें इंद्रजितानें यज्ञ केले. २७. इंद्रजित्. २८. आशीर्वादातें. २९. आनंदाश्रूतें.

'प्रथमाश्रमी[1] द्वि[2]**ज**र्षभ तत्समवेषेंकरूनियां काय,[3] ।
केलें कर्म? सुता! तूं तेजस्वी क्षीणही दिसे काय.'॥ १४०
उशना[4] म्हणे, 'न**य**ज्ञें त्वत्पुत्रें सिद्धि साधिली अतुला; ।
अग्निष्टोमानंतर[5] केलें विध्युक्त वैष्णवक्रतुला.[6] ॥ १४१
केला हयमख[7] **रा**या, यजिलें गोमेध[8] राजसूयाहीं[9]; ।
माहेश्वरयज्ञातें[10]; झाला प्रीत त्रिनेत्रही[11] पाहीं. ॥ १४२
रथ दिधला का[12]**म**गम त्र्यक्षें आणीक तामसी[13] माया; ।
दुर्जय अस्त्र शरासन[14] अक्षयशर[15] तूणयुग्मही[16] राया! ॥ १४३
ऐसे त्वत्पुत्रातें[17] **श्री**कंठें[18] अर्पिले अलभ्य वर; ।
यासम कोणीं नाहीं, स्वर्गांत रसातलांत भूमिवर. ॥ १४४
स्वभुजबळें वी**रा**धिप हा जिंकिल संगरीं[19] शतक्रतुला[20]; ।
याच्या यशोमृताची पावेना देवकीर्तितक्र[21] तुला.[22]' ॥ १४५
हें परिसुनि अ[23]**म**रारि स्वतनय[24] आलिंगुनि प्रहृष्ट[25] करी; ।
जलदासि[26] जलद[27] भेटे, किंवा कलभास[28] मत्त वन्यकरी.[29] १४६
सुरगंधर्वस्त्री**ज**न घेवुन लंकेशि जाय तुष्टमनें; ।
तेथें बिभीषणादिक करिती दशकंधरांघ्रिला[30] नमनें.॥ १४७
अमरपरा**य** केला, स्त्री हरिल्या, हें दशाननें कथिलें; ।
तेव्हां म्हणे बिभीषण, 'मधुनेंही[31] त्वद्यशोब्धिला[32] मथिलें. १४८
हरिल्या सुरदा[33]**रा** तूं, यास्तव कुंभीनसी[34] बळें हरिली; ।
करुनि पराजय माझा, मधुनें तूझी स्वसा[35] स्वयें वरिली. १४९

---

१. ब्रह्मचर्यवान्. आश्रम चार आहेत:—ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य, वानप्रस्थ आणि संन्यास. प्रत्येक आश्रमास अनुरूप अशीं कर्मे धर्मशास्त्रांत सांगितलीं आहेत. २. ब्राह्मणश्रेष्ठ. ३. देह. ४. शुक्र. ५. यज्ञविशेष, त्यानंतर. ६. वैष्णवसत्राला. ७. अश्वमेध. ८. गोयज्ञ. ९. सार्वभौमराजानें करावयाचा यज्ञ. १०. शैवसत्रातें. मेघनादानें अग्निष्टोम, अश्वमेध, बहुसुवर्णक, राजसूय, वैष्णव, गोमेध आणि माहेश्वर असे सात प्रसिद्ध यज्ञ केले. ११. महादेवही. १२ यथेच्छगामी. १३. तम (अंधकार) उत्पन्न करणारी माया. १४. धनु. १५. ज्याचे बाण कधींही सरावयाचे नाहींत असें (शरासन.) १६. दोन भातेहि. १७. इंद्रजितातें. १८. शिवें. १९. युद्धीं. २०. इंद्रा. २१. देवकीर्तिरूप ताक. २२. तुलना. २३. रावण. २४. स्वपुत्र. २५. हर्षित. २६. मेघाला. २७. मेघ. २८. हत्तीच्या छाव्यासि. २९. वनगज. ३०. रावणचरणा. ३१. दैत्यविशेष, त्याणें. ३२. तुझ्या यशःसमुद्रा. ३३. देवस्त्रिया. ३४. नामविशेष (बहिण.) ३५. बहिण. कुंभीनसी ही रावणाच्या चुलत मातृभगिनीची कन्या म्हणून त्याची चुलत माउसबहीण.

प्रभु! तव, [1]माता **म** ह जो **सु**मालिनामा प्रसिद्ध नामानें; ।
तज्ज्येष्ठ **मा**ल्यवंत भ्राता, सर्वांसि वंद्य जो मानें. ॥ १९०

त्याची [2]कन्या जे तु **ज** [3]जननीतुल्या सदैव पूजाया, ।
[4]**पु**ष्पोत्कटाभिधाना **म**धुनें नेली तिची [5]सुता राया !'॥ १९१

ऐसें परिसुनि **य** मसा **द**शकंठ धरी मनांत रागास; ।
'घास' म्हणे '**म**धु माझा होइल [6]अनलास जापरी [7]घास.' १९२

**म**धुमथनार्थ [8]**ज** वानें **म**धुनगराच्या समीप जों गेला; ।
**कुं**भीनसीस कळतां सत्कार तिणें स्वबंधुला केला. ॥ १९३

'[9]मत्कांतप्राणव्य **य** न करीं, दे [10]मौक्तिकांशि [11]खलकाला! ।
द्यावें अभय दयाळा! कुंकुमतिलकाशि आणि [12]अलकाला.'॥

भगिनीवचनें **रा** वण **म**धुशीं मैत्री करोनि दे रत्नें; ।
गेला [13]त्रिविष्टपाला पुनरपि जिंकावयासि सुर [14]यत्नें. ॥ १९५

**न**लकूबरना **म** क जो [15]**ध**नपतिसुत [16]तन्मनःप्रिया **रं**भा ।
[17]अवलोकिली **द**शास्यें, [18]कनकाची काय चालती [19]रंभा. ॥ १९६

[20]**द**शवदनाला [21]**श्री** शी गमली, मग वृत्त तो पुसे सारें; ।
तीणें '[22]स्नुषा तुझी मी,' हें कथिलें भाषणें [23]सुधासारें. १९७

[24]मदनातुर तो **रा** क्षस **रं**भेला वारितां, बळें भोगी; ।
[25]नवकेतकीसुमातें वेष्टुनि काळा जसा [26]महाभोगी.॥ १९८

**द**शकंठें मद **म** त्तें वनीं [27]यथाकाम मर्दिली **रं**भा; ।
जैशी [28]निरंकुशानें वन्यगजानें [29]फलानता [30]रंभा. ॥ १९९

---

१. आजा. (मातेचा जनक.) २. हिचें नांव अनला, हिची कन्या कुंभीनसी. ३. कैकसी-मारखी. ४. पुष्पोत्कटानामक. येथें पुष्पोत्कटा हें नांव चुकून पडलें असें दिसतें. 'अनला अभिधान जिचें' असें अथवा अशा अर्थाचें वाक्य पाहिजे होतें. याचें कारण पुष्पोत्कटा ही सुमाली राक्षसाची कन्या, माल्यवंताची नव्हे. (स० २५, श्लो० २४ पहा.) ५. कन्या. ६. अग्नीस. ७. तृण. ८. वेगें. ९. मत्पतिनाश. १०. नथीस. ११. हे दुष्टनाशका. १२. केशाला. १३. स्वर्ग. १४. गीति १३८–१५५ यांतील कथाभाग २५ व्या सर्गांत आहे. १५. कुबेरपुत्र. १६. त्याची आवडती स्त्री. १७. कैलासपर्वतावर पाहिली. १८. सुवर्णाची. १९. केळ. २०. रावणाला. २१. लक्ष्मीतुल्य. २२. सून. कुबेर हा रावणाचा सापत्न भ्राता म्हणून कुबेरपुत्राची (नलकूबराची) भार्या ही रावणाची सून होते. २३. अमृततुल्यें. २४. कामातुर. २५. नव्या केतकीपुष्पातें. २६. मोठा सर्प. २७. यथेच्छ. २८. उन्मत्तें, अंकुशरहितानें, स्वच्छंदचारी. २९. फलांहीं नम्र असी. ३०. केळ.

मग ते रंभा नि **ज** पतिजवळ करी फारफार आक्रांत; ।
तेव्हां रोदनकारण पुसता झाला स्वयें तिचा [1]कांत. ॥ १६०

तों [2]स्वपितृव्यान्या **य** स्त्रीनें कथितां मनीं धरी ताप; ।
[3]पापप्रियास ऐसा [4]धनदाचा पुत्र दे महाशाप. ॥ १६१

'यापरि [5]परदा **रा** जरि भोगील बळें दशास्य पापिष्ठ; ।
तरि [6]तच्छिर मच्छापें होवू शतधा फुटोनियां पिष्ट.' ॥ १६२

दशकंठें जशि **म** थिली रंभा, तैसीच [7]मेघनादानें ।
[8]सुरपतिसेना [9]दमिली; तैं राक्षस नाचती [10]प्रमोदानें. ॥ १६३

बांधुनि [11]सुरराज निजस्थाना नेला; तदा [12]सरोजभवें; ।
स्तवनें संतोषविला तो रावणपुत्र [13]दिव्यवाग्विभवें. ॥ १६४

'वर [14]हृदयप्रि **य** वत्सा ! मजपाशीं माग, शक्र हा सोड; ।
[15]कोडें स्वपूर्वजाचें पुरवीं' ऐसें [16]विधी वदे गोड. ॥ १६५

'देशी अमरत्व **ज** री, तरि हा मानीन बोल देवाचा; ।
दे वांचाया वर मज' ऐसी घननाद तो वदे वाचा. ॥ १६६

'हें अमरत्व न **य** ज्ञा ! दुर्लभ, आणीक माग एक वर.' ।
ऐसें वदता झाला अमृताहुनि गोड [17]सर्वलोकवर. ॥ १६७

'रथवर [18]सम **रा** रंभीं प्रकटावा दिव्य [19]कामगम होमीं; ।
त्या [20]यानीं चढल्यावर अमर असावें रणांगणीं हो! मी. ॥ १६८

यापरि करितां **म** [21]ख जरि, होइल मध्येंचि विघ्न कार्याला; ।
तरि मग असो [22]विपर्यय' हें मागे मेघनाद [23]ओर्याला. १६९

हें परिसुनियां [24]श्री विधि 'दिधलें' ऐसें वदे, तदां [25]बळहा ।
प्रभुच्या हस्तीं अर्पुनि, पावे आनंद [26]मूढधी खल हा. १७०

[27]रावणिदत्तप **रा** जयखिन्नेंद्रातें म्हणे जरोजजनी; ।
'[28]गौतमभार्याधर्षणपातकफल पावलास आज जनीं.' ॥ १७१

---

१. पति. २. आपल्या चुलत्याचा (रावणाचा) अन्याय. ३. पाप ज्याला आवडतें अशा रावणाला. ४. कुबेराचा. ५. परस्त्री. ६. त्या रावणाचें मस्तक. (स० २६ श्लो० ५५–५६ पहा.) ७. इंद्रजितें. ८. इंद्रसेना. ९. पराभविली. १०. हर्षें. ११. इंद्र. १२. ब्रह्मदेवें. १३. उत्तम वाणीच्या वैभवानें. १४. इच्छित. १५. कौतुक. १६. ब्रह्मदेव. १७. युद्धारंभीं. १८. यथेच्छगामी. १९. वाहनीं. २०. यज्ञ. २१. उलटें. २२. ब्रह्मदेवाला. २३. ब्रह्मा. २४. इंद्र. २५. मूढबुद्धि. २६. इंद्रजितानें दिलेल्या पराजयानें खिन्न जो इंद्र, त्यातें. २७. अहल्यागमनपापफळ. (बालकांड, स० ४८ पहा.)

अनुचित कर्म **म** दांधें केलें त्याचा विपाक[1] हा साचा; ।
अंजनपथभजननिरत[2], भाजन[3] होतो जनोपहासाचा[4]. ॥ १७२

शक्रासि[5] म्हणे कं**ज** ज[6], 'निजनगरीला[7] विशंक[8] आपण जा;' ।
ऐसें वदोनि गेला स्वस्थानाला सुरारिचा[9] पणजा. ॥ १७३

जिकायातें हैह[10] **य** रावण माहिष्मतीस[11] सेनांहीं ।
वेष्टी, तों म्हणती जन, 'अर्जुन[10] **द**शकंधरा ! पुरीं[11] नाहीं.' ॥

मग नर्मदाति[12] **रा** ला, जावुनि **द**शकंठ तो विहार करी; ।
तेथें क्रीडत होता अर्जुन[10] जैसा करेणुयुक्त[13] करी[14]. ॥ १७५

दशशतबाहु[15] **म** हीपति आलिंगी **न**र्मदाप्रवाहातें; ।
तेणें मागें मुरडे, जल पाहे दुष्ट तेधवां हा तें. ॥ १७६

मेकलगिरिरा[16] **ज** सुता वरिती जाली महार्णवाला[17] जे ।
मागें फिरतां वाढे, भूपें आलिंगितां मनीं लाजे. ॥ १७७

अर्जुन[10] कुवल **य** नायक, कुवलयनयनांगनागणीं[18] केली[19] ।
रेवोदकीं[20] करी, तों **द**शकंठें युद्धकामना केली. ॥ १७८

मग अर्जुन[10] र **ज** नीचर दोघे करिती अपूर्वसमराशी; ।
झाल्या शोणिततटिनी[21], मांसाचेही महीध्रसम[22] राशी. ॥ १७९

कृतवीर्यतन **य** युद्धीं जिंकुनि **द**शकंधरासि बद्ध करी; ।
कारागारीं[23] ठेवी, जैसा आरण्यक[24] प्रमत्त करी[14]. ॥ १८०

बहुदिन तो का **रा** गृहवासी होता विमूढ **दि**क्तुंड; ।
करुणार्णवें[25] पुलस्त्यें[26] सोडविलें प्राणहीन नातुंड. ॥ १८१

---

१. परिणाम. २. अंधकारयुक्तमार्गाचा आश्रय करणारा. ३. पात्र. ४. लोकहास्याचा. ५. इंद्रास. ६. ब्रह्मा. ७. अमरावतीला. ८. निर्भय. ९. रावणाचा. १०. सहस्रार्जुन. यास सहस्र हात होते म्हणून सहस्रार्जुन असें म्हणत. हा मोठा पराक्रमी होता, यानें रावणास धरून बद्ध केलें होतें. (स० ३१–३३ पहा.) ११. नगरीस. (माहिष्मती हेंच सांप्रतचें महेश्वर नगर होय. हें नर्मदातीरीं आहे.) १२. जलक्रीडा करण्यास्तव नर्मदेवर गेला होता. ('तिराला' यांत 'ति' दीर्घ पाहिजे पण वृत्तभंगास्तव दीर्घ करतां येत नाहीं, अशी अडचण आहे.) येथें 'मेकलजनितीरा मग' असा पाठ अथवा अशासारखा दुसरा पाठ कल्पिल्यास सर्व अडचणी दूर होतील. मेकलपर्वतापासून जन्म म्ह० जनि जिचा ती नर्मदा, तिच्या तटाला–असा अर्थ येथें घेतला पाहिजे.) १३. हत्तीणीसह. १४. हत्ती. १५. हजार हात ज्यास तो. (कार्तवीर्य.) १६. मेकलपर्वतकन्या नर्मदा. १७. समुद्रा. १८. कमलनेत्रस्त्रीसमूहीं. १९. क्रीडा. २०. रेवानदीचे उदकीं. २१. रक्तनदी. २२. पर्वततुल्य. २३. बंदीखान्यांत. २४. रानटी. २५. दयासमुद्रें. २६. ऋषिविशेष (रावणाचा आजा) त्याणें.

ऐसें झाल्यावर **म** ग, दशकंठानें[1] अनंतबलशाली[2] ।
दक्षिणसागरतीरीं संध्या करितां विलोकिला **वा**ली.॥ १८२
केली रक्षोनाथें **श्री** म**द्वा**लीसवें तदा चेष्टा; ।
निजगर्वनाशदक्षा[3] सर्वजगद्ध्वंसहेतु[4] नीचेष्टा[5]. ॥ १८३
मागुनि जावुनि **रा** वण घाली कक्षान्तरांत[6] हातातें; ।
तैसाचि तेथ धरिला, रगडुनियां **अं**गदाचिया तातें[7].॥ १८४
तो कक्षालोमाश्र[8] **म,** भासे जडली तदस्रलोभा[9] ऊं[10]; ।
घर्मोष्म[11]पाचिताकृति नारकिंचा[12] काय हा सखा भाऊ ?॥ १८५
वानरकुलरा **ज** करी सर्वांबुधि[13]मज्जनासि, तो चिरडे; ।
श्वास[14]निरोधव्याकुळ केवळ **द**शकंठ तो मनींचि रडे.॥ १८६
तो कपिजनना **य** क मग **कि**ष्किंधेलाचि जेधवां आला; ।
तेव्हां कक्षेपासुनि[15] सोडी यांला[16] परेतकल्पाला[17]. ॥ १८७
कक्षाकारागारीं[18] **रा** वण अत्यंत पावला ताप; ।
हरिपतिच्या[19] यात्रेसह या दुष्टाचेंहि संपलें पाप. ॥ १८८
प्लवंगवरास[20] **म** वेत क्षणदाचर[21] सख्य साधिता झाला; ।
याला **ता**रापतिनें, आज्ञा दिधली पुरीस[22] जायाला.॥ १८९
यापरि कथा द्वि[23] **ज** र्षभ वदला, ते ऐकिली सुधासारा[24]; ।
**राम** म्हणे, '**मा**रुतिचा उद्भव[25]ही सांगिजे, बुधा[26] !सारा[27].' १९०
**लो**पामुद्रेचा[28] प्रि[29] **य** तेव्हां हें जानकीवरास[30] वदे; ।
'तूं सेवीं स्वस्थमनें, अन्यालाही कथावरासव[31] दे.' ॥ १९१
कपिरमण[32] [33]**अं ज** नीपति जो नामें ख्यात **के**सरी राया ! ।
पवनापासुनि[34] पूर्वी प्रसवे या **मा**रुतीस तज्जाया[35]. ॥ १९२

---

१. रावणानें. २. अतिबलें शोभणारा. ३. स्वगर्वनाशसमर्था. ४. सर्वलोकनाशहेतु. ५. दुष्टप्रिया. ६. काखेंत. ७. वालीनें. ८. काखेंतील केशांत राहाणारी. ९. त्या वालीरक्ताच्या आशेला. १०. साहा पायांचा आणि घामापासून उत्पन्न झालेला असा एक प्राणी. ११. घर्म, ऊष्मा, यांहीं क्लेशित देह ज्याचा असा. १२. नरकस्थजीवांचा. १३. सर्वसमुद्रस्नानासि, चतुःसागरस्नानासि. १४. श्वास कोंडल्यानें दुःखित. १५. काखेंतून. १६. रावणाला. १७. मृततुल्या. १८. कक्षारूपबंदिशाळेंत. १९ वानराधिपाच्या, वालीच्या. २०. वालीसह. (सर्ग ३४ पहा.) २१. राक्षस. (रावण.) २२. लंकेस. २३. अगस्त्य. २४. अमृतवृष्टिकारक. २५. उत्पत्तिहि. २६. हे सुज्ञा. २७. सर्व. २८. अगस्त्यस्त्रीचें नांव. २९. पति. ३०. रामास. ३१. कथासुरस. ३२. वानरश्रेष्ठ. ३३. मूळ रामायणांत अंजना असें नांव आढळतें, (सर्ग ३३ पहा.) ३४. वायूपासून. ३५. याची (केसरीची) बायको.

हा पवनतन **य** पूर्वी शिशु असतां, अंजनी फलाहरणा ।
गेली होती तेव्हां, करिता झाला महाद्भुताचरणा. ॥ १९३

उदितप्रभाक **रा** ला क्षुधित मरुत्पुत्र पक्क फल मानी; ।
मुदित उडे गगनीं तों; हानि गणी **रा**हु तो महामानी.॥ १९४

दिल्हें कां अन्याला **म**द्भक्ष्य,' असें पुसे सुरेशाला; ।
ऐसें अद्भुत ऐकुनि अवलोकायास इंद्रही आला. ॥ १९५

ज्याकाळीं तो आला **श्री**मानैरावणाधिरूढ हरी; ।
रवि सोडुनि फळमतिनें फिरला ऐरावताकडेचि हरी.॥ १९६

स्वगजत्राणप **रा** नें इंद्रानें टाकितांचि शतकोटी; ।
तुहिननगीं कपि पडला; तों झाले भग्न वृक्ष शतकोटी. १९७

पविभग्नहनु **म** रुत्सुत मृतकल्प पडे तदा स्वतोकाला; ।
अंकीं घेवुनि रडतां; त्यजी जगत्प्राण सर्व लोकाला. ॥ १९८

वातपरित्यक्त **ज** नीं झाला सर्वत्र मूत्रमळरोध; ।
तेव्हां सर्वसुरांसह, त्याचा केला चतुर्मुखें शोध. ॥ १९९

हिमवद्गुहाल **य** स्थित पवमान प्रार्थिला पयोजभवें; ।
हस्तस्पर्शे केला **मा**रुति जीवंत त्या जगत्प्रभवें. ॥ २००

देवांसह चतु **रा** स्यें नाम हनूमंत ठेविलें याचें; ।
शस्त्रास्त्रावध्यत्वहि चिरंजीवित्वासवें दिलें माचें. ॥ २०१

त्यावरि अप्रति **म** बळें **मा**रुतिनें बाळकस्वभावानें ।
मुनि पीडिले, तदा ते शापिति ऐसें तपःप्रभावानें.॥ २०२

'बलमत्ता! मुनि **ज** न तूं पीडिसि, ऐसा अशांत दुःशील; ।
अन्यें कथिल्यावांचुनि निजवीर्यज्ञानहीन होशील. ॥ २०३

ऐसा वाततन **य** हा शापातें पावला म्हणून बल ।
याचें यास कळेना, अन्यें कथिल्याविना असें नवल.'॥ २०४

१. फलें आणायास. २. मोठें अद्भुत कृत्य. ३. उगवलेला सूर्य त्याला. ४. मारुति. ५. मानिता झाला. ६. दुसऱ्याला, मारुतीला. ७. माझें (राहूचें) भक्ष्य. चंद्र आणि सूर्य हे राहूचे भक्ष्य. ८. राहु विचारी. (स० ३५ श्लो० ३४ पहा.) ९. इंद्राला. १०. तेजस्वी सुरगजावर बसलेला. ११. इंद्र. १२. फलबुद्धिनें. १३. मारुति. १४. आपल्या ऐरावतरक्षणपरें. १५. वज्र. १६. हिमाचलीं. १७. वज्रभिन्न हनवटी ज्याची असा. १८. मृततुल्य. १९. स्वपुत्राला. २०. मांडीवर. २१. वायु. २२. वायुत्यक्तलोकीं. २३. ब्रह्मदेवें. २४. हिमाचलगुहावासी. २५. शस्त्रास्त्रांनीं नाश न होणें ही स्थिति. २६. चिरंजीविपणासह. २७. तपाच्या सामर्थ्यानें. २८. शांतिहीन. २९. वाईट स्वभावाचा. ३०. स्वबल न जाणणारा.

हा पवनतनु[1] **ज** संभव आयकिला कुंभजाननें[2] **रा**में ।
**सु**ग्रीव**वा**लिवानरजन्मकथाकर्णनस्पृहाधामें.[3] ॥ २०५

'**वा**लि**सु**कंठाव्हय[4] **य** कपिसंभवही सांगणें' म्हणे **राम**; ।
भगवान् कुंभसमुद्भव[5] कथिता झाला कथा यथाकाम.[6] ॥ २०६

'**वि**धिलोचननी**रा**[7] चा बिंदु पडे भूतळीं, तदा झाला ।
ऋक्षरजा नाम कपी, पाळित सुततुल्य आत्मभू[8] ज्याला. २०७

**मे**रूत्तरपार्श्वी[9] **म** ग फिरतां पाहे स्वबिंब कांसारीं[10]; ।
रिपुमतिनें[11] पडिला तो, अंगें स्त्रीरूप[12] पावला सारीं. ॥ २०८

त्या स्त्रीरूपालोकें[13] **श्री** शक्रा[14]कांसि जाहला काम[15]; ।
एकीवर दोघेही पडले येवूनियां महोद्दाम.[16] ॥ २०९

केशीं अमर व[17] **रा** चें शुक्र[18] पडे, तोचि जाहला वाली[19]; ।
कंठीं **भा**स्करवीर्यें जन्मे **सु**ग्रीव हा यशःशाली.[20] ॥ २१०

प्राप्तस्वरूप[21] सु **म** ती ऋक्षरजा[22] पुत्रयुक्त, धात्यातें[23] ।
वंदुनि वृत्त वदे तो; **कि**ष्किंधाराज्य दे पितो त्यातें. ॥ २११

आतां कथितों तु **ज** मी **सी**तेचा हरणहेतु देवास ।
कर्णद्वारें नेवुनि चित्तागारीं[24] कथेसि दे वास.[25] ॥ २१२

जो **वि**धिचा तन **य** मुनी सनत्कुमार[26] त्रिलोकनुतपाद[27] ।
त्याशीं दशकंठाशीं[28] झालासे मुक्तिहेतु[29] संवाद. ॥ २१३

जे हरिच्या[30] स्वक**रा** नें मरतिल जन वैरभक्तिसंपूर्ण,[31] ।
ते श्वेतद्वीपातें[32] पावुनि जातात मुक्तिला तूर्ण.[33]' ॥ २१४

---

१. मारुतिजन्म. २. अगस्त्यमुखें. ३. सुग्रीववालिजन्मकथाश्रवण करूं इच्छिणाऱ्या रामानें. ४. वालिसुग्रीवोत्पत्ति. ५. अगस्त्य. ६. यथेच्छ. ७. ब्रह्मदेवनेत्रोदकाचा. ८. थेंब.(सत्यलोकीं ब्रह्मदेव समाधिस्थ असतां वृत्ति उत्थित झाल्यावर आनंदाच्या योगें बाष्पबिंदु पडला, तो अंगुलींत धरून त्यानें भूमीवर टाकिला. तेव्हां वानर उत्पन्न झाला, त्याचें नांव ऋक्षरजा.) ९. मेरूच्या उत्तरभागीं. १०. सरोवरीं. ११. शत्रुबुद्धीनें. (आपलें प्रतिबिंब हाच कोणी शत्रु असें समजून उडी घातली) १२. सप्तत्रिंश सर्गापुढील प्रक्षिप्त सर्ग १ श्लो० २३–२६ पहा. १३. स्त्रीरूपावलोकनें. १४. इंद्रसूर्यांसि. १५. भोगवासना. १६. मोठे दांडगे. १७. इंद्राचें. १८. वीर्य. १९. वालाच्या (केशांच्या) ठिकाणीं वीर्य पडलें म्हणून वाली. ग्रीवेच्या (मानेच्या) ठिकाणीं वीर्य पडलें म्हणून सुग्रीव. २०. यशानें शोभणारा. २१. प्राप्तपूर्वरूप. २२. वानरविशेष. २३. ब्रह्मदेवातें. २४. चित्तगृहीं. २५. राहणें, स्थान. २६. ब्रह्मदेवाच्या चार मानसपुत्रांपैकीं एक. २७. त्रैलोक्यानें स्तुत चरण ज्याचे असा. २८. रावणाशीं. २९. मोक्षाला कारणभूत असा. ३०. विष्णूच्या. ३१. विरोधभक्तियुक्त. ३२. पृथ्वीच्या द्वीपांतील एक; यासच चंद्रद्वीप असें म्हणतात. ३३. शीघ्र.

ऐसें विधिसुत[1] **म** त तो दशमुख ऐकोनियां विरोधाला[2] ।
तुजशीं करोनि समरा मरून अमृतें[3] जगद्गुरो[4]! धाला[5].॥ २१५

**ना**रद नाम द्वि **ज** वर पूर्वी वदला दशाननें पुसतां, ।
‘श्वेतद्वीपनिवासी केवळ बलवंत मान्य सर्वसतां[6].’ ॥ २१६

तेंही परिसुनि **य** त्नें, तेथें जातांचि राघवा[7] रामा! ।
पीडिति दशाननाला त्या श्वेतद्वीपवासिनी रामा[8]. ॥ २१७

तेथें द्रुहिणात्म[9] **ज** मुनि हांसे म्हणवूनि तव करें मेला; ।
श्वेतद्वीपजनाशीं तुलना पावावयासि तो गेला. ॥ २१८

तो विमलहृद **य** केवळ दशकंधर मोक्षकाम[10] रघुराया! ।
केला विरोध तुजसीं, जाया[11] नेवूनि, मुक्तिला जाया.॥ २१९

तुज जगदात्मा[12] **रा** मा! पावायाच्या धरूनियां कामा[13]; ।
सीता जैसी माता, तैसी नेली दशाननें रामा[14]!’ ॥ २२०

ऐसें अगस्त्यना[15] **म** द्विजपति सांगोनि आश्रमा गेला; ।
जनकादिकांसि **रा**में मग बहु सत्कार आदरें केला.॥ २२१

जे जे आले होते, **श्री** [16]शविदेहादि भूप पूजाया ।
त्यांला सत्कारुनियां, आज्ञा दे [17]ताटकारिपू जाया. ॥ २२२

पूजुनियां रघु **रा** जें अंगदसुग्रीवजांबवत्प्रमुख; ।
पाठविले स्वस्थाना, देवुनि निर्ज[18]भक्तिरूपनित्यसुख. ॥ २२३

हृदयीं धरुनि **मं**[19] रुत्सुत रामें केला निदेश[20] जायाला; ।
दिधलें चिरजीवित्व प्रा[21]यः स्वपदांबुजें[22] भजायाला. ॥ २२४

मारुति म्हणे, ‘म **ज** क्षण विस्मरण नसो तुला जपायाचें[23]; ।
[24]मन्निकट अप्सरांहीं सद्यश गावें तुझ्याचि पायांचें. ॥ २२५

यावत्काल तुझें **य** श, तोंवर तव पाददास वांचावा; ।
[25]त्वच्चरितामृतसद्रस हृदयघटामाजि नित्य सांचावा.’ ॥ २२६

---

१. सनत्कुमारमत. २. वैराला. ३. मोक्षें. ४. हे रामा. ५. तृप्त झाला. ६. सर्वसाधूंस. ७. हे रघुकुलोत्पन्ना. ८. स्त्रिया. ९. नारद. १०. मोक्षेच्छु. ११. स्त्री. (सीता.) १२. विश्वात्म्यास. १३. इच्छेला. १४. हा सर्व कथाभाग सद्गतिसाव्या सर्गापुढच्या पांच प्रक्षिप्त सर्गात आहे. १५. अगस्त्यनामकब्राह्मणश्रेष्ठ. १६. श्रीमान् जनकादिराजे. १७. राम. १८. स्वभक्तिरूप अविनाशिसुख. १९. मारुति. २०. आज्ञा. २१. बहुधा. २२. स्वपदकमलें. २३. स्मरण करण्याचें. २४. माझ्याजवळ. २५. तुझ्या कथारूप अमृतरस. (स० ४० श्लो० १७–१८ पहा.)

हें **पवनकुमा रा** तें मुक्तामालासमेत[1] दे हातें; ।
मारुति जातां आलें बाष्प[2] प्रभुतें मनुष्यदेहातें. ॥ २२७

पुष्पक धैनर[3] **म** णानें पाठविलें तें मनुष्यवचनांहीं ।
येवुनि **रा**मासि म्हणे, 'तुजविण लोकीं शैरण्य[4] मज नाहीं. २२८

द्रविणेंद्रानें[5] म **ज** ला आज्ञा केली तुलाचि वाहाया; ।
यास्तव आलों **रा**मा ! तुझिया पायांसमीप राहाया.' ॥ २२९

नृपति म्हणे, 'तूं **य** क्षपनिकट[6] यथापूर्व जा वैसायाला[7]; ।
कार्यांतरीं स्वचित्तीं आठवितां, येत जा बसायाला.' ॥ २३०

रघुसत्तमभु[8] **ज** विक्रमपरिहृतरक्षोमहाभर क्षोणी[9] ।
द्रोणी[10] सुखामृताची झाली, प्राणी नसे श्रमी[11] कोणी. ॥ २३१

प्रभु अयुतहा[12] **य** नें तो राज्य करी भूमिनंदिनीसहित[13]; ।
महितचरित्रें[14] त्याच्या लाभे अत्यंत मेदिनीस[15] हित. ॥ २३२

गर्भवती मग **रा** ज्ञी[16] जाली तीतें पुसे तिचा कांत[17]; ।
'दोहद[18] कैसा सुंदरि ! सांग तुझें काय इच्छितें स्वांत[19] ?' ॥ २३३

पतिवाक्य वसु **म** तीची कन्या ऐके असें यथार्थ यदा[20] ।
'तापसवनावलोकनदोहद[21] झाला' म्हणे 'मनःप्रियदा[22]!' ॥ २३४

तेव्हां भूकन्येला[23] **श्री** राम म्हणे, 'प्रियोत्तमे ! जावें; ।
परि तव विरहदिनातें[24] मी युगसम मानसांत मेजावें.' ॥ २३५

**र**घुनाथ अर्ध **रा** त्रीं ऐसें बोलोनियां करी शयन; ।
निशिचरमभागसमयीं[25] उठला मग शोणनीररुणनयन[26]. ॥ २३६

**रा**माप्रति त्यास **म** यीं वंदन करिती करद्वयें चार[27]; ।
त्याला म्हणे रघूद्वह[28], 'कैसा आहे जनीं समाचार[29] ?' ॥ २३७

'दशमुखहृत[30] **ज** नकसुताग्रहणास्तव निंदिती तुला लोक'; ।
ऐसें चारमुखानें[31], ऐकुनि **र**घुनाथ पावला शोक. ॥ २३८

---

१. मोत्यांच्या मालेसह. २. नेत्रोदक. ३. कुबेर. ४. रक्षक. ५. कुबेरानें. ६. कुबेरासमीप. ७. राहण्यास. ८. रामबाहुबलें नष्टराक्षसरूप भार ज्याचा असी. ९. पृथ्वी. १०. पात्रविशेष. (द्रोण.) ११. दुःखी. १२. दहाहजार वर्षे. १३. सीतेसह. १४. पुण्यचरित्रें. १५. पृथ्वीस. १६. सीता. १७. पति. १८. डोहाळा. १९. मन. २०. जेव्हां. २१ ऋषिस्थानावलोकनेच्छा. २२. मनोरथपूरका! (रामा!) २३. सीतेला. २४. वियोगयुक्त दिवसांतें. २५. पहांटेस. २६. आरक्त कमलनेत्र. (शोण=आरक्त, नीररुह्=कमल.) २७. बातमीदार. (हेर.) २८. राम. २९. वार्ता, खबर. ३०. रावणानें चोरून नेलेल्या सीतेचा स्वीकार केला म्हणून. ३१. हेरमुखें.

चारजनोक्तापयश[1] स्वमुखानें सर्व बांधवास वदे; ।
जनकसुतात्यागाज्ञा[2] सौमित्रीतें[3] त्रैलोकवासव[4] दे. ॥ २३९

वैदेहीला कांहीं राघवसंकल्प[5] हा नसे कळला; ।
द्वारीं रथासि पाहुनि 'रामकृपांभोद[6] तो' म्हणे 'वळला.' २४०

रघुनाथाची रमणी[7] सौमित्रि सुमंत्र[8] पाहतां हर्षे, ।
आनंदच्छद्मानें[9] लक्ष्मण बाष्पोदकें[10] तदा वर्षे. ॥ २४१

अत्यंतोत्सुक्यानें[11] जनकसुता बैसतां रथावर ती ।
लक्ष्मण सुमंत्र तेव्हां धैर्यानें बाष्पपूर थांबरती[12]. ॥ २४२

गुर्वाज्ञाभंगभयत्रस्तसुमित्रासुतें[13] धराकन्या[14] ।
वाल्मिक्याश्रमविपिनीं[15] नेवुनियां टाकिली जशी वन्या[16]. २४३

'अपवादभयें[17] जननी ! त्यजिलें तुजला जगन्निवासानें[18]' ।
ऐसें सांगुनि लक्ष्मण रडतां झांकी मुखासि वासानें[19]. २४४

भूतनयांघ्रिद्वय[20] तो वंदुनि जातां पुरासि फार रडे; ।
नेली राजाज्ञेनें तनु[21] परि मन तें न सर्वथा मुरडे. ॥ २४५

रामानुज नगराला येतां मार्गीं रडे जसा तोकें[22]; ।
तो कवि[23] सुमंत्र सांगे इतिहासातें हरावया शोक. ॥ २४६

'दिग्रथ[24] एकासमयीं गेला होता पुरोहितावासा[25]; ।
तेथें आला होता मुनिनाथ ज्ञानसिंधु[26] दुर्वासा[27]. ॥ २४७

कौसल्येच्या कांतें[28]श्री दुर्वासा तपोनिधान मुनी ।
रामाच्या भाव्यर्थश्रवणार्थ[29] प्रार्थिला शिरें नमुनी. ॥ २४८

तेव्हां भूपकुमारा[30]! मुनि वदला तेंच सांगतों तूतें; ।
ऐकें स्वस्थस्वांतें[31], राघवसीतावियोगहेतूतें[32]. ॥ २४९

---

१. हेरांनीं सांगितलेली अपकीर्ति. २. सीतात्यागाज्ञा. ३. लक्ष्मणातें. ४. त्रैलोक्यपति. (राम.) ५. राममनोरथ. ६. रामकृपामेघ. ७. स्त्री. ८. सुमंत्रसारथि. ९. आनंदमिषें. १०. नेत्रोदकें. ११. अतिउत्कंठतेनें. १२. आटोपिती. १३. रामाज्ञाभंगभीतलक्ष्मणें. १४. सीता. १५. वाल्मीकिच्या आश्रमसंबंधीं अरण्यांत. १६. रानट. १७. लोकापवादभयें. १८. जगताचा जो निवास (आश्रयस्थान) त्यानें. (रामानें.) १९. वस्त्रें. २०. सीता. चरणद्वय. २१. शरीर. २२. मूल. २३. सुज्ञ. २४. दशरथ. २५. वसिष्ठाश्रमा. २६. ज्ञानसागर. २७. अत्रिपुत्र. (सर्ग ५०–५१ पहा.) २८. दशरथें. २९. भविष्यश्रवणार्थ. ३०. हे लक्ष्मणा! ३१. स्वस्थचित्तें. ३२. रामचंद्र व सीता यांच्या वियोगाचें कारण यातें.

हरिसंत्रस्त स **म** स्तहि दैत्य **भृ**गुस्त्रीस पावले शरण; ।
म्हणती, 'माते! रक्षीं. **वि**ष्णुकरें सर्व पावतों मरण.॥२५०

परिसुनि हें द्वि **ज** पत्नी दे जेव्हां अभय दैत्यलोकाला; ।
तेव्हां हरिनें वधिली, तैं **भृ**गु पावे सकोपशोकाला.२५१

धरणीसुरना **य** क **भृ**गु **वि**ष्णूसि म्हणे, 'ममांगनाघातें ।
स्त्रीविरहानें तूंही पावें, अजि तीव्र दुःखसंघातें.' ॥ २५२

तो **श्री**रमण पं **रा** त्पर झाला तव पुत्र **रा**म हा राया! ।
पावेल स्त्रीविरह द्विजशापाच्या फलासि भोगाया. ॥ २५३

**दु**र्वासा विप्रोक्त **म** वदला जें तेंचि जाहलें साचें; ।
हर्षे चरित्र पाहें मानुषतनुचें जगन्निवासाचें. ॥ २५४

घेवुनियां मनु **ज** तनू संसार असार हेंचि कळवाया ।
सृष्टिस्थितिलयकर्ता वर्ततसे भक्तमोह पळवाया.' ॥ २५५

मानसशोकक्ष **य** पटु इतिहास असा **सु**मंत्र सूत कथी; ।
तच्छ्रवणानें झाला कांहींसा खेदहीन **दा**शरथी. ॥ २५६

तदुपरि मनु **ज** वराच्या **कौ**सल्यासूनुच्या पदीं नमना ।
करुनि **सु**मित्रानंदन सांगे 'त्यजिली' म्हणूनि दीनमना.२५७

ऐकुनि शोकोद **य** बहु **सी**तेचे ते विलाप पृथु कानीं ।
**वा**ल्मिकि नाम मुनीला हें कथिलें वर्तमान पृथुकांनीं.२५८

मग तो धरासु **रा** धिप **वा**ल्मिकि मुतपोनिधान पूतमती ।
**सी**तेला अवलोकुनि मानी निजपुण्यसिद्धि मूर्तिमती. २५९

**ज**नकासम स **म** जावुनि आणी पुण्याश्रमासि वसतीतें ।
नवदलशालेमध्यें म्हणे, 'हराया श्रमासि वस' तीतें.॥२६०

**सा**केतीं बंधूतें **श्री** **रा**म म्हणे, 'प्रजापरित्राणीं ।
जो अप्रमत्त धर्मीं, तो लोकीं शर्म पावतो प्राणी. ॥ २६१

---

१. विष्णूपासून भीत. २. स्वपुरोहितजननीला. ३. विष्णूनें. ४. क्रोधयुक्त शोकाला. ५. ब्राह्मणश्रेष्ठ. ६. माझ्या स्त्रीच्या नाशें. ७. दुःखसमूहातें.(स० ५१ श्लो० १४–१५पहा.)८. परमेश्वर. ९. मनुष्यरूपी जो त्याचें. १०. भक्तांचें अज्ञान. ११. चित्तशोक हरण करण्याविषयीं कुशल असा. १२. सारथि. १३. लक्ष्मण. १४. रामाच्या. १५. दीनचित्त. १६. मोठे. १७. मुलांनीं. १८. ब्राह्मणश्रेष्ठ. १९. अतितपस्वी. २०. पवित्रबुद्धि. २१. नूतनपर्णशालेंत. २२. अयोध्येंत. २३. प्रजारक्षणीं. २४. सावध. २५. सुख. हें गाळ्यें बोधपर सुभाषित आहे.

पहिला [1]नृगाख्य **रा** जा होता, जो [2]दानशौंड जनमान्य; ।
ऐसा भूपति कोणी पूर्वीं [3]सूर्यान्वयांत न [4]वदान्य. ॥ २६२

[5]गोदानें अत्युत्त **म** दिधलीं ज्याणें असंख्य त्रिप्रकरीं; ।
जो लाजविता झाला [6]तारापतिला [7]यशश्छविप्रकरीं. ॥ २६३

प्रथम दिली द्वि **ज** हस्तीं ते [8]सुरभी ये पळोनि कळपाला; ।
नेणुनि परासि देतां, शापी [9]भूदेव भूमिपाळाला. ॥ २६४

शापानें नरना **य** क झाला तो घोररूप [10]कृकलास; ।
म्हणउनि सावध वर्ता, ऐसें कथितो हितार्थ सकलांस. २६५

'गुरुसुरविप्रा **रा** धन करितां बहु सावधान [11]आचरणें,' ।
ऐसें कथिलें **रा**में हरिला जनदोष ज्याचिया चरणें. ॥ २६६

त्यावरि एका स **म** यीं [12]भग्नशिरा [13]सारमेय **रा**मातें ।
येवुनि म्हणे, 'यतीनें दोषावांचूनि दंडिलें मातें.' ॥ २६७

धाडुनि सेवक **ज** न तो संन्यासी आणिला कृपाळानें; ।
पुशिलें वृत्त समस्त [14]प्राणिप्राणक्षमें [15]नृपाळानें. ॥ २६८

'मार्गांत सारमे **य** स्पर्शेल म्हणोनि वारिला परता; ।
[16]परं तोडिल्याविणें हा, दूर न झाला विभो! [17]अपापरता! ॥

यास्तव **रा**मा! म **ज** ला आला कोप क्षणांत [18]उद्दंड; ।
क्षुधितें भिक्षान्नधरें केला [19]दंडें करूनियां [20]दंड. ॥ २७०

[21]शांतिक्षमादया **य** मनियमें [22]यतिनें सदैव वागावें; ।
परि दैवें [23]अघ घडलें, तें तुज **रा**मा! यथार्थ सांगावें. २७१

शासन मला क **रा** या धर्मज्ञा! योग्यता तुला आहे.' ।
ऐसें तो यति वदतां, [24]कुक्कुरवदनाकडे प्रभू पाहे. ॥ २७२

तेव्हां तो श्वा क्रोधें **म** नुजेंद्राला म्हणे, 'अशा यतिला ।
सांगावा धर्मज्ञा! राया! धर्माधिकार दुर्मतिला.' ॥ २७३

---

१. नृगनामक. (उत्तरकांड सर्ग ५३–५४ पहा.) २. दात्यांमध्यें श्रेष्ठ. ३. सूर्यवंशीं. ४. उदार. ५. गाईचीं दानें. ६. चंद्राला. ७. कीर्तिकांतिसमूहीं. ८. गाय. ९. ब्राह्मण. १०. सरडा. ११. आचरण करा. १२. डोकें फुटलेला. १३. कुत्रा. १४. प्राण्यांना प्राण देण्यास समर्थ अशा (रामानें.) १५. रामें. १६. परंतु. १७. हे पापरहिता (रामा.) १८. पुष्कळ. १९. काठीनें. २०. शासन. २१. शांति, सहन करणें, दीनावर दया, इंद्रियनिग्रह या नियमांहीं. २२. संन्याशानें. २३. पाप. २४. कुत्र्याच्या मुखाकडे.

हें परिसुनियां **श्री** म **द्राम** म्हणे, 'दंड हा कसा यास? ।
वस्त्रें वेष्टा म्हणसी जो योग्यचि रज्जुनें[1] कसायास.[2]' ॥ २७४

भषण[3] म्हणे, 'श्री **रा** मा! होता धर्माधिकार मजला हो; ।
येणें श्वयोनि[4] वडली, अविवेकी हा असीच गति लाहो.' ॥

हा सारमेय[5] सं **म** त दंड यतीतें[6] रघूत्तमें केला; ।
त्यावरि गृध्रहृतालय[7] घूकहि[8] रघुनायकाकडे गेला.[9] ॥ २७६

गृध्र म्हणे. 'मनु **ज** पते! मद्देहातें उलूक हा हरितो.' ।
घूक म्हणे, 'माझें गृह. अन्यायचि गृध्र[10] सर्वथा करितो. २७७

ऐसें ऐकुनि [11]नें **य** पटु **राम** म्हणे, 'लागला कधीं दावा? ।
केव्हांपासुनि तुमचा गेहव्यवहार[12] तो निवेदावा.' ॥ २७८

गृध्र म्हणे, '**रघु रा** या! झाली मनुजावृता[13] जधीं अवनी[14]; ।
तेव्हांपासुनि आहें भवनीं[15], आतां समर्थ तूं अवनीं[16].'॥२७९

'जेव्हां क्षिति[14] वृक्ष **म** यी तेव्हां पासूनि नांदलों भवनीं; ।
भवनिर्दलना[17]! रक्षीं, घूक म्हणे, 'तूं नयज्ञ या भुवनीं.' २८०

**राम** म्हणे, 'मनु **ज** मग, प्रथम द्रुम गृध्र, चोर घूक खरा.' ।
तेव्हां कविंनीं स्तविली **कौ**सल्यासूनुची[18] मति प्रखरा[19].॥२८१

करुनि परांल[20] **य** हृतिमिष रघुनाथाच्या करांबुजस्पर्शें ।
**गौ**तमशापापासुनि सुटला तो ब्रह्मदत्त[21] नृप हर्षें. ॥ २८२

यमुनावासी[22] द्वि **ज** जन आला **रा**मासि दुःख सांगाया; ।
पूजुनि त्यासि म्हणे विभु, 'कळवा जी! कोण हेतु भागाया.?'

'मुनि म्हणती भ **य** हरिलें सर्वांचें तूं, परंतु याकाळीं ।
मधुनंदन[23] लवणासुर[24] मारुनि, **रा**मा! द्विजातिजन[25] पाळीं.॥

---

१. दोरीनें. २. बांधण्यास. ३. कुत्रा. ४. कुत्र्याचें जन्म. ५. कुत्र्यास मान्य असा. ६. संन्याशातें. ७. गीधें हरिलें गृह ज्यांच असा. ८. घुबडहि. ९. सारमेयाख्यान आणि गृध्रोलूकाख्यान हीं ५९ व्या सर्गापुढील तीन प्रक्षिप्त सर्गांत आहेत. १०. गीध. ११. नीतिकुशल. १२. गृहांत राहणें. १३. मनुष्यव्याप्त. १४. पृथ्वी. १५. गृहीं. १६. रक्षणीं. १७. संसारनाशका हे रामा. १८. रामाची. १९. तीव्र. २०. परगृहहरणनिमित्त. २१. कालगौतम मुनीच्या शापानें गृध्रयोनि पावलेला एक प्राचीन राजा. (प्रक्षिप्त सर्ग ३ श्लो० ५६) २२. यमुनातीरस्थ. (स० ६०–६३) २३. मधुपुत्र. २४. हा मधुदैत्यापासून कुंभीनसीस झालेला पुत्र. २५. ब्राह्मण.

**मधुनामकासु** **रा** ला पूर्वी जो अर्पिला **शिवें** शूल[1]; ।
तत्सामर्थ्यें झाला **लवणासुर** तो जगच्छिरःशूल[2]. ॥ २८५

राजेंद्रा! ज्याकाळीं **म** धुपुत्राच्या करीं असे शूळ ।
तेव्हां केवळ दुर्जय[3] तद्वर्जित[4] काळ मृत्युचें मूळ. ॥ २८६

भक्त्युत्कर्षप्रीतें[5] **श्री** कंठें[6] अर्पिला महाशूल[7]; ।
तद्वीर्यें **लवणासुर** दहन[8] त्रिदशादि[9] हे जसा तूल[10]. ॥ २८७

**लवणासुर** मा **रा** या कालचि[11] तो, जेधवां नसे शूल ।
वधितां त्यातें, आहे आशिर्वादें तुलाचि अनुकूल. ॥ २८८

अतिसत्वर श **म** वावा मधुवनवासी[12] महाबली लवण[13], ।
वीरांतरासि हा खल दुःखद, जैसें क्षतांतरीं[14] लवण[15]. ॥ २८९

मृगमहिषद्वि **ज** मांसीं घेतो 'सद्विप्ररक्त[16] कालवण; ।
काल[17] वनस्थांचा हा, मारावा लोकनायका[18]! लवण[13].' ॥ २९०

त्या कालीं **रघुना** **य** क वंदुनियां तेधवांचि विप्राज्ञा; ।
**शत्रुघ्ना**सि म्हणे, 'जा **लवण**वधा, लोक वांचविं प्राज्ञा! २९१

मधुकैटभ[19] मा **रा** या हा शर **ना**रायणें स्वयें केला; ।
याणें **लवणा**शि वधीं, पाव जयाशीं, धरीं न शंकेला.' ॥ २९२

आज्ञा घेवुनियां **म** ग गेला **शत्रुघ्न** त्या मुनीसहित; ।
मार्गीं जातां भेटे **वा**ल्मीकिनिवास[20] जो जगन्महित[21]. ॥ २९३

**भरताच्या** अनु[22] **ज** निला **वा**ल्मीकि स्वाश्रमांत दे वसती; ।
प्रसवे सुतद्वयातें, त्या रात्रीं ते मनुष्यदेवसती[23]. ॥ २९४

**वाल्मीकिनामधे** **य** ब्राह्मण हें आयके महाभाग; ।
तेव्हां मध्यें छेदुनि कुशमुष्टीचे[24] करी द्विधा[25] भाग. ॥ २९५

---

१. हा रुद्रदत्त शूल मधूनें मरणसमयीं लवणासुरास दिला. २. लोकमस्तकपीडक. ३. जिंकिण्यास कठिण. ४. शूलरहित. ५. अतिभक्तितुष्टें. ६. शिवें. ७. मधूनें उग्र तप केलें, तेव्हां शिवानें प्रसन्न होऊन हा शूळ त्यास दिला. ८. अग्नि. ९. देवादि. १०. कापुस. ११. समय. १२. मधुवन हें यमुनातीरीं असून येथेंच मधूनें तप केलें. १३. लवणासुर. १४. व्रणांत. १५. मीठ. १६. सुब्राह्मणरक्त. १७. मृत्यु. १८. हे रामा. १९. दैत्यविशेष. विष्णूच्या कर्णमलापासून उत्पन्न झालेले दोन राक्षस. हे विष्णूसच भय दाखवूं लागले. तेव्हां त्यानें यांच्यापासून 'तुम्ही मला वध्य असावें' असा वर मागून घेऊन पुढें त्यांस मारिलें. २०. वाल्मीकिचा आश्रम. २१. जगीं विख्यात. २२. शत्रुघ्ना. २३. सीता. २४. दर्भमुष्टीचे. २५. दोन.

**क्षि**तिजेचे तनु[1] **ज** तदा जावुनियां प्रोक्षिले[2] स्वकीय करें ।
बालग्रहोपशांतिप्रज्ञाबलकीर्तिशांतिशातकरें[3]. ॥ २९६

जो प्रथम तन **य** मुनिनें मंत्रजलें प्रोक्षिला कुशाग्रांहीं[4] ।
तो **कुश**, कुशमूलोक्षित[5] **लव** जाणावें असें समग्रांहीं. २९७

हें परिसुनियां **रा** त्रौ पावे **श**त्रुघ्न हर्ष अतिमात्र[6]; ।
पात्र सुखाचा झाला, सात्विकभावाष्टकैकहृतगात्र[7]. ॥ २९८

**वा**ल्मीकिपादक **म** ळें प्रातःकाळीं नमूनि **य**मुनेला, ।
गेला **श**त्रुघ्न बळी, जेथें **लव**णें क्षयासि जन नेला. ॥ २९९

सारी सेना तेव्हां **श्री** **भा**नुसुतेचिया[8] तटीं स्थापी; ।
**रा**घव[9] विप्रांसि म्हणे, 'मारावा केधवां महापापी?' ॥ ३००

मुनि म्हणती, 'वी **रा**! तूं आधीं धाडोनियां भले चार[10], ।
शूलरहित**लव**णाचा या स्थानीं आणवीं समाचार. ॥ ३०१

मग जावुनियां **म** दीं, नाहींतरि यासि जिंकितां धाता[11], ।
जय पावेना, याणें पूर्वीं वधिला समर्थ **मां**धाता[12].' ॥ ३०२

त्या **श**त्रुघ्नें द्विज **ज** नवचनें जे शीघ्र धाडिले चार, ।
ते कथिती 'शूलरहित गेला मृगयार्थ[13]' हा समाचार. ॥ ३०३

---

१. सीतेचे पुत्र. २. त्यांच्यावर उदक सेचन केलें. ३. बालग्रहशांति, बुद्धि, बल, कीर्ति, शांति, सुख करणारा. ('करें' या शब्दाचें विशेषण.) बालग्रह म्ह० मुलाला उपद्रव करणारे ग्रह; या ग्रहांत स्कंदग्रह मोठा प्रबल असून शकुनी, रेवती, पूतना, अन्धपूतना इत्यादि त्याचा परिवार होय असें वर्णन आढळतें. बालग्रहांचीं नांवें 'भावप्रकाश'नामक वैद्यकग्रंथांत आहेत तीं—'स्कंदग्रहस्तु प्रथमः स्कंदापस्मार एव च । शकुनी रेवती चैव पूतना गन्धपूतना ॥ पूतना शीतपूर्वा च तथैव मुखमण्डिका । पञ्चमी नैगमेयश्च प्रोक्ता बालग्रहा अमी ॥ बालग्रहा अनाचारात्पीडयन्ति शिशुं यतः । तस्मात्तदुपसर्गेभ्यो रक्षेद्बालं प्रयत्नतः ॥'.(शात=सुख, आनंद.) ४. दर्भाच्या अग्रांनीं. ५. दर्भाच्या मूळांनीं सिंचन केलेला. ६. अतिशय. ७. सात्विक आठ भावांपैकीं प्रत्येकानें ज्याचें एक एक गात्र हरण केलें असा. (शत्रुघ्न.) स्तंभ, प्रलय, रोमांच, स्वेद, वैवर्ण्य, अश्रुपात, वेपथु आणि वैस्वर्य हे सात्विक आठ भाव. यांनीं शत्रुघ्नाचीं आठ अंगें व्यापून टाकिलीं. असा भाव. ८. यमुनेच्या. ९. शत्रुघ्न. १०. दूत. ११. ब्रह्मा. १२. हा मांधाता राजा सुरलोकविजयार्थ स्वर्गास गेला. तेव्हां इंद्रानें 'लवणासुरास जिंकून मग मजकडे ये' असें त्यास सांगितलें. त्यावरून हा परत येऊन ससैन्य लवणासुरावर चालून गेला. त्यानें रुद्रदत्त शूल टाकतांच, मांधाता याचें सैन्य दग्ध झालें व तोही तत्काळ मरण पावला. १३. शिकारीस.

त्यासमयीं नारा **य** णनिर्मितशरचाप घेवुनि क्षिप्र[1], ।
जातां लवणाघाता[2] **शत्रुघ्नें** वंदिले शिरीं विप्र. ॥ ३०४

असिकवचश[3] **रा** सनधर गेला **शत्रुघ्न** मधुपुरद्वारा[4], ।
वारायासि रिपूला[5], विपुलाभ्रगणाशि[6] ज्यापरी वारा.॥ ३०५

मृगया करुनि **म** हाबल **लवण** स्वपुरासमीप जों आला; ।
याला पाहुनि पसरी आ लालसचित्त[7] भक्षणीं झाला.३०६

करकर तो द्वि[8] **ज** चावी फिरवी तप्तायसप्रभें[9] बुबळें, ।
इच्छी सेवायातें भरतानुजकंठशोणितांबु[10] बळें. ॥ ३०७

संध्यासमयींतो[11] **य** द जैसा **म**धुपुत्र तो तसा गमला; ।
शत्रुघ्नासि म्हणे, 'कां आलासि मरावयासि, सांग मला.' ॥

प्रज्वलितधनं[12] **ज** यनिजहेतिगणाकीर्ण जापरी कुंड, ।
तैसें **म**धुसुत पसरी **शत्रुघ्ना**ला गिळावया तुंडं[13]. ॥ ३०९

**शत्रुघ्नें** खरसा **य** क सोडुनि वर्मींच ताडितां **लवण** ।
**सौ**मित्रिला[14] वधाया तो मोडी आम्रशालतालवन. ॥ ३१०

भूरुहवृंदध[15] **रा** धरशिखरांहीं वर्षला, परंतु खरें[16] ।
**र**घुनाथदत्तबाणें मारुनि केलें स्वकीय नाम खरें. ॥ ३११

त्या **म**धुवनांत **म** थुरा वसवुनि बहु वित्त लोक रक्षुनि घे; ।
द्वादश वर्षांनंतर विभुला[17] वंदावया ससैन्य निघे. ॥ ३१२

**सा**केताला[18] येतां, **श्री वा**ल्मिक्याश्रमीं करी वास[19]; ।
पूजी नानारत्नें त्या निर्लोभास भूमिदेवास[20]. ॥ ३१३

**सी**तेच्या पुत्रांहीं **रा** त्रौ वीणास्वरादियोगानें[21] ।
**सौ**मित्रिचित्त[22] हरिलें मुनिकृत**रा**मायणाचिया गानें[23].॥३१४

**वै**देहीपदक[24] **म** लें अवलोकावीं असें मनीं होतें; ।
परि **रा**मलोकभीतें[25] केलें नाहींच **रा**घवें[26] हो! तें. ॥ ३१५

---

१. शीघ्र. २. लवणासुर मारण्यास. ३. खड्गकवचधनुर्धारी. ४. नगरवेशींत. ५. शत्रूला. ६. बहुमेघसमूहासीं. ७. लुब्धचित्त. ८ दंत. ९. तापलेल्या लोखंडाप्रमाणें कांति ज्यांची अशीं. १०. शत्रुघ्नाच्या कंठसंबंधी रक्तरूप उदक. ११. मेघ. १२. प्रदीप्ताग्निज्वाळासमूह व्याप्त.१३. तोंड. १४ शत्रुघ्नाला. १५. वृक्षपर्वतशिखरांहीं. १६. तीक्ष्णें. ('बाण'शब्दाचें विशेषण.) १७. रामाला. १८. अयोध्येला. १९ वसती. २०. ब्राह्मणास. (वाल्मिकिमुनीला.) २१. वीणादियुक्तस्वरानें. २२. शत्रुघ्नाचें चित्त. २३. गायनें. २४. सीताचरणकमलें. २५. रामाला व लोकांला भ्याला असा, ('राघवें' या शब्दाचें विशेषण.) २६. शत्रुघ्नें.

[1]**प्रा**चेतसासि [2]अं **ज** लि जोडुनि तेथें क्रमोनियां राती ।
**सा**केतीं **रा**माला वंदी जावूनि **म**धुसुताराती. ॥ ३१६

तेथें द्विजतन **य** मरे, तेव्हां त्याचा पिता करी शोक; ।
तो [3]कैष्टे, दुःखानें ठेवी **रा**मासमीप मृत [4]तोकें. ॥ ३१७

विप्र म्हणे, 'रघु **रा** या ! यामागें बालमृत्यु पितरांहीं, ।
नाहीं विलोकिला, परि तव राज्यें देखिजेल [5]इतरांहीं.३१८

आधीं **वै**वस्वत **म** नु, अंतीं **अ**जपुत्र [6]**पं**क्तिरथ झाला; ।
तद्राज्याच्या ठायीं दुर्लभ तें येथ लभ्य [7]मनुजाला. ॥ ३१९

तुज सम नृप [8]**ज** गतीवर असतां, **रा**मा ! प्रजेसि काय उणें ? ।
स्वगुणें [9]मत्तुल्यजन[10]त्राणचि करिजेल सर्वथा [11]निपुणें.॥ ३२०

संपादिलें बरें **य** श, धर्मात्मा धन्य तूं भला राजा ! ।
हे तव गुण गायाला, गेला स्वर्गासि बाळ हा माजा.३२१

हा! हा! वत्सा! मीतु **ज** एकाकी धाडिलें कसें [12]नाकीं? ।
परि येइल भेटाया यावरि बहु [13]लोकतोकसेना कीं. ॥३२२

तुझिया [14]राष्ट्रीं तो [15]**य** द नलगेत, सदैव [16]लोकबाष्पांहीं. ।
**रा**मा ! भिजोनि पृथ्वी शोभेल [17]विचित्रसस्यशष्पांहीं.॥३२३

[18]त्रिदशजनाच्या [19]**रा** मा **गौ**रीशापें [20]अलब्धवत्समुखा ।
[21]मनुजापत्यें धाडुनि **रा**मा ! देशी तयांसि पुत्रसुखा.॥३२४

स्वर्गीच्या सौख्यातें **म** र्त्यांपैल्यांसि दाविशी राया ! ।
चिरकाल सुखी राहें, आम्हावरि फारसी तुझी माया.'३२५

[22]गतपंचप्राण **श्री** [23]सुतशव ठेवूनियां नृपद्वारीं; ।
ब्राह्मण विलापबाणें ताडी [24]रघुवल्लभासि [25]जिव्हारीं. ॥ ३२६

समजावूनि [26]धं **रा** सुर नेत्रांतें आपुल्या करें पुशिलें; ।
**ना**रदमुनिला [27]द्विजसुतमृतिकारण **जा**नकीवरें [28]पुशिलें.३२७

तो [29]देवर्षि महा **म** ति विभुसि म्हणे, 'प्रश्न हा बरा केला; ।
[30]वर्णाचारविपर्यय झाला म्हणवूनि विप्रसुत मेला. ॥ ३२८

---

१. वाल्मीकीसी. २. दोन हात. ३. कष्ट पावे. ४. मूल. ५. अन्यांहीं. ६. दशरथ. ७. मनुष्या. ८. पृथ्वीवर. ९. माझा सदृश लोक. १०. रक्षण. ११. कुशलें. १२. स्वर्गी. १३. लोकांचीं मुलें. १४. राज्यांत. १५. मेघ. १६. लोकनेत्रोदकांहीं. १७. अनेक धान्यतृणें त्यांहीं. १८. देवांच्या. १९. स्त्रिया. २०. अप्राप्तपुत्रा. २१. मनुष्यमुलें. २२. गेली प्राणशोभा ज्याची असें. २३. पुत्रप्रेत. २४. रामासि. २५. मर्मी. २६. ब्राह्मण. २७. ब्राह्मणपुत्रमरणकारण. २८. विचारिलें. २९. नारद. ३०. जातिधर्माचें उल्लंघन.

धर्मज्ञा! **श्री**रामा! [1]**ज** गतीवर धर्म कर्म शोधावें; ।
केलें असेल शूद्रें तप तें वारावयासि तूं धावें. ॥ ३२९

हें [2]वर्णचतुष्ट **य** जरि निजधर्माचा करील [3]परिहार; ।
तरि परधर्माचारें, होतो ऐसाचि [4]लोकसंहार. ॥ ३३०

यास्तव शोधक **रा** वा, [5]स्वाचारभ्रष्ट लोक दंडावा; ।
डावा [6]चाष असो तुज, जातों द्विजशोक शीघ्र खंडावा.' ॥

ऐसें रघुसत्त **म** तो ऐकोनि सुरर्षिला करी नमनें; ।
स्मरतां **पु**ष्पक आलें, त्यावरि बैसोन जाय दीनमनें.॥३३२

**द**शरथसुत [1]**ज** गतीवर सर्वत्र करूनि शोध पापाचा ।
**द**क्षिणदिशेसि गेला, [7]करुणाघन सर्वलोकतापाचा.॥ ३३३

तों एक [8]नैकतो **य** जमंडित [9]कासार [10]सारसावास ।
अवलोकिला नृपाळें घ्राणें सेवूनि [11]सारसा वास. ॥ ३३४

तेथ अधोमुख [12]**ज** टिल [13]द्रुमशाखालंबमान **रा**मानें ।
धूमप्राशन करितां विलोकिला शूद्र [14]धर्मकामानें. ॥ ३३५

त्याप्रति [15]नामान्व **य** जों **रा**म पुसे, तों म्हणे, 'अहो स्वामी ! ।
मी **शं**[16]बूक [17]जघन्यज तप करितों [18]स्वर्गलोकसुखकामी.'३३६

[19]'एवंवचनवि **रा** मीं, त्यांचें धर्मैकपाळकें **रा**में ।
खड्गें करून मस्तक तत्काल च्छेदिलें [20]दयाधामें. ॥ ३३७

दंड करुनि [21]अ **म** रपुरीभोगेच्छाही करावया पूर्ण ।
देवांसह पाठविला शूद्र प्रभुनें दयाघनें [22]तूर्ण. ॥ ३३८

[23]धर्मत्राणानंदें [24]**श्री** कंठ**द्रु**हिण**श**क्रमुख देव ।
घे वर म्हणतां, मागे तंव तो [25]द्विजनंदनासि [26]नरदेव. ॥३३९

येतां [27]निजनग **रा** ला मार्गी पाहे [28]घटोद्भवावास; ।
तेथें जावुनि वंदी आनंदें **राम** [29]भूमिदेवास. ॥ ३४०

---

१. पृथ्वीवर. २. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र. ३. त्याग. ४. लोकांचा नाश. ५. आपल्या आचारापासून पतित. ६. पक्षिविशेष. ७. दयामेघ. ८. अनेककमलशोभित. ९. सरोवर. १०. सारस पक्ष्याचें वसतिस्थान. ११. श्रेष्ठसा. १२. जटाधारी तापस. १३. वृक्षांच्या खांदीस लोंबणारा. १४. धर्माची इच्छा ज्याला अशा रामानें. १५. नांव आणि वंश. १६. नामविशेष. १७. नीच. (शूद्र.) १८. स्वर्गसुखेच्छु. १९. असें बोलण्याच्या शेवटीं. २०. दयागृहें. (रामें.) २१. स्वर्गसुखेच्छाहि. २२. शीघ्र. २३. धर्मरक्षणानंदें. २४. शिवब्रह्मेंद्रादि. २५. ब्राह्मणपुत्रासि. २६. राम. २७. अयोध्येला. २८. अगस्त्याश्रम. २९. ब्राह्मणास.

रामातें विप्रोत्त[1] **म** तेंव्हां अर्पी अमोल्य[2] आभरणें; ।
मग येवुनि **सा**केतीं[3] **र**घुवीर करी सुखें प्रजाभरणें[4].॥ ३४१

सुप्तोत्थितसा[5] नि **ज** सुत उठतां द्विज तो अतिप्रमोदानें[6] ।
गेला गृहासि, विभुला तर्पुनि आशीर्धनाचिया[7] दानें. ३४२

मग राजसूय **य** ज्ञप्रारंभाची उठे स्पृहा[8] **रा**मीं; ।
**भ**रत म्हणे, 'इच्छीना सुततुल्यक्ष्मापतिप्रहारा[9] मी.॥ ३४३

जरि राजसूय **रा** जा! **रा**मा! करिशील तरि जनामाजी ।
पीडा घडेल यास्तव, न करावा हेच्च कामना माजी.' ३४४

कैकेयीतनय[10] **म** तें हें सारें मानिलें नयज्ञानें; ।
आरंभिलें तयावर, यजावया[11] वाजिमेधयज्ञानें[12]. ॥ ३४५

त्या यज्ञाच्या ठायीं **ज**[13] नकसुतापुत्रयुक्त आद्यकवी[14] ।
येवुनिया शिष्यातें, '**रा**मायण गात जा' असें शिकवी. ३४६

'हें मत्कृत[15] **रा**मा **य** ण ऐकुनि बोलेल **रा**म जरि गाया, ।
तरि गा. याचा कर्ता पुसतां, आज्ञा असेचि सांगाया. ३४७

पुसतां जननी[16] **ज** नक प्राज्ञांहीं सर्वथा न सांगावें; ।
**वा**ल्मीकिशिष्य म्हणवा, निस्पृह[17] हें **रा**मचरित रे! गावें.'॥

ऐसा तो मुनिना[18] **य** क वदतां, वंदोनियां तयासि, कृती[19] ।
**कु**श **ल**व दोघे गाती **सा**केतीं ते नवीन विप्रकृती.॥ ३४९

काव्यश्रवण क**रा** या नेले **रा**में करोनि सत्कृतिला[20]; ।
पंडितजनांत गाती **कु**श **ल**व बंधू यथोक्त सत्कृतिला[21]. ३५०

आकृतिवर्णस[22] **म** त्वें नृपचिन्हें **रा**म पुत्रसे समजे; ।
परि ते किमपि न वदती, गुरुवचनीं अचल पर्वतासम जे.।'

'नेणों[23] मातातात[24] **श्री** म **द्वा**ल्मीकिचे खरे छात्र[25]; ।
पात्र तदीय[26] दयेचें, न कळे' म्हणती 'अणीक तिळमात्र.'।

---

१. ब्राह्मणश्रेष्ठ. २. अमूल्य अलंकार. ३. अयोध्येंत. ४. प्रजा पोषणें. ५. निजून उठल्या सारखा. ६. बहुहर्षानें. ७. आशीर्वादद्रव्याच्या. ८. इच्छा. ९. पुत्रासारख्या राजांना प्रहार करणें १०. भरतमतें. ११. यज्ञ करावयास. १२. अश्वमेधयज्ञें. १३. सीतापुत्रासह. १४. वाल्मीकि १५. मी केलेलें. १६. मातापितर. १७. निरिच्छ. १८. कुशल. १९. वाल्मीकीची (काव्य) कृति (रामायण.) २०. सत्काराला. २१. सुकवितेला. २२. देहरूप तुल्यतेनें. २३. जाणत नाहीं २४. आईबाप. २५. शिष्य. २६. वाल्मीकिकृपेचें.

वदती धराव **रा** नें पुसतां ऐसेंचि ते; तदा राजा ।
भरतासि म्हणे, 'वत्सा! मुनिला आणावया उदारा! जा.'॥
मग मुनिसत्त **म** आणुनि, नमिलें युग विप्ररायपायांचें; ।
**रा**में विचारिलें कीं, 'ताता! कुलनाम काय पां यांचें?'॥
**प्रा**चेतसमुनि **ज** लरुहनयनातें **राम**चंद्रनामातें ।
हांसोनि म्हणे, 'वत्सा! आतां पुसतोसि काय गा! मातें?॥
त्वां त्यजिली जे प्र **थ** ता अपवादभयें वनांतरीं रामा ।
त्या साध्वीचे **कुशलव**नामक दोघे तनूज हे **रा**मा!॥ ३५६
सुतनिर्विशेष **रा** या! त्वत्सुत मी रक्षिले यथाशक्ती; ।
**सी**तेसह यांणींही माझी केली सदैव सद्भक्ती. ॥ ३५७
**ज**नकनृपोत्त **म** कन्या पंक्तिरथाची स्नुषा सती धन्या; ।
अन्यायेंचि वदान्या! वन्यासी टाकिली कशी मान्या? ३५८
दिव्यें दिलें कीं तु **ज** ला प्रत्यय चित्तांतरांत उपजाया; ।
जाया परि संत्यजिली, कोणी नव्हता समर्थ वारजाया? ३५९
अंतर्वत्नी पत्नी **य** शस्विनी धर्मचारिणी आर्या; ।
कार्याकार्यविचार न करितां, तूं टाकिली कशी भार्या? ३६०
विपिनीं रडतां **ज** नकक्षितिनाथसुता विलोकितां रागें।
शापित होतों, परि मज आत्मविवेकेंचि काढिलें मागें. ३६१
आतां दोघे तन **य** स्त्रीसह धर्मेंकरोनि सांभाळीं; ।
भोगांवांचुनि न सरे, जें असतें कर्म आपल्या भाळीं.' ३६२
**रा**म म्हणे, 'मुनि **रा** या! ते पूता हें मनीं समजलों कीं; ।
**सी**ता प्रत्यय दावू, नातरि हंसतील तीस मज लोकीं. ३६३
मी तव पदक **म** ळांची आज्ञा धरिली शिरावरी नमुनी; ।
पुनरपि दिव्यें करावें, मग **सी**तेला वरा वरीन मुनी!' ॥

---

१. रामें. २. वाल्मीकिला. ३. द्वंद्व. ४. वाल्मीकिचरणांचें. ५. कमलनेत्रातें. ६. शुद्धा. ७. स्त्री. ८. पुत्र. ९. पुत्रतुल्य. १०. दशरथाची. ११. सून. १२. हे दात्या. १३. वनचरीसी. १४. शपथ. १५. विश्वास. १६. निवाराया. १७. गर्भिणी. १८. योग्यायोग्यविचार. १९. वनीं. २०. जनकराजकन्या. २१. स्वविवेकबुद्धीनें. २२. भोगिल्याविणें. २३. कपाळीं. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. २४. हे वाल्मीकि. २५. पवित्र, निर्दोष. २६. श्रेष्ठा.

यापरि वदतां, **श्री** मुनि **सी**तेला आणवी सभेमाजी; ।
**रा**म म्हणे, 'दिव्य[1] करीं, पुरवीं वांछा रविप्रभे[2]! माजी.' ॥
ऐसें परिसुनि **रा**[3]ज्ञी मुनिवृंदाला[4] करूनियां नमनें; ।
पतिचरणांसि विलोकुनि आलिंगी भर्तृभक्त्यधीनमनें[5]. ३६६
जोडुनि करक **म** लातें, अवनिसुता[3] कांतभक्तिपरमा[6] ते ।
क्षितिला[7] म्हणे, 'मला घे उदरीं शुद्धा असेन तर मातें !' ॥
**सी**तेच्या वाक्यांतीं **ज** गतीला होय तत्क्षणीं विवर[8], ।
मूर्तिमती[9] भूदेवी येवुनि घे कन्यकेसि ऊरुवर[10]. ॥ ३६८
कांचनमणिम[11] **य** रविनिभ सिंहासन आणिलें तयावरती ।
**सी**ता बसोनि झाली भूम्युदरामाजि[12] गुप्त त्यावर ती. ३६९
त्या समयीं **रघु** **रा** जें धरिला भेदावया शर क्षितिला; ।
तेव्हां बोध करुनियां **र**घुनाथाला सुरेश[13] रक्षि तिला. ३७०
उत्तर भविष्य[14] **म** ग तो **ब्र**ह्माज्ञेकरुनि आयके सकल; ।
न पडे परंतु **सी**ताविरहाकुळ[15]**रा**ममानसास केलें[16]. ॥ ३७१
**र**घुपतिच्या ज्या **ज** ननी **कौ**सल्यादि त्रिविष्टपीं[17] मान्या ।
आयुष्यांतीं स्वर्गीं **द**शरथसंयोग पावल्या धन्या. ॥ ३७२
**भ**रतें कोटित्र[18] **य** मित काळास्त्रेंकरुनि दुष्ट गंधर्वे ।
सप्ताहोरात्रांतीं[19] **रा**मनिदेशेंचि[20] मारिले सर्व. ॥ ३७३
**त**क्षाभिध[21] जो नि[22] **ज** सुत **त**क्षशिला[23]ख्या पुरी तयाशि करी ।
**पु**ष्कल[24]नामसुतातें निर्मुनि दे **पु**ष्कलावती नगरी. ॥ ३७४
**रा**माज्ञेनें तन[25] **य** स्थापुनि नगरद्वयांत तो **भ**रत ।
**सा**केताला[26] आला, अग्रजपदपद्मभक्तिलोभरत[27]. ॥ ३७५

---

१. शपथ. २. सूर्यसमकांति हे सीते. ३. सीता. ४. ऋषिसमूहाला. ५. पतिभक्तिच्या स्वाधीन जें चित्त त्याणें. ६. पतिभक्ति श्रेष्ठ जीस अशी. ७. पृथ्वीला. ८. छिद्र. ९. प्रत्यक्ष. १०. मांडीवर. ११. स्वर्णरत्नखचित सूर्यतुल्य. १२. भूमीच्या पोटांत. १३. इंद्र. १४. पुढें होणारें. १५. सीतावियोगपीडित रामचित्तास. १६. उतार. १७. स्वर्गीं. १८. तीनकोटी. १९. सात दिवसांतीं. २०. रामाज्ञेनेंच. २१. तक्षनामक भरताचा मांडवीच्या ठायीं झालेला ज्येष्ठ पुत्र. २२. स्वपुत्र. २३. नगरीविशेष, गांधारदेशाची राजधानी. २४. हा भरताचा कनिष्ठ पुत्र. याची राजधानी गांधारदेशांत पुष्कलावती नगरी होती. २५. पुत्र. २६. अयोध्येला. २७. रादकमलभक्तितत्पर.

**लक्ष्मण** रघुवी **रा** च्या आज्ञेनें दोन सत्पुरी वसवी; ।
[1]**का**रुपथाभिधदेशीं, सुत **अंगद चंद्र**केतु हे वसवी.॥३७६
जो **चंद्र**केतु ना **म** क, त्याची ते **चंद्र**कांतकाख्य पुरी; ।
मग **अं**गदीयनगरीं **अं**गदही [2]तातदत्त राज्य करी. ॥ ३७७
तदुपरि आला **श्री** म **द्रा**माप्रति [3]विप्रवेषधर [4]**का**ल; ।
सत्कारुनियां त्यातें, 'काय' म्हणे 'वांछितोसि' [5]नरपाल. ॥
विप्र म्हणे, 'रघु **रा** या! [6]मंत्र करावा असा असे [7]काम; ।
ऐकेल तो वधावा, जरि होइल बंधु मित्र सुत [8]भाम.'॥३७९
रघुवीरें त्यास **म** यीं द्वारीं **सौ**मित्रि ठेविला [9]त्राणीं; ।
[10]वाणीश्रवणागस्कृत, [11]वध्य न कोणी असो' म्हणे 'प्राणी'.॥
मग एकांतीं द्वि **ज** तो **रा**मासि म्हणे, 'त्रिलोकजनका! मी ।
[12]**ब्र**ह्मनिदेशें आलों, **का**ल [13]त्वत्पादपद्मनतिकामी. ॥ ३८१
त्रिभुवन निर्भ **य** केलें, खल वधिले, धर्म रक्षिले सर्व; ।
[14]**श**र्वमनोधामा! तूं कल्पतरूचेहि नाशिले गर्व. ॥ ३८२
[15]संसृतिसिंधु त **रा** या भक्तांसि दिली [16]सुकीर्तिसत्तरणी; ।
[17]तरणि विभेदुनि गेले, जे झाले त्वच्छरें [18]निकृत्त रणीं.३८३
आतां तूं [19]सकला **म** र मुकुटमणे! ये स्वकीय धामातें; ।
ऐसें तुज विनवाया पाठविलें [20]**कं**जजें बुधा! मातें.'॥ ३८४
इत्यादि **काल कंजे**[21] ज वचनें जों लोकबंधुला प्रार्थी; ।
तों **दु**र्वासा आला, द्वारीं [22]**र**घुनाथदर्शनान्नार्थी. ॥ ३८५
[23]ज्वलितधनंज **य** वर्चा **दु**र्वासा वंदिला [24]**सु**मित्राजें; ।
अवलोकिलें मुनीचें तेज, न साहे क्षणार्ध **मि**त्रा जें.॥३८६

---

१. कारुपथनामक देशीं. चंद्रकेतूचें राज्य मल्लभूमिदेशांत आणि अंगदाचें कारुपथदेशीं असें वर्णन रामायणांत आढळतें. अंगदाची राजधानी अंगदी आणि या चंद्रकेतूची चंद्रकांता. (उत्तरकांड, सर्ग १०२ श्लो० ८९.) २. पितृदत्त. ३. विप्राचा वेष घेतलेला. मूळांत 'तापसरूपानें आलेला' असें आहे. ४. मृत्यु. ५. राम. ६. मसलत. ७. इच्छा. ८. मेहुणा. ९. रक्षणीं. १०. भाषणश्रवणापराधकर्ता. ११. वधास योग्य. १२. ब्रह्मदेवाज्ञेनें. १३. त्वत्पदकमलनमनेच्छु. १४. शिव मन गृह ज्याचें. (हे रामा.) १५. संसारसमुद्र. १६. उत्तम कीर्तिरूप उत्तम नौका. १७. सूर्य. १८. तुटलेले. १९. हे देवश्रेष्ठा. २०. ब्रह्मदेवें. २१. ब्रह्मवचनें. २२. रामदर्शन आणि अन्न इच्छिणारा. २३. प्रदीप्ताग्निकांति. २४. लक्ष्मणें.

'वद रे! तवाग्र[1] **ज** न्मा कोठें? मी पातलों पहायाला' ।
ऐसें पुसोनि घडवी रघुनाथाज्ञाविलोप[2] हा याला. ॥ ३८७

**सौ**मित्रि म्हणे, 'का **य** स्वामी! आज्ञा असे मला कळवा; ।
एकांतीं नृप आहे, अवकाश दिजे दयानिधे[3]! पळ वा[4]'. ३८८

ऐसें परिसुनि **रा** गें विप्र म्हणे, 'रे! भला भला अनया[5]! ।
दुर्वासा आला हें, जाणुनि मातें म्हणेल काय न या? ३८९

कोठेंही वारण[6] **म** ज नाहीं घडलें, परंतु तूं केलें; ।
भाग्यमदानें[7] तुमचें ज्ञान मला वाटतें लया[8] गेलें. ॥ ३९०

हरिहर इंद्र **श्री** द **ब्रह्मार्कयमेंदुवन्हिमुख** मातें[9] ।
प्रत्युद्गमनें[10] पूजिति, हें श्रुत नाहींच काय **रा**मातें? ॥ ३९१

तरणिकुळींचे[11] **रा** जे **द**शरथपर्यंत देखिले सारे; ।
परि हा दुर्नय कोठें नव्हता, तो जोडिलात कैसा रे? ॥ ३९२

मार्गीं गमनें श्र **म** लों, आलों भेटावया स्वयें, पर तो ।
**रा**घव दर्शन नेघे, म्हणतो, 'कां पातलां वृथा? परतो'. ॥ ३९३

आला **दु**र्वासा द्वि **ज**, हें सत्वर सांग जा, उभा आहें; ।
किंवा तापसक्रोपज्वलनाचें[12] वीर्य[13] **ल**क्ष्मणा! पाहें.' ॥ ३९४

ऐसें ऐकुनि नै[14] **य** पटु **सौ**मित्रि म्हणे मनीं, 'स्वनाश घडो; ।
परि मुनिकोपाग्निमुखीं शलभासम[15] सर्व लोक हा न पडो.' ३९५

वंदुनि कोपप[16] **रा** ला, गेला **रा**मासमीप सद्वृत्त[17] ।
द्वारींचें नृपतीचें सांगे अत्यंत शीघ्र तो वृत्त[18]. ॥ ३९६

कृतकार्य[19] **काल म** ग तो गेला **रा**माचिया पदीं नमुनी; ।
प्रभुनें समर्चिला[20] बहु **दु**र्वासा सत्तपोनदीन[21] मुनी. ॥ ३९७

विप्र म्हणे, 'मी तु **ज** ला आलों स्नेहेंकरोनि देखाया; ।
दशशत[22] वर्षें तपलों[23], क्षुधित असें दिव्य अन्न दे खाया.' ॥ ३९८

---

१. तुझा ज्येष्ठ बंधु. (राम.) २. रामाज्ञेचें उल्लंघन. ३. कृपासागरा. ४. अथवा. ५. नीतिहीन ६. अटकाव, प्रतिबंध. ७. संपत्तीच्या गर्वानें. ८. नाशा. ९. विष्णुशिवेंद्रकुबेरब्रह्मदेवसूर्ययमचंद्राग्न्यादि. १०. सामोरें येणें. ११. सूर्यवंशाचे. १२. तपस्वीक्रोधाग्निचें. १३. बल, सामर्थ्य १४. नीतिज्ञ. १५. पतंगतुल्य. १६. रागिट (दुर्वास) त्याला. १७. सुंदर वागणें ज्याचें. १८. वर्तमान १९. सफलेच्छ. २०. पूजिला. २१. सुतपःसमुद्र. २२. हजार वर्षें. २३. तप केलें.

भोजन करुनि **य**[1] थागत मुनि गेला [2]षड्रसाशनें [3]धाला; ।
मग **ल**क्ष्मणासि पाहुनि जालें बहु दुःख [4]सत्यसंधाला.॥ ३९९

वंदुनियां [5]अग्र **ज** पद **सौ**मित्रि म्हणे, 'रघूत्तमा ! राया ! ।
सत्यप्रतिज्ञ हो तूं; चिंता न करीं मनांत माराया.' ॥ ४००

होतो [6]विधिनें प्रि **य**[7] जो [8]वध्य, परित्याग तोचि वध याचा; ।
म्हणउनि **रा**में केला त्या काळीं त्याग बंधुरायाचा.॥ ४०१

मग **श**रयूती **रा** तें गेला वंदूनि **रा**मरायासी, ।
धरिला संकल्प मनीं **सौ**मित्रीनें खरा मरायासी. ॥ ४०२

करुनि [9]प्राणाया **म** त्यजिलें [10]शरयूतटांगणीं [11]काय; ।
[12]स्वर्गप्रयाण केलें, **श्री**[13]शांशाला अशक्य हें काय ? ॥ ४०३

लक्ष्मणविरहें **श्री** [14]मौन [15]स्वर्गमनाचा धरूनियां [16]काम ।
राज्य करावें, म्हणतां **भ**रतें वंदूनि वारिला **रा**म. ॥ ४०४

कुशनामकुमा **रा** तें **को**सलदेशांत अर्पिलें राज्य ।
[17]उत्तरकोसलविषयीं स्वामित्व **ल**वासही दिलें [18]प्राज्य.॥ ४०५

होतां [19]स्वर्गमन **म** ना करिती येऊनियां प्रजा नमना; ।
म्हणती, '[20]नाकीं गमना करितां आम्हांसि ने [21]विपच्छमना ! ४०६

'नेइन सकळ **ज** नाला' ऐसें सांगोनि तोषवि [22]प्रकृति; ।
तेव्हां जयजयशब्दें करिती अत्यंत घोषें[23] विप्र [24]कृती.॥ ४०७

करुनि विनिश्च **य** ऐसा **श**त्रुघ्नालाहि आणवायाला ।
पाठविले [25]चार भले, [26]जालें हें वृत्त जाणवायाला. ॥ ४०८

हें सकळहि [27]चा **रा** स्यें ऐकुनि **श**त्रुघ्न घाबरा जाला; ।
**रा**मवियोगें कांहीं वाटेना देह हा बरा जाला. ॥ ४०९

मग झडकर **म** थुरेचें [28]सुबाहुला राज्य अर्पिलें [29]तातें; ।
**वै**दिशनगरीं स्थापी [30]श्रुतसेनातें [31]कनिष्ठपोतातें. ॥ ४१०

---

१. आल्यामार्गें. २. सुभोजनें. ('मधुरो लवणस्तिक्तः कषायोऽम्लः कटुस्तथा' हे सहा रस आहेत. ३. तृप्त झाला. ४. सत्यप्रतिज्ञाला. (रामाला.) ५. रामपद. ६. दैवें. ७. इष्ट. (आप्त.) ८. वधयोग्य. ९. श्वास आणि प्रश्वास याचा गतिविच्छेद. १०. शरयूतीररूप आंगण्यांत. ११. शरीर. १२. स्वर्गगमन. १३. विष्णूच्या अंशाला. १४. राम. १५. स्वर्गगमनाचा. १६. इच्छा. १७. उत्तरकोसलदेशीं. १८. बहु. १९. स्वर्गगमनीं चित्त ज्याचें. २०. स्वर्गी. २१. संकटनिवारका. २२. प्रजा. २३. गर्जना. २४. कुशल. २५. दूत. २६. झालें. २७. दूतमुखें. २८. सुबाहुनामक पुत्र त्याला. २९. शत्रुघ्नें. ३०. नाम. 'शत्रुघाती' असें नांव रामायणांत आहे. (उत्तरकांड, सर्ग १०८ श्लोक १०.) ३१. कनिष्ठपुत्रातें.

स्थापूनि तनुज, **जे** वानें आला **रा**मासमीप बाळकसा ।
सोडावा सुज्ञांहीं संसार धरूनि विश्वपाळ कसा? । ४११

**सु**ग्रीवें सविन **य** तो **अं**गद अभिषेचिला गुणग्राम; ।
**राम** प्लवगजनासह **सा**केतीं वंदिला स्वविश्राम. ॥ ४१२

राक्षसजनरा **ज** हि तो आला तेथें **बि**भीषण त्वरित, ।
रघुपतिनामोच्चारणशब्दांहीं मूढलोक उद्धरित. ॥ ४१३

**राम** म्हणे,'निर्भ **य** तूं यावत् चंद्रार्कभूमदीयकथा ।
तावत् **बि**भीषणा! हें राज्य करावें धरूनि साधुपथा.॥४१४

संतत मला स्म **रा** वें, विषयांच्या सेवनासि विसरावें; ।
सज्जनपदां भजावें **बि**भीषणा! आपुल्या पुरा जावें.'॥४१५

हें सांगुनि सप्रे **म** प्रभुनें आलिंगुनी म्हणे, 'प्राज्ञा! ।
गा! मज उगा उगा गा, गांवा जा, जाहली तुला आज्ञा.'४१६

समजावुनियां **श्री** शें पाठविला राक्षसेंद्र **लं**केला; ।
मग आलिंगुनि **मा**रुति, धन्य प्रभुनें जगत्रयीं केला.॥४१७

'वातकुमारा! वी **रा**! जोंवर राहेल हे कथा माझी, ।
तुष्ट चिरंजीव असें, तावत्सद्भक्तिच्या पथांमाजी. ॥ ४१८

संतत मी तुज **म** ध्यें, तूंही बा! वर्ततोस मजमाजी; ।
नाहीं वियोग कांहीं, सत्योक्ति बरी मनीं समज माजी.' ॥

ऐसें वदतां अं **ज** लि जोडुनि 'विसरूं नको' म्हणे 'मातें;' ।
जातां श्री**रा**मातें **मा**रुति बहुधा करी प्रणामातें. ॥ ४२०

तों **जां**बवदाव्ह **य** ही ऋक्षाधिप सांत्विला परिष्वंगें; ।
संगें त्याच्या झालीं अमृतानें क्षाळिलीं तशीं अंगें. ॥४२१

'वीरा! तूं या लोकीं **रा** हें, चित्तांतरीं मला स्मरत; ।
**क**लिच्या प्रवेशसमयीं स्वपदीं होसील सर्वथा निरत.'॥४२२

---

१. पुत्र. २. वेगानें. ३. राम. ४. गुणगणसंपन्न. ५. वानरांसह. ६. आपल्य विश्रांतीचें स्थान. ७. रघुपतीच्या नामोच्चरणाच्या ध्वनींनीं. ८. उद्धार करित. ९. जोंपर्यंत. १०. चंद्र सूर्य पृथ्वी आणि माझी कथा. ११. तोंपर्यंत. १२. सुमार्गी. १३. नगरास. १४. रामें १५. बिभीषण. १६. मारुति. १७. मार्गी. १८. दोन हात. १९. अनेक वेळ. २०. नमनातें २१. जांबवन्नामा. २२. आस्वलपति. २३. आलिंगनें. २४. भिजविलीं. २५. चित्तांत २६. निमग्न, आसक्त.

अश्रुप्लुताक्ष[1] तो **म** ग विभुला वंदूनि ऋक्षपति[2] गेला; ।
तेव्हां देवाचें पद गमलें व्यालेंचि काय गंगेला. ॥ ४२३
कुशनाम तनु[3] **ज** रामें कुं[4]शावतीला ससैन्य पाठविला; ।
पाँ[5]वित्तनगरीला लव धाडुनि, निजलोकशोक आटविला. ॥
स[6]ज्जनसमुदा **य** युत श्रीशरयूच्या तटासि विभु गेला; ।
तों त्रिदं[7]शांहीं नाना[8]वाद्यध्वनि पुष्पवृष्टिसह केला. ॥ ४२५
राघव क[9]रुणा **ज** लधर अवलोकुनियां प्रसन्ननयनाहीं; ।
भ[10]क्तमयूरेश्वर बहु नाचति ज्यांला त्रि[11]तापभय नाहीं. ॥ ४२६
हर[12] विधि शक्र **य मा** र्यम विधु वसु वरुणाग्नि सर्प गंधर्व ।
चा[13]रणकिंनरसिद्धत्रिद[14]शर्षिसमाज पातले सर्व. ॥ ४२७
नाचति वराप्स **रा** बहु, गाती गंधर्व, वाजती वाद्यें; ।
आरंभिलें प्र[15]याण स्वर्गासि जसें समस्तदेवाद्यें. ॥ ४२८
श्रीगोप्रतारना **म** क शरयूतीर्थी प्रजेसवें राम ।
स्नान करुनियां गेला स्वस्थाना पू[16]र्णकाम सु[17]खधाम. ॥ ४२९

---

## उपसंहार.

(श्लोक.)

'श्रीमंत्ररामायण'रत्नमाला समर्पिली श्रीरघुसत्तमाला;
प्रसाद कंठीं प्रभुसेवकांहीं ध्यावा, नसे भूषण अन्य कांहीं. ॥ १
वाल्मीकिविप्रोत्तमकाव्यपद्म, श्रीरामलीलामकरंदसद्म; ।
तेथें मयूरेश्वर भृंग झाला, सेवावया नित्यसुखें रसाला. ॥ २

---

१. अश्रुपूर्णनेत्र. २. जांबवान्. ३. पुत्र. ४. कुशावती नगरीला. ५. पावित म्ह० शुद्ध केलेली अशी नगरी. येथें 'पावित' हें पद लेखकप्रमादानें पडलें असावें. 'श्रावस्तीनगरीला' असा तृतीय चरण पाहिजे, कारण 'पावितनगरीला' या पाठांत अर्थसौरस्य नसून त्यास रामायणांत आधारही दिसत नाहीं, शिवाय कुशाच्या नगरीचें जसें नांव सांगितलें आहे, तसें लवाच्याहि पाहिजे आणि तें पंत दाखल केल्याशिवाय राहिले नसावेत, असें संदर्भावरून वाटतें, तेव्हां 'श्रावस्तीनगरीला' हाच पाठ पंतांचा बहुधा असावा. श्रावस्ती हें लवाच्या नगरीचें नांव होय. ६. साधुसह. ७. देवांहीं. ८. अनेकवाद्यशब्द. ९. दयामेघ. १०. भक्तच मोर. ११. आधिभौतिक, आध्यात्मिक आणि आधिदैविक असें तीन प्रकारचे ताप त्यांचें भय. १२. शिवब्रह्मेंद्रयमसूर्यचंद्रादि. १३. देवयोनिविशेष. १४. देवर्षिसमूह. १५. गमन. १६. पूर्णमनोरथ. १७. सुखस्थान.

रामाचें रचिलें चरित्र मुनिनें वाल्मीकिनें संस्कृतीं, ।
  नाहीं हानि कदापि अन्य कविंहीं तें वर्णितां प्राकृतीं; ।
मुक्तांचा रचिलाचि हार वहिला जो रेशिमाच्या गुणें, ॥
  तो कार्पासगुणें[1]करूनि करितां काय प्रभेला उणें? ॥ ३
    केलें पात्र सुवर्णाचें, कीं विरूपशि खापरी; ।
    लावितां तेथ संहारी, तम[2] दीपशिखा परी. ॥ ४

(गीति.)

खळ निंदिति म्हणुनि बुधें, टाकावी काय हरिगुणासक्ती; ।
दीरनणंदाजाचें, साध्वी न त्यागिती सुपतिभक्ती. ॥ ५

(श्लोक.)

श्रीवाल्मीकिप्रभृति मुनिहीं वर्णिली रामलीला;
  मादृक्षांहीं[3] मुदितहृदयें काय गावें न तीला? ।
श्रीकंठेंद्राद्यमरपरिषत्सेव्यगंगाप्रवाहीं[4]
  संध्यास्नानादिक न करणें काय या मानवांहीं. ॥ ६
अलंकारें युक्ता रघुपतिकथा शोभत असे,
  अलंकारें हीना जरि म्हणति कोणी न विलसे; ।
कृताभ्यंगस्नाना कनकमणिभूषाविरहिता
  विराजे सिंदूरें धवलवसनें भूपवनिता. ॥ ७
सच्चेत:कैरवातें[5] विकच[6] करि, जगत्ताप संपूर्ण टाळी,
  अज्ञानध्वांत[7] सारें हरि, रसिकचकोरासि अत्यंत पाळी; ।
नानावस्तु प्रकाशी, कविहृदयपयोराशिसंतोषहेतु,[8]
  काव्येंदु[9] स्वप्रभेनें खळविरहिजनीं होतसे धूमकेतु. ॥ ८
विशुद्धस्वांताला[10] रुचति गुण पीयूषसम[11] जे,
  परी त्यातें दुष्ट स्वमनिं विष ऐसेंचि समजे; ।
घृतें[12] क्षीरें[13] होती प्रमुदित मखीं[14] निर्जर[15] खरे,
  परी तेही तापप्रद रस जयाला ज्वर भरे. ॥ ९

---

१. कापसाच्या सुतानें. २. अंधकार. ३. माझ्यासारख्यांनीं. ४. शिवइंद्रादिदेवसभासेव्य गंगोदकांत. ५. साधुचित्तरूप चंद्रविकासिकमलातें. ६. विकसित. ७. अज्ञानांधकार. ८. कविहृदयसमुद्रानंदकारक. ९. काव्यरूप चंद्र. १० शुद्धचित्ता. ११. अमृततुल्य. १२. तुपानें. १३. दुधानें १४. यज्ञीं. १५. देव.

झाले जे तृप्त [1]भास्वत्कुलतिलकरघूत्तंसलीलारसानें,
[2]सारासारज्ञ साधु स्वमनिं अमृतही मानिती फार [3]सानें; ।
[4]पीयूषें [5]सोदरेंदुक्षयहि न हरिला, त्यागिलेंही [6]पयोधीला,
[7]राहूचा घात केला विषसह[8]जनिला कोण सेवील त्याला? ॥ १०
गीर्वाणें राघवाचें यश रसिकजना लागतें फार मिष्ट,
तैसें न प्राकृतानें [9]अचतुर म्हणती, मानिती ते न शिष्ट; ।
पीतां [10]गोक्षीर [11]कार्तस्वरमणिचषकें देतसे जेंवि गोडी;
सारज्ञाला [12]पलाशद्रुमदलपुटकें सेवितां [13]तें न सोडी. ॥ ११
जसे होती देव प्रमुदित [14]शचीनायकवनीं,
तसे [15]सारज्ञाते बुधजन [16]मयूरेशकवनीं; ।
महाराष्ट्रग्रंथीं रसिक कवि जे तेच रमती,
परंतु ज्ञात्याची पळहि न असावी [17]चर मती. ॥ १२
माजी [18]सत्कृति दूषिली जरि खळें उच्छृंखळें आग्रहें,
सेवावीच परंतु नित्य रसिकें हे सद्गुणाच्या गृहें; ।
चंडाळ [19]त्रिदशापगेंत [20]वमला कीं धेनुला स्पर्शला,
त्यांचें [21]श्रोत्रियदेवसेव्य [22]पेयही, त्याही सदा निर्मला. ॥ १३

---

१. सूर्यकुलतिलकरामकथारसें. २. त्याज्यात्याज्यविवेकज्ञ. ३. लहान. ४. अमृतें. ५. स्वबांधव जो चंद्र त्याचा क्षय. जरी अमृत चंद्रापाशीं आहे, तरी त्या अमृतानें चंद्राचा होणारा क्षय दूर केला नाहीं. ६. समुद्राला. सागराच्या पाण्यांत आतां अमृतगुण राहिला नाहीं. ७. मोहिनीरूप धारण करून विष्णूनें दानवांपासून अमृत आणून देवांस प्राशनास दिलें. तेव्हां राहूनें देवरूप धरून अमृतपान केलें. तें त्याच्या कंठगत होत आहे इतक्यांत चंद्रसूर्यांच्या खुणेंवरून विष्णूनें आपल्या चक्रानें राहूचें शिर छेदिलें. असा अमृताच्या योगें राहूचा घात झाला. (महाभारत, आदिपर्व, अध्याय १९ श्लो०
८. जन्म. ९. मूर्ख. १०. गाईचें दूध. ११. सुवर्णाचा रत्नखचित पेला त्यानें. १२. पळसाच्या द्रोणें. १३. गोडी. १४. इंद्राच्या बागेंत. १५. सार जाणणारे. १६. मोरोपंताच्या
१७. चंचल. १८. उत्तमकाव्यकृति. १९. गंगेंत. २०. ओकला. २१. अग्निहोत्री व देव यांस मान्य. २२. दूध, पाणीहि.

शनिमाहात्म्य. (ओवीबद्ध.) ... किंमत २ आणे, ट. ॥ आणा.

शिवलीलामृत मोठें. ... ... किंमत १२ आणे, ट. २ आणे.

शिवलीलामृत. रेशमी ... ... किंमत ८ आणे, ट. १॥ आणा.

शूद्रकमलाकर. ... ... ... किंमत ४ रुपये, ट. ४ आणे.

श्रीएकनाथचरित्र. ... ... ... किंमत १२ आणे, ट. २ आणे.

श्रीधरकृत पांडवप्रताप. ... ... किंमत ४ रुपये, ट. १४ आणे.

श्रीमंत पहिले बाजीराव बल्लाळ पेशवे यांचें चरित्र.
किंमत ८ आणे, ट. २ आणे.

श्रीज्ञानेश्वरचरित्र. ... ... ... किंमत १२ आणे, ट. २ आणे.

सदाचार. ... .. ... ... किंमत १। रुपया, ट. २ आणे.

सद्वर्तन. ... ... ... ... किंमत १२ आणे, ट. १॥ आणा.

साहा सुलभ संवाद. ... ... किंमत १ आणा, ट. ॥ आणा.

साम्युएल जान्सन.... ... ... किंमत ७ आणे, ट. १ आणा.

सावित्रीचरित्र. ... ... ... किंमत १ आणा, ट. ॥ आणा.

सुगम प्रियदर्शिका... ... ... किंमत २ आणे, ट. ॥ आणा.

सुलभ विक्रमोर्वशी. ... ... किंमत ३ आणे, ट. ॥ आणा.

सुलभशाकुंतल. ... ... ... किंमत २॥ आणे, ट. ॥ आणा.

सुशीलयमुना अथवा वासुदेव बळवंत फडक्यांच्या बंडांची
धामधूम. ... ... ... किंमत १२ आणे, ट. १॥ आणा.

सोपीं गाणीं. ... ... ... किंमत १ आणा, ट. ॥ आणा.

सोळासोमवार. ... ... ... किंमत १ आणा, ट. ॥ आणा.

सौंदर्यलहरी व तिची समश्लोकी टीका. किंमत ४ आणे, ट. १ आणा.

स्त्रीगीत. ... ... ... ... किंमत ३ आणे, ट. ॥ आणा.

स्त्रीशिक्षणबोध. ... ... ... किंमत २ आणे, ट. ॥ आणा.

हरिविजय. (ओवीबद्ध.)... ... किंमत २ रुपये, ट. ८ आणे.

श्रीमद्भगवद्गीता, सुबोधचंद्रिका. ... किंमत १० आणे, ट. १ आणा.

सुलबोध पहिलें पुस्तक. ... ... किंमत १ आ. ट. दहाप्रतीस १ आ.

,, दुसरें पुस्तक. ... ... किंमत २ आणे, ट. ॥ आणा.

मऱ्हाठ्यांच्या संबंधानें चार उद्गार... किंमत १। रुपया, ट. २ आणे.

निवडक बोधपर पदें व अभंग. ... किंमत १॥ आणा, ट. ॥ आणा.

---

हीं पुस्तकें मुंबईत काळकादेवीच्या रस्त्यावरील "निर्णयसागर" छापखान्यांत रोख पैसे पाठविले असतां विकत मिळतील.